मनोरमा ग्रंथमाला–पुष्प ४ थें

# घटकेचीं नाटकें

अर्थात्

## छोटीं सामाजिक प्रहसनें

---

लेखक

भालचंद्र

‘ वेड्याचें इस्पितळ ’ ‘ नीलांबरी ’ ‘ लीलाध्याय ’
‘ वासंतिका ’ ‘ जीवन योग ’ वगैरेंचे कर्ते.

---

१९३२ { मनोरमा ग्रंथमाला पुणें नं. २. } किंमत रुपये २

# मनोरमा ग्रंथमाला



## मालेचे नियम.

( १ ) प्रथम एक रुपया प्रवेश फी भरून वर्गणीदार होणारांस मालेची सर्व पुस्तकें पाऊणपट किंमतीस मिळतात.

( २ ) कोणती दोन पुस्तकें भर किंमतीनें प्रथम विकत घेणाऱ्यास मालेचे ग्राहक व्हावयाचे असेल तर वेगळी प्रवेश फी पडणार नाहीं.

( ३ ) वर्गणीदार झाल्यावर प्रत्येक पुस्तक घेतलेंच पाहिजे.

( ४ ) प्रत्येक तीन किंवा चार महिन्यांनीं एक किंवा दोन पुस्तकें दोन रुपयेपर्यंतच्या ( अर्थांत सर्व खर्चासुद्धां ) व्ही. पी. नें रवाना होतात.

( ५ ) व्ही. पी. परत केल्यास नांव काढून टाकलें जाईल.

या मालेतून मराठी भाषेला ललामभूत होणारी उत्तमोत्तम लेखकांची पुस्तकें, कादंबऱ्या चरित्रें प्रसिद्ध होतील.

पत्ताः—मनोरमा ग्रंथमाला
पुणें नं. २.

घटकेचीं नाटकें.

# अनुक्रमणिका.



प्रस्तावना.

क्रूराचें बंड.

सासूबाई.

शुभ मंगल.

भीमामाया.

त्राटिकेचा अवतार.

धरून बांधून.

बायकोचें भूत.

सवाई राव.

माभळ भट.

पतिदेव.

---

# प्रस्तावना



फार दिवसांपूर्वीची गोष्ट. कै. गु. गोविंदराव टिपणीस यांनी माझा ' भालचंद्र ' यांच्याशी प्रथम परिचय करून दिला. भालचंद्रांची कांहीं प्रहसनें मी नुकतीच वाचलेली होती. ' मनोरंजन ' च्या एका नामांकित लेखकाशीं परिचय झाला याबद्दल मला समाधान वाटलें. त्यानंतर मी भालचंद्रांकडे वारंवार जात असे. बैठकींत अनेक विषयावर आमचे बोलणें होई. त्यावेळीं त्यांच्या अंतःकरणाची ओळख जशी जशी द्विगुणित होत गेली, तसतसें त्याचे लिखाणांतील रहस्य मला जास्त पटूं लागलें. यांच्या लिखाणातील तडफ, मर्मभेदी विनोद, अनिष्ट रूढींबद्दल प्रदर्शित झालेला तिटकारा, समाजांतील दोषाचे सूक्ष्म निरीक्षण इत्यादि गुणांनीं माझ्यांत भालचंद्रांबद्दल अधिक आदर उत्पन्न केला; प्रथम दर्शनीं मात्र मनोरंजनचे हेच ते बडे लेखक प्रहसनकार व कवि ' भालचंद्र ' असतील अशी माझी कल्पना झाली नाहीं हें कांहीं खोटें नव्हे.

याचे कारण प्रचलित रूढींबद्दल आपल्या लिखाणांतून तीव्र तिरस्कार प्रदर्शित करणारा लेखक पोषाकात व रहाणीत बडा सुधारक असला पाहिजे अशी माझी कल्पना होती. पण भालचंद्र यांची ती अत्यंत साधी राहणी पाहून तें सर्वच कांहीं खोटें ठरलें. साधी रहाणी, निगर्वी स्वभाव, व्यवसायासक्ती व त्यामुळें उत्पन्न झालेली जगाशी फटकून वागण्याची वृत्ती इत्यादि त्यांचें स्वभावगुणही मला आवडले होते म्हणूनही त्याच्याबद्दल मला एकप्रकारचा आपलेपणा वाटूं लागला.

भालचंद्र यांच्या समग्र कविता व प्रहसनें स्वतंत्र पुस्तकरूपानें प्रकाशित व्हावीत असें माझ्याप्रमाणें त्यांनाही वाटत असे आणि कै. काशिनाथ रघुनाथ मित्र हे जर आज हयात असते तर त्यांनी ही कामगिरी यापूर्वी केव्हांच करून टाकली असती; ज्यांचीं पुस्तकें प्रकाशित करावींत अशी माझी इच्छा त्यांपैकीं एक भालचंद्र होत. पण धंद्यांच्या दृष्टीनें मला केव्हांच अभिमान वाटण्याइतकी सुस्थिति आली नसल्यामुळें आपणहून त्यांच्याकडे पुस्तकाची मागणी करण्याचें धाडस मला झालेंच नाहीं. धंद्यांत नांवलौकिक मिळविण्याऐवजीं बद्लौकिक मात्र मिळविला आणि त्यामुळें मला इतका उद्वेग वाटूं लागला कीं, ' आपदा मपहर्तारम् दातारम् सर्व संपदाम् । लोकाभिरामम् श्रीराम् भूयोभूयो नमाम्यहम ' अशी आवडीनें प्रार्थना करण्याची आवड लयास जाऊन

संपदामपहर्तारम् दातारम् सर्व आपदाम्
लोकाभिरामम् श्रीराम् भूयोभूयः त्यजाम्यहम्

असें म्हणण्याइतका परमेश्वराच्या प्रार्थनेचा कंटाळा आला. असें कां वाटूं लागलें व त्याचा निरास कसा झाला हा वेदांत न सांगतां थोडक्यांत सांगावयाचें तर कृपाळू परमेश्वराचे दयेनें मी अनेक आपत्ती आल्या असताहीं अद्याप ध्येय विन्मुख झालो नाहीं व भविष्यकाळाबद्दल मला निराशाही वाटत नाहीं.

आणि म्हणूनच हें पुस्तक वाचकांच्या हातीं देण्याचा योग आज येत आहे.

या पुस्तकांत एकूण दहा प्रहसनें छापलेलीं आहेत. हीं प्रहसनें ज्या ज्या वेळीं प्रसिद्ध झालीं त्या वेळीं वाचकांना फार आवडलेली होती. हीं सर्व प्रहसनें काल्पनीक आहेत. प्रहसनाचा विषय एकाद्या

प्रचलित पण अनिष्ट रूढीचा घेतला असून या प्रहसनांची मांडणी विषयानुरुप जोरदार झाली आहे. ‘ क्रबांचे बंडा’ चा विषय सामाजिक रूढीचा नसला तरी सुशिक्षित व समाजांत विशिष्ट दर्जा संपादन केलेले विद्वान क्रबांच्या गोंडस नांवावर धर्मपत्निच्या डोळ्यांत धूळ फेंकून कसे बदफली वर्तन करतात हें दाखविलें आहे. सासुबाई या प्रहसनांतील ‘ चंडीकाकाकू ’ चें पात्र वाचकांची खचित करमणूक करील. अलिकडील तरुणतरुणींची मोकळी वागणूक जुन्या लोकांना कशी दिसते व भलत्याच संशयानें ते कशी गडबड उडवून देतात हे श्री. भालचंद्र यांनीं इतकें उत्कृष्ठ रीतीनें दाखविलें आहे कीं मराठी वाङ्मयांत ‘ चंडिकाकाकूला ’ दुसरी तोड नाहीं. समाजांत अनेक प्रकृतीचे लोक असतात; विवाहपूर्व सहवासाची आपल्यात पद्धत नसल्याकारणानें लग्न झाल्यानतर वधू घरीं आली म्हणजे तिच्या स्वभावाचे व वर्तनाचे चित्र वडील मंडळी रंगवतील तेंच खरे धरून कांहीं तरुण, सुशील आणि सद्‌गुणी व विनयशील स्वभावाच्या पत्नीचा त्याग स्वत: खऱ्याखोट्याचा शहानिशा करून न घेतां कसा करतात व वाईट मार्गाला लागून कसे फसतात आणि कालांतरानें पत्निच्या स्वभावाची खरी ओळख पटली कीं पूर्वकृतीबद्दल पश्चाताप करण्याची पाळी त्यांचेवर कशी येतें हे ‘भीमामाया’ या प्रहसनांत दाखविलें आहे. भीमा नावाच्या बाईची सावत्र मुलावरील कृत्रिम माया व वत्सलेची पतीवरील खरी माया यामधील विरोध लेखकानें फार कुशलतेनें दाखविला आहे यांत शंका नाहीं. ‘ शुभ मंगल ’ ‘ धरून बांधून’ आणि ‘ त्राटिकेचा अवतार ’ ह्या तिन्ही प्रहसनांत इच्छेविरूद्ध होणारा विवाह टाळण्यासाठीं तरुणतरुणींना कसे दिव्य करावे लागते ह्याची निरनिराळ्या बाजूंनीं चित्रें दाखविलीं आहेत.

'बायकोचें भूत' पाहून वाचक भिण्याऐवजीं बुवासाहेबांची झालेली फजिती पाहून पोटभर हसल्याखेरीज रहाणार नाहींत. नायकीणीच्या नादानें वहकलेल्या अच्युतरावांना लक्ष्मीनें कसे ताळ्यावर आणले व गमावलेली इस्टेट कशी मिळविली हे 'सवाईराव' या प्रहसनांत दाखविलें आहे. 'माभळभट' व 'पतिदेव' ही दोन्ही प्रहसनेंही वाचकांचे मनोरंजन करतील.

ही सर्व प्रहसनें, मनोरंजक तर आहेतच पण वाङ्मयप्रकाशनाचा जो एक हेतु की तें समाजाच्या प्रगतीला चालना देणारे असावे तोही यांत चांगला साधला आहे. मासिकाची पानें भरण्याकरतां गोष्टी लिहीण्याची अलिकडील पद्धत 'मनोरंजनाचे' मूळ संस्थापकांनीं केव्हांच अनुसरली नव्हती व ठरीव ध्येयाला धरून असणारें तेवढेंच लिखाण प्रसिद्ध करावयाचे असा मित्रांचा बाणा होता. भालचंद्र हे मूळ मनोरंजनचे लेखक. आपल्या लेखणीनें त्यांनीं जसें मनोरंजनाला भूषविलें त्याचप्रमाणें 'मनोरंजन' मुळेंच त्यांना लेखकांत प्रतिष्ठा प्राप्त झाली.

आज पुस्तकास वस्तुतां 'सामाजिक प्रहसनें' किंवा नुसतीं 'प्रहसनें' असेंच नांव द्यावयास पाहिजे. पण तसे न देतां 'घटकेची नाटकें' हे आकर्षक नांव आपल्या पुस्तकास दिले आहे हें योग्यच होय; कारण नाट्यवाङ्मयांत 'घटकेचीं नाटकें' अलिकडेच रंगभूमीवर येऊं लागली आहेत. माझे स्नेही रा. अनंत हरी गद्रे यांच्या 'मुंबई नाटिका संगीत मंडळीनें' घटकेची नाटकें प्रयोगरूपानें प्रथम लोकांपुढें आणण्याचे यशस्वी धाडस केले. त्यानंतर अशा प्रकारची नाटकें करण्याकरतां स्वतंत्र कंपन्या व क्लबस् निघत आहेत. या पुस्तकांतील नाटकें जेव्हां लिहिली गेली तेव्हां घट-

केची नाटकें यशस्वी होतील किंवा नाहीं याबद्दल मतभेद होता व ती लोकांना आवडणार नाहींत असेच बहुमत प्रचलित होतें; म्हणूनच आपली ही छोटी नाटकें रंगभूमीवर येतील या आशेवर अवलंबून न राहतां रा. भालचंद्र यांनीं ती निरनिराळ्या मासिकांतून प्रसिद्ध केली. शिवाय नाट्यकृती प्रयोगरूपानें पुढें आणण्यासाठीं लेखकाना पडणारी प्रचंड खटपट व दगदग सोसण्याइतकी त्यांच्या स्वभावाची कणखर घडणही नाहीं ! महाराष्ट्र नाटक मंडळींचे मालक माजी रा. कारखानीस व हल्लींचे मालक रा. देशपांडे हें भालचंद्राचे बाळपणापासूनचे स्नेही, एका गांवात, एका आळींत राहणारे शेजारीं शेजारीं; प्रसिद्ध नट माधवराव टिपणीस व यशवंतराव टिपणीस हे त्याचे सख्खे बंधु असतां अशा स्थितींत ही नाटकें रंगभूमीवर आलीं नाहींत याचे लोकाभिरुचीची प्रतिकूलता व खुद्द लेखकाचे औदासिन्य हीच मुख्य कारणें नव्हेत तर काय !

मात्र अशी छोटी नाटकें करण्याची मुळींच पद्धत तेव्हां नव्हती असें नव्हे. त्यावेळीं अशा नाटकांना 'फार्स' अशी संज्ञा देण्यांत येई. शाहु नगरवासी नाटक मडळी, वेलणकर यांची नाटक मंडळी वगैरे नाटक कंपन्या नाटकाच्या शेवटीं असे फार्स करून दाखवित. अरेबियन् नाइटसमधील ( Sleeper awakened ) या गोष्टीवरून रचलेल्या "झोपी गेलेला जागा झाला" हे फार्साचे निदान नांव तरी बऱ्याच लोकांच्या स्मरणांत असेल. कांहीं वर्षांपूर्वी महाराष्ट्र नाटक मंडळीनें नाट्यछटालेखक दिवाकर यांनीं लिहिलेलें पूर्वीच्या शब्दांत सांगावयाचे तर फार्स किंवा आजच्या शब्दांत सांगावयाचे तर घटकेचे नाटक 'कारकून' रंगभूमिवर आणले होते. हे फार्स मुख्य नाटकाचा प्रयोग संपल्यावर प्रयोगीत असत. आतां

दोन तासांची अथवा घटकेची नाटकें लोकाना पसंत पडू लागल्यामुळें अशी घटकेची नाटकें रंगभूमिवर आणणें प्रेक्षकांच्या दृष्टीनें सोयीचे व नाट्यकंपनींच्या दृष्टीनें फायद्याचे झाले आहे.

या पुस्तकातील बहुतेक प्रहसनें रंगभूमिकरता करावा लागणाऱ्या थोड्याशा फेरफारानें प्रयोग रूपानें घेण्यासारखी आहेत. व कांहींतर अत्यंत लोकप्रिय होतील अशी मला खात्री वाटते. मारून मुटकून घटकेचे नाटक कोणाकडून तरी लिहून घेण्यापेक्षां यातील कांहीं प्रहसनें रंगभूमिवर आणण्याचा प्रयत्न केल्यास बरें होईल.

असो, पुस्तकाचा थोडक्यांत परिचय करून देण्यासाठीं हा प्रस्तावनेचा छोटा पसारा मांडला. हें पुस्तक वाचकांना आवडल्याचे ऐकलें म्हणजे लाभणाऱ्या समाधानाची किंमत प्रस्तावना लिहिण्यानें होणाऱ्या आनंदापेक्षां खचित अधिक आहे.

गो. गो. अधिकारी

# घटकेचीं नाटकें

## [ १ ]

## क्लबांचें बंड !

### अंक पहिला

#### प्रवेश पहिला

[ स्थळ—बॅरिस्टर धनुर्धर यांच्या बंगल्यांतील एक दिवाणखाना. सुभद्रा-बाई प्रवेश करितात. ]

सुभद्रा—कायरे गोट्या ! स्वारी उठली आहे कारे !

गोट्या—( प्रवेश करून ) होय सरकार ! उठून बराच वेळ झाला !

सुभद्रा—रात्रीं स्वारी आली केंव्हांशी क्लबांतून !

गोट्या—रात्रीं असे एक—दोन वाजतां आले सरकार !

सुभद्रा—दोन वाजेपर्यंत तर मी जागीच होत्यें ! मग मला जाग कशी ?

गोट्या—आपली झोंपमोड होईल असें समजून बूट खालींच काढून ठेवून स्वारी चोरपावलांनीं गपाचिप वर येऊन निजली असेल !

सुभद्रा—असं-असं ! मला कळतात ह्या सगळ्या विद्या ! बरं जा ! चहा पोंचीव तिकडे नि मलाहि घेऊन ये.

गोट्या—जी होय. [ जातो.

सुभद्रा—( स्वगत ) ह्या क्लबानं तर बाई भंडावून सोडलं ! गेले सहा महिने पहात्ये आहे, एक दिवस वेळेवर आले असतील तर शपथ ! हें क्लबांचं वेड सोडील असं कांहींच का मला करतां येणार नाहीं ?

[ चहा, बिस्किटें घेऊन गोट्या येतो. ]

गोट्या—स्वारी इकडेच येते आहे चहाला !

[ बॅरिस्टर धनुर्धर प्रवेश करितात. ]

धनुर्धर—काय ! झोंपबीप नीट लागली रात्रीं !

सुभद्रा—हो, नीट लागली ! पण आपली रात्र नीट मजेंत गेलीना क्लबांत ? रात्रीं येणं बरंच वेळेवर झालं !

धनुर्धर—( चहा घेत घेत ) तें-अ-सें-झालें, रात्रीं मोठा खडाजंगी वाद निघाला—मोठा कडाक्याचा ! त्यामुळें झाला जरासा उशीर ! पण कायरे — आजचा ' ज्ञानप्रकाश ' नाहीं का आला—गोट्या ! गोट्या, तेवढा ताजा ' ज्ञानप्रकाश ' आण पाहूं !

गोट्या—( आतून ) जी होय

[ गोट्या 'ज्ञानप्रकाश' देऊन जातो. ]

सुभद्रा—( चहा पीतपीत ) ह्या क्लबांतच अशा रात्री नि कोर्टांत दिवस जाऊं लागले, म्हणजे आमचं बायकांचं होणार तरी कसं !

धनुर्धर—( चहा पीतपीत 'ज्ञानप्रकाश' वाचीत ) " असें म्हणून लाटसाहेब टाळ्यांच्या गजरांत खालीं बसले—"

सुभद्रा—माझा तर बाई जीव कावून गेला !

धनुर्धर—( 'ज्ञानप्रकाश' खालीं ठेवून ) हं, आतां होऊंद्या आपलें भाषण सुरू !

सुभद्रा—माझं भाषण ! मग इतका वेळ काय ऐकलं ! —पण आजहि क्लबांतच जायचं असेल जेवायला ! हो, आज रविवार ! आज तर क्लबाचा मुख्य दिवस !

धनुर्धर—खरंच, आज दोन्ही वेळ क्लबांतच जेवण व्हायचं आहे ! भय्यासाहेब इनामदारांच्या बाळकेश्वरच्या बंगल्यांत आजचा बेत आहे.

[ जातो.

सुभद्रा—धर्म झाले बाई ! दोन्ही वेळ म्हणे आज क्लबांतच जेवण ! मग बायकामुलं नि हा संसार तरी कशाला थाटचा ? बायकामुलांचीं कामं ह्या क्लबांनीं होतीं, तर बायकामुलांच्या ऐवजीं देवानं क्लबच निर्माण केले नसते का ?

गोटया—( प्रवेश करून ) इंदिराबाई इनामदारीण आल्या आहेत.

सुभद्रा—येऊ दे त्यांना वर !

[ गोटया जातो व इंदिराबाई प्रवेश करितात. ]

इंदिरा—बाई बाई ! जीव नकोसा झाला !

सुभद्रा—काय, झालं काय इंदिराबाई ?

इंदिरा—माझं मेलं नशीबच असं, दुसरं काय !

सुभद्रा—म्हणजे ! झालं तरी काय ?

इंदिरा—ही आमच्या पतिराजांची स्वारी ! काय, सांगू तरी काय ? एक ना दोन ! मी कुरूप का आहे—भांडकुदळ का आहे—म्हातारी का आहे—

सुभद्रा—कोण म्हणेल ? पण झालं काय तें तर सांगाल की नाहीं आधीं!

इंदिरा—सांगायचं काय आणखी ! आमच्या पतिराजाची स्वारी कशी ती पांच मिनिटंहि घरात टिकेनाशी झाली, नि तर बोलायचीहि चोरी ! मेलं दिवसाचं राहो, रात्रीं तरी नीट परत याव कीं नाहीं ! सारा दिवस नि रात्र तो क्लब ! याला आतां मी करूं तरी कसं बाई !

गोटया—( प्रवेश करून ) बकुळाबाई डॉक्टरीण आल्या आहेत.

सुभद्रा—येऊं दे त्यांना वर.

[ गोटया जातो व बकुळाबाई प्रवेश करितात. ]

बकुळा—वा, इनामदारीणबाई ! आपणहि पण इकडे ! बऱ्या बाई भेटल्यांत ! सुभद्राबाई, मी आज मुद्दाम तुमच्याकडे आल्यें आहे हो ! असं किती दिवस चालणार ? हे क्लब—ह्यांनीं बाई जीव नकोसा केला ! अहोरात्र क्लब क्लब क्लब ! खाणं क्लबात—जेवणं क्लबांत—निजणं क्लबांत ! असं बाई झालं आहे तिकडे ! मी म्हणत्यें—

गोटया—( प्रवेश करून ) शेवंतीबाई इंजिनियर आल्या आहेत.

सुभद्रा—येऊं दे त्यांना वर !

[ गोट्या जातो व शेवंतीबाई प्रवेश करितात. ]

सुभद्रा—या शेवंतिबाई ! आपला आज हा क्लबच भरला म्हणायचा !

शेवंती—क्लब ! ह्या क्लबाचं बाई केव्हां निसंतान होईल, देव जाणे ! उभ्या दिवसांत स्वारी फिरकत नाहीं घराकडे ! अहोरात्र क्लब !

बकुळा—अन् तिकडची स्वारी—

इंदिरा—अन् तिकडची स्वारी—

सुभद्रा—अन तिकडची स्वारी—

शेवंती—खरंच कीं काय ! बाई हे नव्हतं मला ठाऊक ! बरं झालं, दुःखांत सुख, सगळ्याचजणी समान ! हें पहा बाई, गेल्या पंधरावड्यात कांहीं स्वारीचं जेवण धरीं नाहीं !

इंदिरा—अन् आमच्या स्वारीचं—

बकुळा—अन् आमच्या स्वारीचं—

सुभद्रा—अन् आमच्या स्वारीचं तरी—

शेवंति—मी असं विचारत्यें, ह्या क्लबांत अशी आहे तरी काय जादू भरलेली कीं, ह्या पुरुषांना आपल्या बायकापोरांचीहि आठवण होऊं नये ?

गोट्या—( प्रवेश करून ) प्रोफेसर विद्याधरराव अन् शारदाबाई आल्या आहेत.

सुभद्रा—प्रोफेसरसाहेबांना ने तिकडे माडीवर स्वारीकडे, नि शारदा बाईंनां येऊं दे इकडे.

( गोट्या जातो व शारदाबाई प्रवेश करितात. )

शारदा—वा ! आपण सगळ्याजणी इथंच भेटलांत ही मोठ्या आनंदाची गोष्ट होय. सगळ्यांचे पतिदेव बरे खुशाल आहेतना ?

बकुळा—पशुदेव-खुशाल आहेत !

शारदा—म्हणजे ! झालं काय इतकं रागवायला ?

बकुळा—अंगाचा नुसता तिळपापड झाला आहे माझ्या-

इंदिरा—माझ्या अंगाची तर नुसती काहिली झाली आहे-

शेवंति—अन् माझं डोकं फिरून गेलं आहे-

शारदा—सुभद्राबाई, सांगा झालं तरी काय ?

सुभद्रा—इंदिराबाई, तुम्हीच सांगा—

इंदिरा—शेवंतीबाई, गडे तुम्हीच सांगा—

शेवंति—मी नाहीं बाई ! बकुळाबाईच सांगतील !

बकुळा—बाई काय सांगूं ? दुर्दैव माझं ! तिकडची स्वारी—

इंदिरा—अन् तिकडची स्वारी—

सुभद्रा—अन तिकडची स्वारी—

शेवंती—अन तिकडची स्वारी—

बकुळा—अहोरात्र क्लबात पडलेली—

शारदा—क्लबांत पडलेली ! काय सगळ्याजणींचे पतिराज अहोरात्र क्लबांत पडलेले ! नवल आहे बाई ! पण तुम्ही कशा पडूं देतां त्यांना क्लबांत ? तुम्हा बायकांच्याच मनगटांत जोर नसल्यावर नवरे क्लबांत पडले, तर नवल तरी कसलं म्हणा ! आमच्या तिकडे पहा ! क्लब आठवड्यांतून एकदां—रविवारीं, नि तेंहि मी बंद करण्याच्या विचारात आहे. हां, त्यांनीं ढीग म्हटलं क्लबांत जावं, पण आपण जाऊं द्यावं का ?

इतर सगळ्याजणी—जाऊं द्यावं ? मग काय बांधून ठेवावं ?

शारदा—हो, बांधूनच ठेवावं लागतं ! दोरखंडानंच नव्हे कांहीं ! प्रेमपाशानं !

बकुळा—प्रेमानं बांधून रहावयाला सगळेच कांही प्रोफेसर विद्याधर नाहींत, हें विसरतां बाई तुम्ही अगदीं !

शारदा—तें खरं आहे बकुळाबाई ! तिकडची सरच यायची नाहीं कुणाला ! पण मी म्हणत्यें, तुम्ही कांहींच कशी याला तोड काढीत नाहीं सगळ्याजणी मिळून !

सुभद्रा—हें क्लबांचं बंडच मोडून टाकलं पाहिजे !

इतर सगळ्याजणी—खरंच बाई ! मूळासकट उपटून काढलं पाहिजे !

शारदा—थांबा, धीरानं घ्या. मी तुम्हांला हातभार लावत्यें. सध्यां इतकंच करायचं, कीं, तुमचे हे पतिदेव क्लबांत करतात तरी काय तें नीट आपल्यापैकीं कांहींजणींनीं प्रत्यक्ष पहायचं !

शेवंती—पण हें साधणार कसं ? बायकांना का तिथं जाऊं देतील ?

शारदा—सगळं साधेल! असं करूं. तुमच्यापैकीं दोघीजणी तयार होतां पुरुषांचीं सोंगं घ्यायला?

बकुळा—मी तयार आहे!

शेवंती—अन् माझीहि तयारी आहे!

शारदा—ठीक आहे तर. आतां असं करायचं. कोणातरी पुरुषमाणसाचं या कामांत साहाय्य घ्यायचं, त्यावांचून गत्यंतर नाहीं. हो—ही पुरुषांची पुंडाई मोडायला पुंडांतलाच एखादा पुरुष फोडला पाहिजे. नि मला वाटतं, ह्या कामांत आपल्याला त्या जयवंतरावांचा फार चांगला उपयोग होईल. ते आतां इतक्यांत इकडे येणार आहेत. सुभद्राबाई, तुमच्या गीतेला पहायला!

सुभद्रा—अगबाई! असं अचानक?

शारदा—हो, मी नि तिकडील स्वारीनं आग्रह केला आताच चला म्हणून! ते आत्तां येतील! तेव्हां, असं करायचं. म्हणावं, मी कांहीं आज गीतेला दाखवीत नाहीं. हें क्लबाचं बंड मोडेल, अन हें मोडायला आम्हांला साहाय्य कराल, तर तिला दाखवूं! हो, हें बंड चालू आहे तोंपर्यंत बेहत्तर आहे मुली अविवाहित राहिल्या तरी!

सुभद्रा—खरं, खरंच बाई! ते आले, कीं, तुम्हीच काय ते त्यांना सांगासवरा!

गोट्या—( प्रवेश करून ) जयवंतराव आले आहेत.

सुभद्रा—येऊंदे त्यांना वर. ( गोट्या जातो. शारदाबाईस ) बाई, आम्ही आंत जातों; तुम्ही नि ते काय तो मेळ करा. मी तिकडे जाऊन सांगत्ये स्वारीला, कीं, आज कांहीं मी गीतेला दाखवीत नाहीं म्हणून!

शारदा—बरं आहे, जा.

[ सुभद्रा, बकुळा, इंदिरा व शेवंती जातात. जयवंतराव प्रवेश करितात. ]

शारदा—या जयवंतराव! पण गीतेला कांहीं आज दाखवीत नाहींत! सुभद्राबाईचं म्हणणं आहे, कीं, तुम्हीं पुरुषांनीं माजविलेलें क्लबाचं बंड मोडेपर्यंत, नि ह्या कामांत तुम्ही मनोभावानं साहाय्य करीपर्यंत गीतेला कांहीं आम्ही दाखवीत नाहीं!

जयवंत--( हंसून ) इतकंच ना ? मी एका पायावर तयार आहें, काय लागेल तें आपल्याला साहाय्य करायला !

शारदा--ठीक. ( मोठ्यानें ) या बायांनो, इकडे या ! ( सुभद्रा, बकुळा, इंदिरा व शेवंतीबाई येतात. ) हे जयवंतराव तयार आहेत !

इतर सगळ्याजणी--खरंच्चना पण !

शारदा--जयवंतराव, आतां असं करायचं ! ह्या बकुळाबाई नि ह्या शेवंतीबाई ह्यांना तुमच्या त्या बड्या क्लबांत घेऊन जायचं !

जयवंत--पण बायकांना येथें बंदी आहे !

शारदा--बायकांना बंदी, पण त्यांना पुरुष बनविलं तर !

जयवंत--समजलों ! ठीक आहे.

शारदा--बायांनो, हें ठरलं तर मग ? ह्या दोघीजणींनीं पुरुषांचा वेष घेऊन आज रात्रीं दहा वाजतां इथं तयार असायचं, नि हे जयवंतराव आले, कीं, त्यांच्याबरोबर त्या बड्या क्लबांत जाऊन तिथं काय काय प्रकार चालतात तें प्रत्यक्ष पहायचं ? पुढचा बेत पुढं ! जयवंतराव तुम्ही या आतां.

जयवंत--बरं आहे. रात्रीं दहाला इथं येतों. [ जातो.

गोट्या- ( प्रवेश करून ) प्रोफेसरसाहेब जायला निघाले आहेत.

शारदा--बरं, मीहि आल्येंच ! ( गोट्या जातो. ) मी येऊं तर आतां ? उद्यां सकाळींच भेटेन पुनः आज रात्रींचा भाग कितपत वठला तें पहायला नि पुढला बेत ठरवायला.

सुभद्रा--बरं बाई, या.

[ शारदाबाई जातात.

इतर सगळ्याजणी--आम्हीहि येतों आतां.

सुभद्रा--ठीक, या. पण धीर सोडूं नका हो !

[ सर्व जातात.

## प्रवेश दुसरा

[ स्थळ-भय्यासाहेब इनामदारांचा वाळकेश्वरावरील बंगला. एका दिवाणखान्यांत एका टोलेजंगी लंबाकृति टेबलाच्या दोन्ही बाजूंस खुर्च्या मांडलेल्या आहेत व त्यांवर दहाबारा गृहस्थ बसले आहेत, असा प्रवेश. ]

मय्यासाहेब—( चहा पीत पीत ) काय ! कांहीं ताजी बातमी ?

सोकरभाई—ताजी म्हणण्यासारखी वर्तमानपत्रांतून तर कांहींच नाहीं ! पण–पण–मला जें आज एक पत्र आलेलें आहे– चिनांतून–

लंबोदर—( चिरूट ओढीत ) चिनांतून ?

सोकरभाई – होय चिनांतून ! चिनांत माझा एक जुना दोस्त असतो—फर्दुंजी ! तो म्हणतो—अन् त्याची बातमी सर्वस्वी विश्वसनीयच आहे अशी माझी खात्री आहे ! (—छोकरा—चहा लाव ! )–तो म्हणतो, येत्या पहिल्या तारखेस—किंवा फार तर दुसरीस—किंवा फार तर–( छोकरा चहा आणून देतो तो घेत घेत ) किंवा फार–फार–तर–तिसऱ्या तारखेस ह्या चिनी लोकाचा हिंदुस्थानावर स्वारी करण्याचा घाट आहे.

धनुर्धर—स्वारी करण्याचा घाट ? हे भिकारड्े चिनी हिंदुस्थानावर स्वारी करणार ? हा–हा–हा ! सोकरभाई, तुमचा हा दोस्त वेड्याच्या इस्पितळांत तर नसतो ?

विद्याधर–पण ही स्वारी होणार तरी कोणत्या मार्गानें ? जलमार्गानें कीं खुष्कीनें ?

सोकरभाई—चहामार्गानें ! म्हणे चिनांतून येणाऱ्या चहाला अफीणीचें पाणी दिलेलें असतें ! त्यामुळें आपण चहाबाज तेवढे अप्रत्यक्ष रीतीनें अफीन बनलेले आहों ! अन् या गोष्टीचा परिणाम असा होणार आहे, कीं, येत्या पहिल्या तारखेस आपल्या देशांतील चहाबाज लोक–म्हणजे बहुतेक लोक–अफीणीच्या पूर्ण गुंगींत गुंतलेले असू, व त्याच दिवशीं हे चिनी लोक येऊन आपले गळे कापून निघून जाणार !

लंबोदर—काय ! त्या कपचशांनीं आपले गळे कापणार ?

[ जयवंतराव आणि पुरुषवेषांत बकुळाबाई व शेवंतीबाई प्रवेश करितात. ]

विद्याधर—या जयवंतराव !

जयवंत—माझे हे दोन स्नेही आले आहेत बरोबर ! हे बकुलराव, अन् हे शेवंतभाई !

लंबोदर—या बसा, बसा दोस्त !

( तिघेहि खुर्च्यांवर बसतात. )

बकुळा—( हळूच शेवंतीबाईस ) माझी गडे छाती धडधडायला लागली!

शेवंती—या गडे ! बंड मोडणारणीची हीच का छाती !

लंबोदर—घ्या ! नवे दोस्त, हे चिरूट घ्या !

जयवंत—( हंसू दाबून ) नाहीं ! ते धूम्रपान करीत नाहींत. ( बकुळाबाईस हळूच ) चुलीजवळ असल्यावांचून—तिथेंच कायतो नाकातोंडांत धूर जाईल तेवढा !

भय्यासाहेब—काय डॉक्टरसाहेब, तुमच्या ताराजी म्हणे महाबळेश्वरास गेल्या आहेत !

लंबोदर—होय, चार दिवसांपूर्वीं मींच पाठविलें आहे त्यांना ! अलीकडे प्रकृति बरी नव्हती, म्हटलं घाटांत हवेकरितां दोन महिने ! मीहि जाईन म्हणतों दोनचार दिवसांत तिकडे ! आतां घरांत थाप मारली पाहिजे कांहीं तरी बिनतोड ! न्यायमूर्ति महाबळेश्वरींच आहेत, त्यांची प्रकृती एकाएकीं बिघडल्याची तार आली आहे, तेव्हां गेलें पाहिजे, अशी नाहीं तर दुसरी कांहीं !

शेवंती—बकुळाबाई !—ऐका, ऐका, आपल्या पतिराजांचा कबुलीजबाब !

सोकरभाई—ती कालीजान म्हणे हल्लीं महाबळेश्वरासच आहे, अन् तिच्या तेथें मैफलीहि झडत आहेत !

धनुर्धर—हो—हो ! मीं कालच ऐकलें !

सोकरभाई—कालीजानची ती बहीण महालजान—ती म्हणे फार खुबसूरत आहे !

बकुळा—शेवंतिबाई ! ऐका हीं आपल्या पतिराजांचीं मुक्ताफळं !

लंबोदर—चला मंडळी ! आतांच जावें म्हणतों महाबळेश्वरास ! सगळेचजण जाऊं ! आपल्या मंडळींत आठदहा तरी मोटारी निघतील ! आतां निघून उजाडायला महाबळेश्वर !

सोकरभाई—चला, आतांच चला ! माझी मोटार घेतों !

धनुर्धर—वा—वा ! खासा बेत ! चलाच !

इतर सर्वजण——चलाच ! सगळ्यांच्या मोटारी काढूं !

लंबोदर——उद्यांचा दिवस काढूं तिथें मजेत ! उद्यां क्लबांतच जेवण आहे दोन्ही वेळ, असा बहाणा करून घरांतल्या गौरींची समजूत घालतां येतेच नेहमीं !

धनुर्धर——हो, मी नेहमीं अशीच थाप मारतों !

सोकरभाई——अन् मी तरी दुसरी थाप काय मारणार ? आपल्याला ही क्लबांतल्या जेवणाची सबब छान मिळाली आहे बिचाऱ्या गौराईंचीं तोंडें बंद करायला !

लंबोदर——छान-छान ! भोळ्या बिचाऱ्या ! काय, मग ठरलं तर मग आतां निघण्याचं ! मी एक आठवडा काढीन म्हणतों महाबळेश्वरींच ! अन् आपण या परत चाहील तर उद्यांच ! न्यायमूर्तींची तार आल्यानं घरगौरीला सांगतों अन् येतों मी हा असाच परत ! काय ? इंजिनियरसाहेब, असंच ना ?

सोकरभाई——हो, ठीक ! आम्ही मोटारीमध्ये इथंच तयार आहोंत ! या !

(इतक्यांत बकुळाबाई व शेवंताबाई पुरुषवेष टाकून आपापल्या पतिराजां-पुढें जाऊन "न्यायमूर्तींची तार आली आहे कायघरगौरींची समजूत करायला !" व "क्लबांत हेच चाळे चालतात वाटतं !" असे अनुक्रमें म्हणतात. सगळे "दगा !" "दगा !" असें ओरडतात व पळ काढतात, तोंच अंकाचा पडदा पडतो.)

---

## अंक दुसरा

### प्रवेश पहिला

(स्थळ——धनुर्धराच्या बंगल्यांतील एक दालन. गोट्या, श्रीखंड व बुगडी हांसत हांसत प्रवेश करितात.)

गोट्या——वा वा ! खाशी गम्मत झाली रात्रीं !

बुगडी——माझं तर बाई हंसून हंसून पोट दुखायला लागलं——

श्रीखंड—अन् माझें तर बुवा हंसून हंसून पोट भाताबरखें खिदखिद उकळायलाच लागलें—

बुगडी——अन् त्यांत बाईमाहेबांची स्वारी जर का तियं असती त्या दोघींजणींबरोबर, तर काय पण बहार उडाली असती—

गोट्या——बहार—फारच बहार उडती !

बुगडी—असो. आतां साहेबाचं जेवण तरी घरीं होत जाईल——

श्रीखंड——अन् आमटीला चार दाणे तरी अधिक मिळतील.

गोट्या——अन् आपल्या तोंडाला थोडी खिळी तरी पडेल ?

[ "गोट्या——अरे गोट्या" असें ओरडत धनुर्धर प्रवेश करतात. बुगडी व श्रीखंड पळन जातात. ]

धनुर्धर—गोट्या !

गोट्या——जी सरकार !

धनुर्धर—अगेंजाला पिटाळ ह्या चिठ्या घेऊन !

( चिठ्या घेऊन गोट्या जातो. )

धनुर्धर—( स्वगत ) काय ब्रह्मघोटाळा झाला ! आतां हिची समजूत तरी कशी घालणार ?

गोट्या——( येऊन ) पिटाळला सरकार।

धनुर्धर——बरें, मी आज घरींच जेवणार म्हणून सांग आंत ! अन् त्या श्रीखंड्याला धाडून दे इकडे !

गोट्या——जी होय ! ( जातो.

धनुर्धर——( स्वगत ) पण तिनें तरी भडिमार कां करूं नये ? ( श्रीखंड येतो, त्यास ) अरे, आज वीसपंचवीस मंडळींचा बेत होऊं दे जेवणाचा ! अन् काय करशील गोडाचें ?

श्रीखंड—श्रीखंडपुरी—शिरापुरी—बासुंदीपुरी——

धनुर्धर—पुरे कर तुझ्या पुऱ्या ! साखरभातच कर, अन् जिलब्या अन् बासुंदीपुरीही होऊं दे झालं !

श्रीखंड—जशी आज्ञा ! ( स्वगत ) माझं तर आज पोट खाव फुटणार !

[ जातो.

धनुर्धर—( स्वगत ) ठीक, ही मेजवानीची कल्पना ठीक सुचली ! बायकांचा राग घालवायला मेजवानीच्या बेतासारखा दुसरा उपाय नाहीं !

[ जातो.

## प्रवेश दुसरा

( स्थळ—धनुर्धरांच्या बंगल्यांतील एक दिवाणखाना. सुभद्राबाई, बकुळाबाई, शेवंतिबाई, शारदाबाई व इंदिराबाई बसल्या आहेत, असा प्रवेश )

इंदिरा—-बकुळाबाई ! नीट सांगा मला एकदां ! काय, आमचे पतिराज काय म्हणत होते ?

बकुळा—-दुसरं काय ? ती महालज्जान कीं कोण—

इंदिरा—-बाई-बाई ! मग पुरंच नशीब फुटलं माझं !

शेवंति—-पण बाई, आमचे पतिराजहि म्हणत होते तेव्हां आतां म्हणायचं तरी काय !

सुभद्रा—नि आमची स्वारीहि असंच म्हणत होती, म्हणून म्हणतांना !

बकुळा—नि आमच्या स्वारींचे काय चाळे चालले आहेत दुसरे ?

शारदा—-एकूण, ह्या असल्या गोष्टी ऐकायला का आमची ही स्वारी जात असते रविवारच्या रविवारीं क्लबांत !

सुभद्रा—-बाई, वैतागून नि रडून काय उपयोग ? अदृष्टांत असेल ते भोगलं पाहिजे !

शारदा—असं हातपाय गाळून कसं चालेल बाई ! मीं सांगितला तोच उपाय योजून—बायकांच्या क्लबाचं हें बंड मोडलं पाहिजे ! चला, उठा आधीं ! आतां विलंब कसला ?

सुभद्रा—-गाड्या तयार झाल्या कीं गोट्या येऊन सांगेल; तोंपर्यंत ह्या पुरुषी बंडखोरांचा जमाव इथं मेजवानीला कसा काय जमतो; ते तर पाहूं !

( धनुर्धर, सोकरभाई, लंबोदर, भय्यासाहेब व विद्याधर प्रवेश करितात. बायका उठून उभ्या रहातात. )

धनुर्धर—-क्षमा करा बाईसाहेब ! आम्हांकडून सहस्र अपराध झाले असले तरी ते पोटांत घालून आजचा हा मेजवानीचा बेत केला आहे तो साजरा करा हीच सर्वांना विनंती आहे !

गोट्या—( येऊन ) गाड्या तयार आहेत बाईसाहेब !

सर्व पुरुष—गाड्या ?

सर्व बायका—होय महाराज !

धनुर्धर—मग मेजवानीचा बेत कितीचा धरायचा ?

सुभद्रा—आपल्या मर्जीस येईल तेव्हांचा !

धनुर्धर—नाहीं, तुमच्या सोयीस पडेल तेव्हांचा !

सुभद्रा—आमच्या सोयी ? अगबाई ! आमच्या सोयी ! म्हणजे नवलच आहे मोठ !

धनुर्धर—नवल तें कसलें ?

सुभद्रा—बायकांच्या सोयी पाहिल्या आहेत का कधीं कुणीं ? सगळ्या सोयी पहायच्या त्या तुमच्या पुरुषांच्या ! पण आम्हांला इथं आज जेवायचंच नाहीं मुळीं ! आमच्या क्लबांतच जेवण होणार आहे आमचं ?

इतर सर्व पुरुष—तुमच्या क्लबांत ! बायकांचा क्लब ?

धनुर्धर—अन् तुमचं क्लबांत जेवण ?

सुभद्रा—हो-हो ! पुरुषांचीं कशी क्लबांत जेवणं होतात ? तशींच आमचीं आमच्या क्लबांत बरं—

बकुळा—नि चहाहि क्लबांतच बरं—

शेवंती—नि कदाचित् रात्रींचं जेवणहि क्लबांतच बरं—

बकुळा—नि कदाचित् झोंपूंहि क्लबांतच बरं—

लंबोदर—काय आपण सगळ्याजणी क्लबांतच जेवणार अन् झोंपणार ?

बकुळा—हो, हो ! माझ्या अंगाची नुसती लाही लाही होते आहे ! चला ग बायानों ! वेळ होतो आपल्याला !

शारदा—सुभद्राबाई, तुमच्या गीतेलाहि बरोबर घ्या ! तिलाहि आज पहिला धडा देऊं गृहिणीधर्माचा !

सुभद्रा—हो ! हो बाई ! चला !

( बायका जातात. पुरुष आश्चर्यानें स्तंभित होऊन एकमेकांकडे पहात रहातात व नंतर पोट धरून हंसत आंत जातात. )

---

## प्रवेश तिसरा

[ स्थळ—धनुर्धररावांच्या बंगल्यांतील एक दालन.
सुभद्राबाई व गोट्या प्रवेश करितात. ]

सुभद्रा—बघ गोट्या, कळलं ना तुला काय काय करायचं तें ?

गोट्या—होय सरकार, कळलें मला सगळें! आतां नको आपल्याला त्याची काळजी!

सुभद्रा—हे घे–हे पांच रुपये तुला बक्षिस! नि नीट बेत पार पाडलास, कीं, आणखी तितकेच ठेवलेले म्हणून समज! आधीं कांहीं त्याची डाळ शिजू देऊं नकोस! नि घरेच चांगले वैतागून गेले, अन् काकुळतीला येऊन गयावया करायला लागले, कीं, ये त्यांना आमच्या क्लबांत–इनामदारांच्या रहात्या बंगल्यांत घेऊन! तोंपर्यंत आम्ही करतों त्यांच्या स्वागताची तयारी! [ जाते.

गोट्या—( स्वगत ) पांच रुपये हे आधींच! अन् बेत पार पडल्यावर आणखी पांच! अन् शिवाय ह्या रावसाहेबांना वैतागून काकुळतीला आणून या बायकांच्या क्लबाची जागा दाखविण्याबद्दल प्रत्येकीं कांहीं नाहीं तरी पांच पांच काढतींच! अबबबब! म्हणजे किती होणार!

( बॅ. धनुर्धर प्रवेश करितात. )

धनुर्धर—गोट्या!

गोट्या—जी सरकार!

धनुर्धर—अरे ही–ह्या कुठें गेल्या ?

गोट्या—बाहेर गेल्या सरकार!

धनुर्धर—( त्याचा कान धरून ) बाहेर गेल्या हें कळलें गध्या! पण बाहेर कुठें गेल्या ?

गोट्या—बाहेर क्लबांत गेल्या सरकार!

धनुर्धर—( दुसरा कान धरून ) क्लब! क्लबांत गेल्या हें ठाऊक आहे माणसाच्या कार्टा! पण तो क्लब कुठेंसा आहे ?

गोट्या—क्लब कुठेंसा आहे! तवढें मात्र विचारूं नका सरकार! बाईसाहेबांनीं ह्या तोंडाला कुलूप घालून किल्ली बरोबर नेली आहे सरकार!

धनुर्धर—किल्ली ( ठोसे लगावून ) ही घे किल्ली, नि उघड तोंड आतां! नाहीं तर उघडतों तोंड चांगलं !

गोट्या—नाहीं-नाहीं. सरकार ! ते तसें नाहीं उघडायचें ! पैशाची किल्ली लागते त्याला···पैशाची ! एरवी नाहीं उघडावयाचें तें कितीही फोडलेंत तरी ?

धनुर्धर—असें असें ? अरे लेका ! बरं ही घे पैशाची किल्ली ! ( त्याला एक रुपया देतो ) अन् उघड आतां !

गोट्या—किल्ली पांच लिव्हरची आहे सरकार, पांच लिव्हरची ! एक लिव्हरच्या किल्लीनें कुलूप नाहीं उघडायचें !

धनुर्धर—अरे चोरा ! बरें, घे हे पांच रुपये !

गोट्या—आतां ठीक. इनामदारांच्या बंगल्यांत गेल्या आहेत सगळ्याजणी ! तिथें भरायचा आहे त्यांचा क्लब !

धनुर्धर—असें काय ! बरं आहे ! [ जातो.

गोट्या—( स्वगत ) हा सरकारस्वारीचाच प्रसंग कसा काय निभावतो याची काळजी होती मोठी ! पण हा तर निभावला आतां चार रट्टे खावे लागले ? पण कांहीं फिकीर नाहीं ! आतां ह्या बाकीच्या रावसाहेबांची नाहीं मला काळजी ! अंगाला हात लावून घेतांन पांच पांच रुपये काढतो प्रत्येकाकडून तरच हा नांवाचा गोट्या !

[ डॉ० लंबोदर, सोकरभाई वगैरे मंडळी प्रवेश करतात. ]

लंबोदर—अरे ! छोकरा ! छोकरा !

गोट्या—( प्रवेश करून ) जी सरकार !

भय्यासाहेब—अरे, या बायकांचा क्लब कुठेसा आहे तुला ठाऊक आहे ?

गोट्या—हो हो, रावसाहेब ठाऊक आहे मला !

सोकरभाई—मग बोल—बोल ! अन् हा घे रुपया तुला बक्षिस !

गोट्या—( रुपया खिशांत टाकून ) रुपया, दहा रुपये दिलेत तरीं नाहीं सांगणार साहेब ! गुपित आहे तें गुपित !

लंबोदर—अरे असें काय करावें बेटा ! हें घे आणखी बक्षिस ! ( आणखी पांच रुपये देतात. )

भय्यासाहेब—हे घे आणखी—

सोकरभाई—हे घे आणखी, पण सांग—आटप !

गोट्या—( रुपये खिशांत टाकीत टाकीत ) पण साहेब — पण साहेब—

[ डॅ. धनुर्धर प्रवेश करितात. ]

धनुर्धर—मंडळी चला ! चला आधीं !

इतर सर्व—पण जाणार कुठें !

धनुर्धर—इनामदारांच्या इथें !

गोट्या—( स्वगत ) काय करावें धनीसाहेबांना ! आले कशाला इतक्यांत ? ( उघड ) होय सरकार ! इनामदारांच्या रहात्या बंगल्यांत—

धनुर्धर—मित्र हो ! चला, गनीमाच्या अगदीं गोटांत जाऊन त्याला गर्भगळित करूं !

लंबोदर—चला ! विलंब नको ! बाकी मी एकटा बस्स आहें हें बायकांचें बंड मोडायला !

सोकरभाई—डॉक्टरसाहेब, धीरे घ्या ! सेनापतीनें असें अधीर होऊन चालत नाहीं !

भय्यासाहेब—हो, जें कांहीं करायचें तें नीट विचारानेंच केलें पाहिजे !

लंबोदर—शूर मर्द हो ! ही परीक्षेची वेळ आहे ! पुरुष श्रेष्ठ, कीं, बायका श्रेष्ठ हें ठरण्याचा जिथें प्रसंग, तिथे कसला धीर अन् विचार घेऊन बसलांत ? चला ! बोला-हरहर महादेव !

गोट्या—पण रावसाहेब ! ह्या स्त्रीराज्यांत पुरुषांचा प्रवेश होणार कसा ? पुरुषांना ह्या क्लबांत जाण्याची बंदी आहे !

सर्वजण—काय बंदी ?

भय्यासाहेब—माझ्या घरात मला बंदी ?

गोट्या—होय सरकार ! पण मी काढतों त्याला तोड, अन् करवतों आपला प्रवेश ! नि अशा ठिकाणीं आपल्याला नेऊन बसवितों, कीं, तिथून आपल्याला सगळें कांहीं पहायला नि ऐकायला मिळेल ! पण मला आणखी बक्षिसी मिळाली पाहिजे !

लंबोदर—चल ! चल आधीं ! मग देऊं रगड बक्षिस !

धनुधर---पण पोरट्या ! लक्षांत ठेव, कांहीं लपंडाव खेळशील तर चामडीच नरम करीन !

गोट्या---असें कसें करीन सरकार ? चलावें तर ? [सर्व जातात.

---

## प्रवेश चवथा

( स्थळ--भय्यासाहेब इनामदारांच्या रहात्या बंगल्यांतील एक विस्तीर्ण दिवाणखाना. दिवाणखान्याच्या एका टोंकास टेबलखुर्ची व दोन्ही बाजूंस खुर्च्यांच्या रांगा. दुसऱ्या टोंकास एक दरवाजा व त्यावर जाळीचा पडदा खुर्च्यांवर शारदाबाई, सुभद्राबाई, बकुळाबाई, शेवंतिबाई, इंदिराबाई व गीता ह्या बसल्या आहेत, असा प्रवेश. )

शारदाबाई---येथवर तर बाई या पुरुषांच्या धावीं आपण थोडीफार दणाणविलींच आहेत ! आतां एकदां आपला गोटया त्यांना इथं घेऊन आला, कीं, आपली फत्तेच झाली म्हणून समजा !

इंदिरा---हें नसतं नाटक करून एकदां बाई ह्या क्लुबांचं बंड मोडलं, कीं, मिळविली !

सुभद्रा---हो, म्हणजे ह्या पुरुषांच्या पुंडाईला कांहीं तरी खराखुरा आळा बसेल !

[ गोटया घाईघाईनें प्रवेश करितो. ]

गोट्या---सगळ्या स्वाऱ्यांना आणलें आहे ! पलीकडल्या दरवाजानें त्यांना जाळीच्या पडद्यांत नेऊन बसवूंना ?

इंदिरा---होय ! टीक नेऊन बसीव.

बकुळा---गपचिप बसा म्हणावं !

गोट्या---जी होय ! [ जातो.

शेवंति---छान खोड मोडली यांची ! आम्हांला पडद्यांत बसवितां, नाहीं का ? बसा म्हणावं आतां तुम्हीच पडद्यांत !

शारदा—आतां कामाला आरंभ करायला कांहीं हरकत दिसत नाहीं. तेव्हां प्रथम अध्यक्षिणीचा निवड होऊं द्या!

इंदरा—हो, सुभद्राबाई, तुम्हीच उठा!

सुभद्रा—( उभी राहून ) सभ्य गृहिणींनो आणि भगिनींनो! आज आपण इथं कोणत्या कार्याकरितां जमल्या आहों, हे सर्वजणींना ठाऊक आहेच. कामाला आरंभ होण्यापूर्वी अध्यक्षिणीची नेमणूक व्हायला हवी; म्हणून मी आजच्या सभेचं अध्यक्षस्थान माझ्या विद्वान मैत्रिणी श्रीमती सौ. शारदाबाईसाहेब यांनी स्वीकारावं, अशी सगळ्याजणींच्या वतीनं मी त्यांना विनंती करत्यें.

शेवंती—या सूचनेला मी अनुमोदन देत्यें!

[ शारदाबाई टाळ्यांच्या गजरांत उठून अध्यक्षस्थानाजवळ जातात. ]

शारदा—प्रेमळ मैत्रिणानो! तुम्हीं जो मला आज हा मोठा मान दिला आहे, त्याबद्दल मी तुम्हां सगळ्याजणींचे अंतःकरणापासून आभार मानत्यें! आतां पहिला ठराव श्रीमती सौ. बकुळाबाई डॉक्टरीण या पुढें आणतील.

बकुळा—प्रिय भगिनींनो! हल्लीं आपल्या देशांत ह्या क्लबांचा—पुरुषांच्या ह्या कळपाचा कसा सुळसुळाट झालेला आहे, व त्यामुळें आपल्या गृहसौख्याचा कसा भंग होत आहे, हें आपणां सर्वजणींना चांगलं ठाऊक आहेच! कित्ती 'ऐक्य-धक' क्लबांनीं घरांत पतिपत्नींमधें एकीची नेकी केली आहे, किती 'नीतिप्रचारक' क्लबांनीं पुरुषांना अनियमितपणं वागण्याची सवड देऊन आम्हा बायकांच्या जन्माची माती केली आहे, किती 'विश्व-बंधुत्वप्रचारक' क्लबांनीं पुरुषांना व्यसनासक्त बनवून आम्हा गरीब गाईंच्या सुखाची राखरांगोळी केली आहे ह्या गोष्टीचा विचार केला, म्हणजे आपण बायकांनीं आतां स्वस्थ बसण्याचे दिवस गेले, आपल्या गृहसौख्यावर घाला घालणाऱ्या ह्या क्लबांचे बंड मोडणाऱ्या तयारीला लागण्याची व त्यांचे निर्मूलन करण्याच्या उद्योगाला लागण्याची वेळ आतां आली आहे. हें सर्वजणींना पूर्णपणें कळून येईल! तेव्हां ह्या तयारीला लागण्याकरतां व आपल्या उच्च हेतुच्या सिद्ध्यर्थ मी असा ठराव पुढें आणत्यें, कीं, "स्त्रीवर्गाच्या हक्काचं संरक्षण करण्याकरितां आपण आपला बायकांचा क्लब 'महिलासमाज'

नांवाचा स्थापन केला आहे, व आपल्या हक्कांच्या संरक्षणाकरितां म्हणून आपण पहिली गोष्ट ही करावयाची, कीं, पुरुषाचेंच अनुकरण करून आपण सर्वजणींनीं आजपासून आपल्या जेवणाखाणाची व झोंपण्याची व्यवस्था आपल्या ह्या क्लबांतच करावयाची ! आणि मुलाबाळांच्या समाचाराकरितां म्हणून दिवसांतून फक्त एकदोन वेळा घरीं चक्कर घालून यावयाची !" बायांनो ! ह्या ठरावाला आपण टाळ्यांच्या गजरानें आपली संमति द्याल, अशी मला आशा आहे ! ( टाळ्यांचा गजर होतो. )

शारदा—( उठून ) हा पहिला ठराव एकमतानें पसार झाला आहे असें मी जाहीर करितें ! आतां दुसरा ठराव श्रीमती सौ. शेवंतीबाई इंजिनियरीण ह्या पुढें आणतील.

लंबोदर—( जाळीच्या पडद्यांत ) अरे बापरे ! खरोखरच ठराव पसार झाला !

इतर पुरुष—( पडद्यांत ) खरोखरच !!

विद्याधर—चला मंडळी ! शरण गेल्यावांचून आतां तोड नाहीं दुसरी !

अप्पासाहेब—तोड नाहीं !

सोकरभाई—बिनतोड गोष्ट !

धनुर्धर—उठा सेनापति !

लंबोदर—काय ? बायकांना शरण जायचें ?

इतर पुरुष—नका जाऊं ! आम्ही जातों, मग तुम्ही नि तो तुमचा क्लब खुशाल नांदा !

लंबोदर—नाइलाज आहे ! तुमचें—मंडळीचें—कसें मोडावें ? आपणच हें क्लबाचें बंडच मोडून टाकलेलें पुरवलें ! चला !

[ सर्व पुरुष पडदा बाजूला करून आंत घुसतात. बायका उठून उभ्या रहातात. ]

विद्याधर—( शारदेस ) चुकलों ? क्षमा व्हावी ? पुनः क्लबांत म्हणून जाणार नाहीं ?

धनुर्धर—( सुभद्रेस ) चुकलों ! क्लबाचें नांव नाहीं यापुढें घेणार !

सोकरभाई—( शेवंतीस ) माफ करा ! क्लब मोडून टाकला ?

भय्यासाहेब—( इंदिरेस ) चुकी झाली ! पुनः होणार नाहीं !

लंबोदर—( वकुळेस ) शरण येतों ! क्लबाचें बंड मोडून टाकलें आतां !

वकुळा—त्या तिला शरण जा ! तें कांहीं चालायचें नाहीं ! आम्ही म्हणून ऐकणार नाहीं. तुमचं हें क्लबाचं बंड नि हे टंग तुम्ही खुशाल चालवा; आम्ही आमचा हा क्लब असाच चालवूं !

लंबोदर—क्लबाचे बंड पार मोडून टाकलें ! अन त्याला तिला आज-पासून रजा दिली ! क्षमा कर, हात जोडतों, पुनः म्हणून असल्या फंदांत पडणार नाहीं ! शपथेवर सांगतो !

इतर सर्व पुरुष—आम्हीहि हे पहा कान पिळून घेतो ? याउपर केव्हांहि वांकडें पाऊल म्हणून टाकणार नाहीं.

शारदा—माझं ऐका आतां बायांनो ! यांच्या शपथेवर विश्वास ठेवून आपण हें आपल्या क्लबाचं बंडहि मोडून टाकूं, नि ह्याच आशयाचा दुसरा ठराव श्रीमती सौ. शेवंतीबाई आतां पुढं आणतील ! मैत्रिणींनो, राहूं द्या, होऊं द्या समेट ! शेवंतिबाई आटपा, करा गोड शेवट !

शेवंती—मैत्रिणींनो ! आपल्या पहिल्या ठरावाचा नि त्या ठरावानं स्थापन झालेल्या क्लबाचा हेतु इतक्या लौकर सफल झाला, हा आपला मोठाच विजय होय ! आतां त्या ठरावाचं नि क्लबाचं कारणच उरलं नाहीं ! म्हणून मी दुसरा ठराव पुढं आणित्ये, कीं, “ आपल्या पतींच्या शब्दावर विश्वास ठेवून आपण आपला हा क्लब ह्या क्षणीं मोडून टाकला आहे, व यापुढं आपण आपल्या पतींसह व मुलांबाळांसह स्वगृहींच आनंदानं व सुखासमाधानानं वास करावा ! ” आतां ह्या ठरावाला आपण सर्वजणींनी व आपल्या पतींनीं टाळ्यांच्या गजरानं आपली संमति द्यावी, अशी मी विनंती करित्यें ?

( टाळ्यांचा गजर होतो )

शारदा—हा दुसरा ठराव पहिल्या ठरावाप्रमाणंच एकमतानं—नव्हे पहि-ल्यापेक्षां दुप्पट मतानीं पसार झालेला पाहून मला, तसाच आपणां सर्वांना फार आनंद होत आहे, हें स्वाभाविकच होय ! शेवटीं मला एकच गोष्ट सांगावीशी वाटते, ती ही कीं, एकोप्यानं हीं अशीं कार्यं घडतात ! एको-

ऐक्यानं—सहकारित्वानं आम्हीं अबलाहि प्रबल पुरुषवर्गाला नाकें घासायला लावूं शकतों, हें इथं आज आपल्याला प्रत्यक्ष पहायला मिळालं आहे! असो. आतां आजच्या सभेचं कार्य झालेलं आहे. तेव्हां सभा विसर्जन झाली असं समजाव.

( टाळ्यांचा गजर होतो. )

धनुर्धर—घरीं मेजवानीची तयारी झालेली आहे! आनंदाच्या प्रसंगाचें-ह्या समेटाचें स्मारक म्हणून सर्व बंधुभगिनींनी माझ्या येथें येऊन मला पंक्तिलाभ द्यावा. अशी माझी विनंति आहे!

( जयवंतराव प्रवेश करितात. )

शारदा—ह्या समेटाचं तर ही मेजवानी स्मारक आहेच! पण मी बोलल्याप्रमाणं हे जयवंतराव इथं आले आहेत, नि बॅरिस्टरसाहेबांची गीताहि इथं आहे, तेव्हां ' वधूदर्शनाविधी ' चं अन् ' वाङ्‌निश्चया'चीहि ही मेजवानी स्मारक व्हावी, अशी माझी श्रीमती सौ. सुभद्राबाईंना व बॅरिस्टरसाहेबांना विनंति आहे.

विद्याधर—या जयवंतराव, असे पुढं या अन पहा आपली वधू! ( गीतेला पुढें करितात )

जयवंत—( हंसून ) मीं पूर्वीच पाहिलेली आहे, व आपल्या विचाराला माझी पूर्ण संमतिहि आहे!

धनुर्धर—( गीतेचा व जयवंतरावाचा हात एकमेकांच्या हातांत घालून ) आजचा हा प्रसंग खरोखर मोठाच आनंदाचा! येथें जमलेल्या पतिपत्नीचें या प्रसंगीं पुनर्मीलन होऊन ह्याच प्रसंगीं माझ्या लाडक्या गीतेला जयवंतरावासारखा पति लाभला! आतां पुढल्याच मुहूर्तावर लग्नविधि होईल. गीते, जयवंतराव, सुखानें नांदा, आणि शतायु व्हा!

सुभद्रा—अन् क्रुबाचं केव्हांहि नांव काढूं नका!

सर्व पुरुष—आतां कसले क्रुब? क्रुबांचें बंड पार मोडलें!

सर्व बायका—तथास्तु!

धनुर्धर—चला, उशीर झाला. आजच्या आनंदाची मेजवानी वाट पहाते आहे, चला! [ जातात

**पडदा पडतो**

# [ २ ]

# सासूबाई

[ स्थळ——श्रीपादरावांच्या वाड्यांतील एक दिवाणखाना. श्रीपादराव व वैजनाथ चहा घेत आहेत असा प्रवेश. ]

श्रीपादराव--नाहीं ! वैजनाथ, तें चालायचें नाहीं ! आज तुला आमच्या इथें जेवायला आलेंच पाहिजे !

वैजनाथ——पण आज असें विशेष तें काय आहे ?

श्रीपादराव--सांगूं तुला ? हें बघ, आज आमच्या लग्नाचा वाढदिवस ! नायकांच्या भाषेंत बोलायचें म्हणजे आज आमचें 'वरिस नहाण!' नि शिवाय आमच्या सासूबाईहि रात्रीं इथें आल्या आहेत --

वैजनाथ--कोण मंजुळावहिनींच्या आई ? त्या मुद्दाम या समारंभाकरितां आल्या वाटतं ?

श्रीपादराव--नाहीं, मुद्दाम कांहीं नाहीं आल्या, येणें भागच पडलें !

वैजनाथ--म्हणजे ?

श्रीपादराव——त्या रुसल्या आहेत आपल्या चिरंजीवावर–अच्युतरावावर रुसून ? दुसरीकडे कुठें जाणार जांवईबुवावांचून ! तेव्हां इथें आल्या आहेत झालें रहायला. पण गड्या, हें मी माझें भाग्यच समजतों ! कारण, आजवर घरांत कायती ती एकटी–तुझी वहिनी ! नि त्यांत ती अगदीं अजाण, साधीभोळी ! आचारीपाणक्यावर–गडीमाणसांवर हुकमत चालवायला घरात एखादें चांगलें खंबीर, करारी माणूस लागतें. दिनुमामा आहेत, पण ते असून नसून सारखेच ! त्यांची ती ज्ञानेश्वरी बरी नि गीता बरी ! पण आतां छान बस्तान बसेल ! आमच्या सासूबाई चांगल्याच जहांबाज आहेत !

वैजनाथ--मग ठीक ! आतां तुझा संसार यंत्रासारखा ठाकठीक जमेल !

श्रीपादराव--अरे नुसता ठाकठीकचसा काय ? आतां माझ्या संसारसुखाला नि भाग्याला सीमाच नाहीं म्हणेनास ! पण वैजनाथ, हें भाग्य मला कशामुळें लाधलें, याचा विचार तरी केलास ? लग्नामुळें-अरे लग्नामुळें बरें ! अरे लग्नासारखें जगांत सुखाचें दुसरें साधन नाहीं. गड्या, तूं लग्न कर ! गृहस्थाश्रमासारखा आश्रम नाहीं ! ' धन्य धन्य हा गृहस्थाश्रम ' म्हणून साधुसंतांनींसुद्धां याचीं स्तुतिस्तोत्रें गाइलीं आहेत !

वैजनाथ--( चहाचा बशीपेला खालीं ठेवून ) खरोखर श्रीपाद, तुमच्यासारखें सुखी जोडपें पाहिलें, म्हणजे माझा निश्चय डळमळतो, नि वाटतें--

श्रीपादराव--शेजारच्या वीणाताईसारख्या एखाद्या रूपगुणसंपन्न बालविधवेला सनाथ करावी, असेंच की नाहीं ? ( बशीपेला खालीं ठेवून ) वा ! मग आणखी काय पाहिजे ? वीणाताईची तुला मुळींच नको काळजी ! भी तिचें मन वळविलेंच आहे, नि तुझेंहि वळवितों आहे. देव करो, नि तुम्हां दोघांच्या मनांत ही गोष्ट खरोखर येवो ! हें पहा वैजनाथ, आमच्या वीणाताईसारखी गुणी व हुशार मुलगी तुला शोधून मिळायची नाहीं ! अनाथबालिकाश्रमांत जाऊन तिला दोन वर्षें झालीं नाहींत, तों तिच्या इंग्रजी पांच इयत्ता होऊन वीणकाम, तुणकाम, शिवणकाम, झिगाचें व रेशमाचें काम ती इतक्या बहारीचें करूं लागली आहे, कीं पहातच रहावें ! आजच्या प्रसंगीं आम्हांला अहेर करण्याकरितां म्हणून तिनें एक रेशमी रुमाल काढला आहे, तो तर अगदीं अप्रतिम नटला आहे ! लतापुष्पांनीं त्याची कडा नकसून मध्यें आम्हां दोघांच्या छब्या तिनें इतक्या हुबेहूब काढल्या आहेत, कीं, एखादा कुशल चित्रकारहि तोंडांत बोट घालील ! पण ही अहेराच्या हातरुमालाची गोष्ट बोलूं नको हां तुझ्या वहिनीजवळ ! तिला न कळत वीणाताईनें हें काम केलें आहे; ती अहेर करीपर्यंत तिला तें कळूं द्यायचें नाहीं, असा तिचा बेत आहे. मला तरी कळलें म्हणजे काय--अगदीं अकल्पित रीतीनें. परवां आश्रमांत गेलों होतों तेव्हां ती त्याच रुमालावरच्या आमच्या चित्रांचें काम करीत बसलेली आढळली.

वैजनाथ--पण तूं मंजुळा वहिनींपासून हें गुपित कसें ठेविलेंस ?

श्रीपादराव--कसें ठेविलें ! अरे असलें गोड गुपित योग्य वेळेपर्यंत गुप्त

टेविण्यांत जी कमालीची गम्मत असते, ती आधीं कळविण्यांत नाहीं ! म्हणून अगदीं बोलूं नको हो ह्याबद्दल अगदीं अवाक्षरहि !

वैजनाथ—ठीक आहे, त्याची नको काळजी !

[ मंजुळा प्रवेश करिते ]

श्रीपादराव—काय, आईसाहेब उठल्या का ?

मंजुळा—होय, आतांच उठली.

वैजनाथ—एकूण, आता काय अगदीं बहार झाली दोघांचीहि ! वहिनींना आपल्या बंगाली शिक्षणाकडे नि श्रीपादरावांना आपल्या मासिकाकडे आतां बरेंच अधिक लक्ष्य द्यायला सापडेल, नाहीं वहिनी !

मंजुळा—( हंसून ) होय, काय घडेल तें खरं बाई !

[ दिनुमामा ज्ञानेश्वरी हातांत घेऊन प्रवेश करितात ]

दिनुमामा—काय, चंडिकाकाकू उठल्या का ?

मंजुळा—होय, आई उठली आहे. ( समोर पाहून ) ती पहा, ती इकडेच येते आहे ! ( चंडिकाबाई प्रवेश करितात. )

श्रीपादराव—झोपबीप चांगली लागली ना ?

चंडिकाबाई—हो ! न लागायला काय झालं ! मेल्यासारखी पडलें तिन्ही सांजपासून ! पण ( दिनुमामाकडे बोट करून ) हे—हे कोण ?

श्रीपादराव—हे दिनुमामा ! लग्नांत होतेच हे; आपण ओळखलें नाहींत वाटतें !

दिनुमामा—काकू, मी लग्नांत होतों !

चंडिकाबाई—असाल बाई, मला नाहीं ओळख रहात माणसांची ! ( श्रीपादरावांस ) नि हे इथंच असतात कीं काय !

वैजनाथ—( स्वगत ) सासूबाईच्या अमलाला आरंभ तर छान सोळा आणे झाला !

मंजुळा—हो आई, हे मामंजी, हे इथंच असतात !

दिनुमामा—( स्वगत ) आज पंधरा वर्षांनीं मला घरांतलीची—दामिनीची आठवण कां बरें व्हावी या बाईची जिव्हा चालूं लागतांच ?

( ज्ञानेश्वरी वाचीत निघून जातात.

चंडिकाबाई—( वैजनाथाकडे पाहून ) नि हे कोण? हेहि इथंच असतात कीं काय?

श्रीपादराव—नाहीं! हे माझे मित्र वैजनाथ! हे इथं आपल्या घरीं असतात.

( केन्या गडी प्रवेश करतो. )

केन्या—( मंजुळेस ) वीणाताईसाहेब आल्या आहेत.

मंजुळा—धाडून दे त्यांना इकडेच! ( केन्या जातो.

चंडिकाबाई—( स्वगत ) ह्या ताईसाहेब कोण? इथं बाई बऱ्याच ताई-साहेबांच नि रावसाहेबांचं येणं दिसत!

( वीणा प्रवेश करते. )

वीणा—तुमच्या आईसाहेब आल्याचं ते आतांच कळलं मला मंजुळाताई. कुठं आहेत त्या? ह्याच का?

चंडिकाबाई—हो हो, हीच तिची आई मी, बरं मुली! पाहिलीस मला नीट? ( स्वगत ) बरीच फुटाणी दिसते!

( वीणा चकित होऊन श्रीपादरावांकडे पहाते; श्रीपादराव खालीं पाहूं लागतो; वैजनाथ हंसूं लागतो व टेबलावरील वर्तमानपत्र उचलून घेऊन वाचण्याचं मिष करतो. )

श्रीपादराव—( मंजुळेस ) चहा देवीव जा वीणाताईला! ( मंजुळा जाते.

चंडिकाबाई—( स्वगत ) चहा! हे चहाचं बंड भारीच बाई माजलं आहे आतांशा! उठल्याबसल्या चहा!

श्रीपादराव—( वीणेस हळूच ) आलीस केव्हांशी आश्रमांतून!

वीणा—( हळूच ) ही आतांच आल्ये. आई म्हणाली, तुमच्या सासूबाई आल्या आहेत; म्हणून लागलीच इकडे आल्ये!

श्रीपादराव—कीं, वैजनाथ इकडे आल्याचें कळलें!

वीणा—ही काय बाई भलतीच थट्टा!

श्रीपादराव—बरें, पण--रुमालाचें काम झालें का पुरें!

वीणा—झालं आहे बरंबाईट. आणल्यें दाखवायला अमळशानं.

श्रीपादराव—आमच्या सासूबाईंना पाहिलेंसना नीट?

वीणा---हो चांगल्याच पाहिल्या बाई !( दोघेहि हंसतात. )

चंडिकाबाई---( स्वगत ) हंसताहेत नि कुजबुजताहेत काय हो ! हें लक्षण कांहीं बरं नाहीं दिसत ! माझ्या पोरीच्या कल्याणासाठीं घातलंच पाहिजे मला यांत लक्ष.

[ मंजुळा प्रवेश करते. ]

मंजुळा---चला वीणाताई चहा प्यायला, कीं, इकडेच आणवूं !

वीणा---वा ग ! तूं तरी गम्मतच करतेस ! ही मीच आंत येतें.

मंजुळा---तूंहि चल आई स्नानाला आतां.

चंडिकाबाई---हो बाळ, बरी आठवण केलीस–नि त्यांत आज वरिस नहाण ! [ वीणा, मंजुळा व चंडिकाबाई जातात.

श्रीपादराव---हे बघ वैजनाथ, करून तुझा काम निश्चय ! वीणाताईंची हमी मी घेतों !

वैजनाथ---मग बोलूं आपण मागाहून ! आतां मी जातों; तुलाहि बाहेर जायचें आहे ना ?

श्रीपादराव---हो, मंडळीला जेवणाचें आमंत्रण द्यायचें आहे. तुलाहि आलेंच पाहिजे बरें !

वैजनाथ--- मी हा असाच येतों घरीं कळवून, नि स्नान करून. तूं बाहेरून आला नाहींस तों मी इथें टेंबलेला !

श्रीपादराव---चला ! [ दोघेहि जातात.

---

## प्रवेश दुसरा

[ स्थळ---एक दालन. दिनुमामा आरामखुर्चीवर पडून ज्ञानेश्वरी वाचीत आहेत, असा प्रवेश. ]

दिनुमामा–( ज्ञानेश्वरी मिटून जांभया देत स्वगत ) आतां स्नानाला उठावें, बराच वेळ झाला.

[ दिनुमामा उठून उभे रहातात, तों चंडिकाबाई स्नान आटपून प्रवेश करतात. ]

चंडिकाबाई---( स्वगत ) पोरीच्या कल्याणासाठीं घातलंच पाहिजे बाई

ह्यांत मन ! ह्या दिनुमामाला विचारून बघावं, त्याला कितपत माहिती आहे ती. ( उघड ) दिनुमामा ! दिनुमामाच तुमचं नांव ना ?

दिनुमामा--होय काकू !

चंडिकाबाई--काकूबिकू करूं नका मला ! नीट नांवानं ह्मणत जा ! देवानं नीट नांव दिलें, नि तें टाकून आडमार्गांत कां शिरतां ?

दिनुमामा--( स्वगत ) प्रत्यक्ष चंडिकेचाच अवतार ! ( उघड ) होय चंडिकाका-( जीभ चावतो )-चंडिकाबाई !

चंडिकाबाई--असं विचारतें-खालीं बसा-

दिनुमामा-स्नानसंध्येची वेळ झाली. आटपून येतो.

चंडिकाबाई-कांहीं नको स्नानसंध्या आटपायला एव्हांशीच ! स्नान नि संध्या करून काय जेवायचंच किनई ! पण जेवण कुणी वाढून ठेविलें आहे इतक्या सकाळीच ? बसा खालीं-नि त्यांत आज वरांस नहाण ! ( दिनुमामा आरामखुर्चीवर बसतात. ) मी असं विचारतें-ही पोर आली होती आतां इथं-कपाळा आलेली-कोण वीणा कीं तंबोरी-ती नेहमींची येत असते का इथं ?

दिनुमामा-कोण-वीणा ? हो, नेहमीं येते इथं.

चंडिकाबाई-नेहमीं येते ! कशाला. येते कशाला इथं ?

दिनुमामा-म्हणजे ? शेजारच्या पुतळाबाईची ती एकुलती एक मुलगी. अनाथ बालिकाश्रमांतून रविवारीं घरी आली, कीं, इथें शेजारीं येणार नाहीं. तर कुठें जाणार ?

चंडिकाबाई-असं-पण ह्या आमच्या जावयांचं नि माझ्या पोरीचं नीट एक मन आहेना ?

दिनुमामा-एक मन ? आणखी तें कसें असायचें ? मूर्तिमंत रामसीतेचा जोडा आहे हा चंडिकाबाई !

चंडिकाबाई-पण मी पोरीची आईना ? आईचं मन-विचारल्यावांचून कसं रहावेल ? नीट सांगा, ही मेली वीणा कीं तंबोरी-कोण इथं येत असते ही-हिचं नि जांवयांचं कांहीं काळंबेरं नाहीं ना ? दिनुमामा, मला सगळं कळूं द्या !

दिनूमामा—( संतापून उठून उभे रहातात. ) कोणाचें ! श्रीचें नि वीणेचें ? चंडिकाकाकू ! काय बोलतां हें ?

चंडिकाबाई—रागावून नको जायला इतकं कांहीं—या पोरी मंजीच्या नि त्या कारट्या अच्युताच्या जीवावर मीं आजवर तिकडच्या मागं दिवस कंठले. त्या कारट्यानं एक ताळ सोडला, नि बायकोचा कड घेऊन माझा पाणउतारा केला, म्हणून इकडे आल्यें. म्हटलं, पोरीचं मुख पाहून तरी राहिलेले दिवस काढीन ! पण हिचाच जर संसार असा अळणी असला, तर कां नये जीवाची होळी होऊं ? तुम्हींच सांगा ! बसा खालीं, नि नीट सांगा. मी असं विचारत्यें—या दोघांचा संसार तुम्ही म्हणतां तसा जर सुतासारखा एकमनानं नि एकतंत्रानं चालला आहे, तर मग त्यांच्या सुखांत तिसऱ्या परकी माणसाचा लोकचा कशाला ?

दिनुमामा—म्हणजे ! लोकला कसला ! आपण इथें राहिल्यानें उलट सगळ्यांना आनंदच वाटेल चंडिकाबाई ! आपण का परकी आहां ?

चंडिकाबाई—कोण ! मी परकी ? मी माझ्याबद्दल बोलत्यें आहे कीं काय ?

दिनुमामा—नाहीं तर कुणाबद्दल ?

चंडिकाबाई—कुणाबद्दल ? दुसरं कुणाबद्दल तुमच्यावांचून ? का मी परकी ? मीं हिला जन्म दिला ना ? मला पोरीचं हिताहित पाहायला नको !

दिनुमामा—मी तें नाहीं म्हणतों का ? आपल्याला आपल्या मुलीचें हिताहित पाहिलें पाहिजे, मलाहि माझ्या भाच्याचें नको पाहायला ? चंडिकाबाई, तुम्ही इथें सुखानें नांदा, सगळ्यांना त्यांत आनंदच आहे ! नि मीहि श्रीला सोडून दुसरीकडे कुठें जाणार ? मला तो हवा आहे, नि मीहि त्याला हवा आहें ! मला तो—नि ही मुलगीहि—कंटाळायच्या नाहींत बरें चंडिकाबाई ? ( आरामखुर्चीवर बसतात. )

चंडिकाबाई—मग एकूण तुम्ही इथं रहाणारच तर ?

दिनुमामा—( स्वगत ) दामिनी इतकी कर्कशा बायको होती, तिलाहि मी भीक घातली नाहीं ? ती मेल्याला आज पंधरा वर्षें झालीं, तेव्हांपासून मी इथं आहें, तो का जायला बसलों आहें ? ( ज्ञानेश्वरी वाचीत बसतात. )

चंडिकाबाई—कां दिनुमामा, बोलत का नाहीं ? मग तुम्हांला 'जा' म्हणून स्पष्टच सांगावं लागणार तर. (दिनुमामा ज्ञानेश्वरींतील ओव्या स्वतःशीं पुटपुटतात.) दिनुमामा, असे वेडांत कां बरं शिरतां ? अशा गोष्टी का कुठं स्पष्ट सांगायलाच हव्यात ? एकंदर रागरंगावरून तुम्हाला का कळूं नये? मग इतके केस कशाला पिकविलेत ? ( दिनुमामा डोळे मिटतात. ) मी म्हणून तुम्हाला इतक्या मिनतवारीनं सांगत्यें नि सुचावित्यें बरं. ऐकायचं असलं तर ऐका, नाहीं तर तुमचं तुम्ही पाहून घ्या. ( स्वगत ) म्हातारा दबकला वाटतं ! न दबकून कुणाला सांगेल ? कीं झोंप लागली थेरड्याला ? अगबाई, खरंच झोंपीं गेला ? दिनुमामाला ( हालवून कानाशीं मोठयानें ) काय—निजलांत काय ?

दिनुमामा—काय, झालें काय सटवे, कैदाशीणीसारखें आरडायला ! ( डोळे उघडून ) कोण ? चंडिकाकाकू ? तुम्ही का ? मला वाटलें आमच्या घरांतलीनें आपला भडिमार चालविला आहे ? ( हंसून ) मला आपला अद्याप तिचाच वचक पडतो ! कुणी मोठ्यानें ओरडायला लागलें, कीं, वाटतें तिच्याच तोंडाचा पट्टा चालला आहे—

चंडिकाबाई—अरे थेरड्या ! मी सटवी ? मी सटवी ? मी—मी सटवी ? किडे पडोत तुझ्या जिभेला ! मला सटवी नि कैदाशीण म्हणतोस ? मला—या चंडिकेला—या चंडिकेला ? थांब थेरड्या, तुला इंगा दाखवित्यें या चंडिकेचा !

( वैजनाथ धावत धावत प्रवेश करतो. )

वैजनाथ—काय ? काय—झालें काय—आईसाहेब ?

चंडिकाबाई—(मटकन खालीं बसून हातावर डोकें आपटून) झालं काय? या थेरड्याच्या शिव्या ऐकायला आल्यें आहे वाटतं मी इथं जांवयांकडे-नि त्यांतून आज वरिस नहाण !

वैजनाथ—काय? मामासाहेब, काय, झालें तरी काय ?

दिनुमामा—जरा डोळा लागला होता—वाटलें, घरांतली ओरडत आहे—नि म्हणून—

चंडिकाबाई—मी—मी सटवी नि कैदाशीण काय ? या घरांत पाणी

प्यायला राहिल्यें नसत्यें तर बरं ! पण पोरीकडे पाहिलं पाहिजे–नि त्यांतून आज वरिस नहाण !

वैजनाथ–मामासाहेब, तुम्ही तिकडेच चला जरा !

( दिनुमामास घेऊन जातो. )

चंडिकाबाई–( स्वगत ) अरे थेरड्या ! तुला इथून घालवीन, तरच नांवाची चंडिका बरं मी ! पण आधीं त्या तंबोरीच्या बाबतींत वित्तंबातमी काढयला हवी ! त्यावांचून स्वस्थ नाहीं वाटायचं माझ्या जिवाला ! हो. कांहीं तरी असलंच पाहिजे काळंबरं ! त्यावांचून नाहीं इतका लघळपणा चालायचा तिचा जांवयांशीं !

[ मंजुळा प्रवेश करते. ]

मंजुळा–पाहिलंस आई, वीणाताई ऐकेच ना ! तिला नि तिच्या आईला जेवायला सांगायला म्हणून गेल्यें तिच्याकडे, पण कुठं सोडते आहे ! लागलीच चहा केलान् नि दिलान्, तेव्हां सोडलं —

चंडिकाबाई—बाळ, मी तुला असं विचारत्यें, नीट मन मोकळं करून सांग हं--नवऱ्याच नि तुझं चांगलं सुतासारखं जमलं आहे ना ?

मंजुळा—आई, हें काय विचारणं ? आणखी तें कसं असायचं ?

चंडिकाबाई – तें सगळं खरं पोरी ! पण तुला वाटतं तसंच आहेना ! जांवई नीट वागावेत ... वागतात ना तुझ्याशीं !

मंजुळा—आई, निकडची सर कुणाला तरी येईल ! माझ्या इतकी सुखी नि भाग्यवान् आहे कोण ?

चंडिकाबाई—बाळ, मला आनंदच आहे त्यांत ! पण हीं चाकरमाणसं नीट धाकांत आहेत ना तुझ्या ? मला तर नाहीं दिसत...

मंजुळा—आणखी ग कशीं असायचीं आई !

चंडिकाबाई—नि ही कोण मेली वीणा कीं तंबोरी–तुझी गोष्टी मैत्रीण समजतेस ती तिचं इथं येणं बरं नाहीं हो पोरी !

मंजुळा—म्हणजे ? तिची नि माझी तर चांगलीच गट्टी आहे—

चंडिकाबाई–मंजे, तूं अजाण आहेस ! तुला ह्या गोष्टी कळत नाहींत. पण तिचा तो नट्टापट्टा नि नूर मला तर बाई कांहीं बरा नाहीं दिसत !

मंजुळा—नट्टापट्टा ग कसला आई ! तिच्यांत जरा नीटनेटकेपणा आहे इतकंच.

चंडिकाबाई—बाळे, तूं असं म्हणतेस, पण ती तर तुझ्या नवऱ्याशीं गप्पाशीं खिदळत काय होती, नि कुजबुजत होती किती तरी !

मंजुळा—मग त्यांत काय बिघडलं आई !

चंडिकाबाई—त्यांत काय बिघडलं ! मी तुला जन्म दिला आहे, मला तुझं सुख पाहिलं पाहिजे ! तुला सांगून ठेवत्यें, तुझ्या नवऱ्याचं नि त्या सटवीचं कांहीं तरी तसंच काळेबेरं आहे—

मंजुळा—काय ! तिकडचं नि वीणाताईचं !

चंडिकाबाई—मनाशीं पक्की गांठ बांधून ठेव, त्या तंबोरीचं नि तुझ्या नवऱ्याचं तसंच कांहीं चोरटं चमत्कारिक आहे ! अग, मीं ह्या कानांनीं त्यांना कुजबुजतांना ऐकलं !

मंजुळा—( घाबरून ) आई खरंच !

चंडिकाबाई—मंजे, खरंच नाहीं तर मी खोटं सांगेन !

मंजुळा—मी तिकडे विचारीन ! मजजवळून चोरून ठेवणं व्हायचं नाहीं तिकडून !

चंडिकाबाई—पोरगी वेडी तर नाहीं ! अग, अशा गोष्टी का पुरुष सांगत असतात बायकांजवळ ! हं बघ—तेच आले. तूं आपली जा आंत. मी बघत्यें त्यांचा समाचार.

[ श्रीपादराव प्रवेश करतो. ]

श्रीपादराव—तोंड गोरेंमोरेसें झालें आहे हिचें ! नि आपणहि रागावलेल्या दिसतां आईसाहेब ?

मंजुळा—( तोंड फिरवून ) मला नाहीं माहीत ! मी आपली खोलींत जाऊन रडत्यें पोटभर ! [ जाते.

श्रीपादराव—म्हणजे, झालें तरी काय ?

चंडिकाबाई—पोरीची जात, मन हळवट आहे ! कळूं लागेल तिला आपोआप सारं—पण आपणहि तिच्या हौसा नकोत का पुरवायला ?

श्रीपादराव—तिच्या हौसा नि कोणत्या नाहींत पुरविल्या ? तिनें सांगायचा अवकाश, तों होतें आहेना सगळें तिच्या मनासारखें ?

चंडिकाबाई—असो, चाललंच आहे, पोरवय आहे; ( स्वगत ) चांगला खरपूस समाचार घेईन म्हणून म्हटलं, पण बाई धीरच कसा होत नाहीं.

[ केन्या गडी प्रवेश करतो व श्रीपादरावाच्या कानात कांहीं पुटपुटतो. ]

चंडिकाबाई—( स्वगत ) हीं काय खलबतं चाललीं आहेत बाई !

श्रीपादराव—( केन्यास ) बरें येतों मी !

चंडिकाबाई—हें पाहिलं का ? तुमचीं चाकरमाणसं भारीच उमेट नि बेमुर्वतखोर आहेत !

केन्या—आईसाहेब आम्ही आपलीं लेंकरें, नि असें कसें करूं !

श्रीपादराव—काय रे केन्या ?

केन्या—नाहीं धनी ! असें आम्ही करूं तरी कसें ?

श्रीपादराव—खबरदार कोणी काडीभर दुर्लक्ष्य केलेंत तर आईसाहेबांच्या हुकमाकडे ! याद राखून ठेवा !

केन्या—पण आम्ही करूं कसें असें सरकार ?

श्रीपादराव—( स्वगत ) आरंभ तर मोटा बहारीचाच झाला आहे आमच्या सासूबाईच्या कारभाराचा ! आतां ह्याची अखेर कशी होणार, देव जाणे ! [ जातो.

केन्या—( स्वगत ) कडकलक्ष्मीचेंच वारें दिसतें आहे बाईचें ! आजपर्यंत रागें भरले नव्हते धनी कधीं ! पण ह्या बयेमुळें रागावून घ्यावें लागलें आज ! [ जातो.

चंडिकाबाई—( स्वगत ) उलटाच्यासुलटा झालेला दिसतो बाई पोरीच्या संसाराचा गाडा ! बरी मी अगदीं ऐन वेळेवर आल्यें इथं ! नाहीं तर पोरीची कांहीं धडगत नव्हती—नि त्यांत आज वरिस नहाण ! [ जाते.

---

[ स्थळ—एक खोली. दिनुमामा व वैजनाथ बोलत बसले आहेत, असा प्रवेश. ]

वैजनाथ—एकूण मामा, आपली उचलबांगडी करण्याचा आईसाहेबांचा मनोदय आहे म्हणता ?

दिनुमामा—ती पुष्कळ म्हणेल! पण मी तिला थोडीच भीक घालणार आहे!

[ श्रीपाद प्रवेश करतो. ]

वैजनाथ—या जांवईबोवा! तुमच्या सासूबाईंनीं काय हें मनांत आणलें आहे—मामांची उचलबांगडी करायचें?

श्रीपादराव—म्हणजे?

वैजनाथ—म्हणजे त्यांनीं हें आतांच मामांना विचारलें, कीं, आपल्या मुलीच्या नि जांवयाच्या सुखांत तुमचा खोकला कशाला?

[ दिनुमामा ज्ञानेश्वरी उघडून वाचूं लागतात. ]

श्रीपादराव—काय! हद्दच झाली आतां! तें कांहीं नाहीं, ह्या लांब्या कारभाराला आतां घातलाच पाहिजे आळा! पण वाईट इतकेंच वाटतें, कीं, आज आमच्या लग्नाचा वाढदिवस, नि आजच अशा संताप आणणाऱ्या गोष्टी घडाव्या!

वैजनाथ—मग तो रुमाल पहायला मिळाला का?

श्रीपादराव—नाहीं, पण आतां इतक्यांत तो घेऊन येईल वीणाताई इथें— ती पहा आलीच! ( वीणा प्रवेश करते तिला पाहून ) ये! शंभर वर्षे आयुष्य आहे तुला. वैजनाथानंहि आतांच तुझी आठवण काढली होती—

वीणा—ही काय भेली थट्टा!

[ चंडिकाबाई येऊन दाराआड उभ्या राहतात. ]

चंडिकाबाई—( स्वगत ) आतां ह्या सटवीचा लघळपणा बरा ऐकायला सांपडेल!

श्रीपादराव—अरे, तो हातरुमाल कुठें आहे पाहूं? ( वीणा रुमाल देते तो घेऊन ) वा:! क्रोडों रुपये यावरून ओंवाळून टाकावेत—अशी बहुमोल देणगी आहे ही! पहा वैजनाथ! ह्या आमच्या छब्या किती हुबेहूब वठल्या आहेत—ही मासी-नि ही तिची! [ वैजनाथ व श्रीपादराव हातरुमालावरील चित्रकाम पहातात. ]

चंडिकाबाई—( स्वगत ) अरे भेल्यांनो! ह्या तंबोरीनं आपलं नि

जांवयांचं चित्र दिखील काढलं आहे वाटतं रुमालावर ! आग लागो अवदसे तुझ्या हातांना !

वीणा—पण मंजुळाताईना नाहींना कुणकुण लागली ?

श्रीपादराव—छे, ती नको काळजी ! मी कळूं देईन कसें ?

चंडिकाबाई—( स्वगत ) पण मी आहेंना इथं ऐकायला नि कळवायला जिवंत ! धन्य असो बाई ! नि हा थेरडाहि इथं बसला आहे वाचीत—त्यालाहि पसंत दिसतात हे चाळे ! नि हे मैतर तर जवळ आहेनच ! सगळ्यांनींच कसारे पोरीचा गळा कापायचा घाट बांधला हा ! देवा देवा—नि त्यांत आज वरिस नहाण !

श्रीपादराव—बरें पण, त्या—त्या दिवशीं विचारलेल्या प्रश्नाचा नक्की काय विचार ठरविला ? ( वीणा कांहीं न बोलतां लाजून ग्वालीं मान घालते. ) झाला ना ठाम विचार ! हो—झालाच ! वा—मोठा आनंदाचा दिवस आहे आजचा !

चंडिकाबाई—( स्वगत ) हा विचार कसला ! पुढला विचार कीं काय ! वाट लावते कीं काय ही सटवी—

वीणा—( रुमाल घेऊन बाईनें ) मी जात्यें आतां ! नाहीं तर मंजुळाताई येईल नि आपलं सगळं गुपित फुटेल ! यावर तेवढीं नांवं काढायचीं राहिलीं आहेत, तीहि काढून टाकत्यें ! [ जाते.

चंडिकाबाई—काय निर्लज्ज सटवी आहे ही ! लाजलज्जा सगळी गुंडाळून ठेविलीन सटवीनं ! नि ह्या जांवयांनींहि !—यांना म्हणावं ! आधीं जाऊन सांगत्यें पोरीला हें सारं ! [ जाते.

श्रीपादराव—वैजनाथ, मोठा भाग्यवान आहेस तूं ! वीणेची तर कबुली मिळाली, आतां तुला जगाची टीका नि निंदा सहन करायला मात्र सिद्ध झालें पाहिजे. पण ही जननिंदा सोसल्यावांचून कोणी कोणतें मोठें कार्य केलें आहे आजवर ? मामा, मामा, चला तिकडे, नि मला सांगा नीट आमच्या सासूबाईनीं काय मारा केला तुमच्यावर तो.

दिनुमामा—( ज्ञानेश्वरी मिटून ) चल.

वैजनाथ—श्रीपाद, तुझ्या सासूबाई पण सासूबाई आहेत.

[ तिघेहि जातात.

---

## प्रवेश दुसरा.

[ स्थळ—माजघर. चंडिकाबाई प्रवेश करितात. ]

चंडिकाबाई—( स्वगत ) बाई बाई ! काय थाट हा ! पोरीच्या जन्माचं मातेरं मांडलं आहे चांडाळांनीं ! यासाठीं का पोरीला लहानाची मोठी केली, पंधरा वर्षांची वाढविली, नि अखेरीस हें स्थळ पाहिलें ! हुंडाहि कांहीं थोडा-थोडका दिला नाहीं ! म्हटलं असो, पोरीला जाच करायला सासू नाहीं, नणंद नाहीं, दीर नाहीं, सासरा नाहीं ! पण शेवटीं पळसाला पानं तीन ! पोरीचा असा खेळखंडोबा झालेला पहायचा, त्यापरती तिला विहिरींत लोटून दिली असती, तर काय वाईट ? देवा ! आतां या कहराला करूं तरी कसं ? पोटच्या गोळ्याला बळी दिलेला उघड्या डोळ्यांनीं पाहूं तरी कसा ? या कसा-बांच्या हातून माझ्या गाईला आतां सोडवूं तरी कशी ? बाई अंबाबाई ! तूं तरी धाव आतां !— ही माझी बाळच इकडे आली—

[ मंजुळा प्रवेश करते. ]

मंजुळा—आई, तूं म्हणतेस हें खरं कशावरून ?

चंडिकाबाई—खरं कशावरून ? पोरी, खऱ्याला का आतां शिंगं उरलीं आहेत ? हें आतां—पुनः त्यांचं खलबत झालेलं मीं या कानांनीं ऐकलं! अग, त्या सटवीनं तुझ्या नवऱ्याचं नि आपलं चित्रहि काढलं आहे एका हातरुमालावर ! तो हातरुमाल मी आतां पाहिला तिच्या हातांत या माझ्या डोळ्यांनीं !

मंजुळा—आई, खरंच हें सगळं ?

चंडिकाबाई—अग पोरी ! एवढ्यानंच काय झालं आहे ? त्यांचा पुढला बेतहि ठरला—

मंजुळा—कसला बेत ?

चंडिकाबाई—पाटाचा ! अग ती कपाळकरंटी पाट लावणार तुझ्या नवऱ्याशीं ! एक नवरा ओवाळलान्, नी तुझ्यावर उठली आहे आतां !

मंजुळा---काय--म्हणतेस तरी काय आई हें भलतंसलतं !

चंडिकाबाई---अग तो थेरडा नि तो वैजनाथ कीं बैलनाथ त्या दोघां-चंहि अंग आहे ह्या कटांत ! तो थेरडा उंदिरमामा इकडेच येतो आहे ! वाटतं, जाऊन त्याच्या झिंज्या धराव्यात ! पण नको ! तुझ्याकडे पाहिलं पाहिजे मला---नि त्यांत आज वरिस नहाण ! मी आपली जात्येंच इथून ! हा थेरडा माझ्या दृष्टीसमोर नको माझ्या !

[ जातात.

मंजुळा---मीहि येत्यें. आई जगदंबे ! तुझी ओटी भरीन खणानारळांनीं ! माझ्यावरचं हें अरिष्ट जाऊं दे ! नाहींतर जीवच ठेवायला नको !

[ दिनुमामा प्रवेश करतात. ]

दिनुमामा---जीव ठेवायला नको ! म्हणजे ? झालें काय असें मुली ?

मंजुळा---मला नाहीं माहीत ! आपण हीं अशीं राक्षसी माणसं असा-लसं मला नव्हतं ठाऊक मामंजी !

दिनुमामा---( जवळ जाऊन ) राक्षसी ! म्हणजे---केलें तरी काय असें मीं ?

मंजुळा---दूर व्हा मामंजी ! मला आपली भीति वाटते !

दिनुमामा---माझी भीति वाटते ? पण मीं असें केलें तरी काय मुली ?

मंजुळा--- केलं काय ? आपल्या मनालाच विचारा ! [ जाते. ]

दिनुमामा---( स्वगत ) मी राक्षसी नि माझी भीति वाटते ! याचा अर्थ तरी काय ? [ श्रीपादराव प्रवेश करतो. ] अरे, याचा अर्थ काय ? मी राक्षस कसा ! माझी भीति कां वाटावी ? मीं असें केलें तरी काय ?

श्रीपादराव---म्हणजे, झालें काय ?

दिनुमामा---तेंच विचारतों ना ?

श्रीपादराव---पण आपल्याला राक्षस कोणीं म्हटलें ?

दिनुमामा---मुलीनें ! नि म्हणे तिला माझी भीति वाटते !

श्रीपादराव---वा, कमालच झाली ! आमच्या सासूबाईचाच कांहीं खेळ असला पाहिजे हा !

दिनुमामा—खास, खास तिचाच !

[ केन्या प्रवेश करतो. ]

केन्या—धनी, मंडळी येऊं लागली.

श्रीपादराव—बरें ! मी आलों. [ जाऊं लागतो.

चंडिकाबाई—( आंतून ) काय मेलीं हीं चाकरमाणसं, अगदीं डोईजड करून टेविलीं आहेत ! पण मी नाहीं वरं हें चालूं द्यायची—नि त्यांत आज धरिख नहाण !

श्रीपादराव—अरे काय, झालं काय ?

केन्या—आईसाहेब आरडताहेत ! माफ करा सरकार, पण आईसाहेबांच्या जिभेला हाड नाहीं खास ! म्हणे, सगळी मोंगलाई माजविली आहे आम्हीं चाकरमाणसांनी ! पण आम्हीं गरीबांनी असं केलें तरी काय धनी ? त्या पहा त्या इकडेच आल्या ! आतां माझ्या वालाहि उभें रहावायचें नाहीं इथें सरकार याच्या मान्यापुढं ! [ जातो.

चंडिकाबाई—( प्रवेश करून ) चाकर पण चाकर आहेत ! केरे नि कुतेरे ! अशी भुतावळ नव्हती पाहिली बाई काळत्रयीं ! यांना आतां डोक्यावर तरी घेऊन नाचा म्हणावं ! तेवढंच उरलं आहे ! मी कुणीच नव्हें का ? नि माझ्या तोंडास तोंड—

श्रीपादराव—( स्वगत ) आतां नाहीं निघत धीर !—( उघड ) आईसाहेब, मी असें विचारतों, माझ्या घरांत कालपर्यंत हें कांहीं ठाऊक नव्हतें, नि आजच हें कसें आलें ! याच्या मुळाशीं कोण ?

चंडिकाबाई—काय ! मला हे प्रश्न ? म्हणजे मीच ह्या सगळ्या सरकशीच्या मुळाशीं, असंच आपलं म्हणणं किनई ?—काय पहा, हा उलटाच्या सुलटा झालेला संसार नीट सुतासारखा व्हावा म्हणून इकडे मी आपल्या जीवाचा कोळ करत्यें आहे, नि म्हणे, माझ्याचमुळं हें सारं ! म्हणतात ना, शेळी जाते जिवानिशीं, नि खाणार म्हणतो वातड, तशी गत.

श्रीपादराव—आईसाहेब, माझा आपला हा उलटाच्या सुलटा झालेला संसार मला पुरवला ! पण आपला हा जिवाचा कोळहि नको, नि हें अकांडतांडवहि नको !

चंडिकाबाई—म्हणजे, मीं इथं राहूं नये, असंच किनई आपलं म्हणणं? वा, जांवई! अक्कल इतकी वाहीलसं नव्हतं वाटलं बरं! पण आपण तरी कुणासारखे व्हाल? मामा तसे भाचे!

दिनुमामा—( स्वगत ) आतां माझ्याकडे मोर्च्या वळतो, कीं काय!

चंडिकाबाई—पण मी कुठं बसल्यें आहें जायला! माझं खेटर अडलं आहे माझ्या पोरीला टाकून जायला! माझ्या पोरीला तरी माझ्यावांचून आहे कोण? बरी बाई मी अगदीं ऐनवेळींच आल्यें! नाहींतर तिच्या जन्माचं मातेरं करायचा आपला घाट चांगलाच साधला होता! आतां बघत्यें आपला घाट कसा तडीस जातो तो!

श्रीपादराव—आमचा घाट! म्हणजे!–कसला घाट?

दिनुमामा—हरि जाणे!

श्रीपादराव—घाट तरी कोणता रचला आहे आम्हीं!

[ मंजुळा प्रवेश करते. ]

चंडिकाबाई—बघ पोरी, तुझ्या या दादल्यानं हें आतां मला स्पष्ट लिहून सांगितलं, घरांतून चालती हो म्हणून!

श्रीपादराव—काय आईसाहेब! मी असें सांगेन तरी कसें? हे मामा आहेत इथेंच! त्यांनीं म्हणावें, मीं असें सांगितलें म्हणून!

चंडिकाबाई—मांजराला उंदीर साक्ष! बघ बघ पोरी यांचे कावे!

मंजुळा—मला आहेत ठाऊक सगळे! माझा गळा कापण्याची तयारीच मांडली आहे, मग तुला निघून जायला कां नाहीं सांगणार?

श्रीपादराव—गळा कापण्याची! तुझा?

चंडिकाबाई—म्हणा—म्हणा—नाहीं–नि नरकांत पडा! नि या कटांत हा काळ्याचे पांढरे झालेला थेरडाहि सामील!

दिनुमामा—वळला–माझ्याकडे मोर्च्या खास वळला!

श्रीपादराव—यांना वेड तर नाहीं लागलें!

[ वीणा प्रवेश करते. ]

चंडिकाबाई—ती बघ, तीच सटवी आली, तुझ्या जल्माचा खेळखंडोबा

करणारी ! माझ्या दृष्टीसमोर नको ती अवदसा ! चल बये, आतां आपली धडगत नाहीं--नि त्यांत आज वरिष्ठ नहाण ! [ मंजुळेसह जातात.

श्रीपादराव--म्हणजे, याचा अर्थ तरी काय ? जाऊं द्या त्यांच्या मागोमाग, नि त्यांनाच विचारूं द्या ! [ जातो.

वीणा--काय, झालं काय मामा ?

दिनुमामा--दुसरें काय ? हे चंडिकाबाईचे खेळ चालले आहेत !

वीणा--म्हणजे ?--पण मंजुळाताईच्याहि डोळ्याला पाणी आलेलं दिसल ! सकाळीं जेवायला सांगायला आली तेव्हां तर ती मोठ्या आनंदांत होती--नि इतक्यांत काय झालं ?

दिनुमामा--हरि जाणे ! माझी म्हाताऱ्याची मति तर गुंगच झाली आहे! चला, आधीं आत जाऊन चवकशी करावी, जेवणाचीं पानें मांडायला किती अवकाश आहे त्याची.

वीणा--चला मामा ! [ जातात.

---

## प्रवेश तिसरा.

[ स्थळ--एक दालन. वैजनाथ एका आरामखुर्चीवर पडला आहे, असा प्रवेश. ]

वैजनाथ--( स्वगत ) अविवाहित राहून समाजसेवेला तन मन धन वाहण्याचा माझा निश्चय वीणेचा परिचय होतांच कसा पार ढासळून पडला, नि तिचेंहि मन श्रीपादानें किती थोड्या काळांत वळविलें ! पण त्या बिचाऱ्याची आज काय ही त्रेधा उडाली आहे ! त्याला असें सळो की पळो करायला लावणाऱ्या या त्याच्या सासूची तळी इथून नाहींका उचलतां येणार ? खरोखर, उचललीच पाहिजे, त्यावांचून धडगत नाहीं बापड्याची ! ( केऱ्या प्रवेश करतो, त्यास ) कांयरे, आईसाहेबांचें नाटक कोठवर आलें आहे ?

केऱ्या--नाटक काय--भररंगात आलें आहे सरकार !

वैजनाथ--म्हणजे !

केऱ्या--जेवणारी मंडळी दिवाणखान्यांत जमली होती तों आईसाहेबांची

स्वारी माजघरांतून नाटिकाबाईसारखी पाय आपटीत नि आरडत येऊन थेट मंडळींत घुसतात, नि समोरच्या खोलींत शिरतात ! धाकट्या बाईसाहेबांदि मुळुमुळु रडत नि पदरानं डोळे पुशीत त्यांच्या पाठोपाट येऊन त्याच खोलींत शिरतात, नि दाराला कडी लावून घेतात ! धन्यांची स्वारीही मागोमाग दौडत येऊन खोलीच्या दाराशीं थडकते, नि दार बंद पाहून दारावर लाथांचा मारा सुरू करते ! मंडळी एकदम उठून उभी राहून आस्ते आस्ते पाय काढतात—

वैजनाथ—वा ! पुढें ?

केन्या—दारावर धन्यांच्या लाथांचा धुमधडाका चालला आहे, नि आंत आईसाहेबांच्या तोंडाचा भडिमार सुरू आहे—

वैजनाथ—आणि मामा कुठें आहेत ?

केन्या—ते सोंवळे होऊन पोथी वाचताहेत—

वैजनाथ—जा, त्यांनां इकडे लावून दे ! नि त्या खोलीच्या दाराशीं जा, आणि आईसाहेबांना नीट मिनतवारीनें हाक मारून सांग, कीं, मामांना आपल्याशीं कांहीं बोलायचें आहे ! मामांचें नांव ऐकतांच आईसाहेब त्यांच्या-वर हल्ला करण्याकरितां ताज्या दमानें बाहेर येतील ! जा.

केन्या—खास, खास ! मामासाहेबांवर त्यांचा भारीच कटाक्ष आहे !

वैजनाथ—त्यांचा हल्ला मामांवर सुरू झाला, कीं, वहिनींना मी बोलावितों आहे म्हणून कळीव ! पण आधीं श्रीपादरावांना इकडे लावून दे, जा.

केन्या—जी सरकार ! पण मी सांगून टेवतों, आईसाहेबांची स्वारी इथून जाईतोंपर्यंत रोज हें असेंच चालणार ! [ जातो.

वैजनाथ—( स्वगत ) खरें म्हणतो हा ! आईसाहेबांची धिडका इथून जाईपर्यंत ह्या दोघांना सुख कांहीं लागायचें नाहीं. ( श्रीपादराव प्रवेश करतो ) काय श्रीपाद, वहिनीहि रागावल्या आहेत म्हणे !

श्रीपादराव—हो.

वैजनाथ—पण झालें काय त्यांना रागवायला ?

श्रीपादराव—तेंच तर कळत नाहीं ना ! हं बघ, आतां माझें डोकें फिरा-यची वेळ आली—

वैजनाथ—पण डोकें फिरवून घेऊन कसें चालेल ? खालीं बैस, थोडा शांत हो.

श्रीपादराव—अरे काय म्हणावें तरी काय या विचित्र प्रकाराला ? जेवायला बोलावलेली मंडळी सगळी निघून गेली—हें नाटक पाहून ! त्यांनीं तरी कां नये जाऊं निघून ?

वैजनाथ—खरेंच, तुझ्या सासूबाई म्हणजे खरोखर चंडिकेचा अवतार आहेत !

श्रीपादराव—अरे पण ह्या हिला—तरी कांहीं अक्कल असावी कीं नाहीं ! हिच्यावर माझा कसा जीव कीं प्राण आहे, हें हिला कळू नये ! त्या थेरडीनें हिला कांहींहि सांगितलें, तरी तें हिला खरें वाटावें का ? पण आधीं असें मी घोडें तरी काय मारलें, तें तर मला नीट कळू द्यावें ! ही पहा—तीच आली.

[ मंजुळा प्रवेश करते. ]

मंजुळा—मला कशाला बोलाविलं ?

वैजनाथ—वहिनी, इकडे या, नि नीट सांगा—ह्या साऱ्या प्रकाराचें कारण तरी काय !

मंजुळा—विचारा तिकडेच !

श्रीपादराव—पण मला ठाऊक असेल तर ना !

मंजुळा—करूनसवरून नामानिराळं रहाण्याचं पुरुषांना छान साधतं बाई !

श्रीपादराव—अग, पण मीं केलं तरी काय ? माझा अपराध तर कळू देशील ?—तें कांहीं नाहीं ! तुझ्या आईनें भरविलें आहे कांहींतरी तुझ्या डोक्यांत !

मंजुळा—खरंच—आईनंच माझे डोळे उघडले, नि मला दाखविलं आपलं खरं स्वरूप ! सारं कळलं आहे मला आतां ! आपल्याकरितां तयार झालेला तो हातरुमाल, नि त्यावरचं आपलं नि त्या वीणेचं चित्र ! हीं स्वतः पाहिली आईनं, तेव्हां मला सांगितलंन् !

श्रीपादराव—वीणेचें चित्र !

वैजनाथ—( हंसून ) कोणाचें ! वीणेचें ?

मंजुळा—नि पुढला विचारहि कळला आपला तिच्याशीं लग्न करण्याचा !

श्रीपादराव—कुणाचा विचार ?

वैजनाथ—वहिनी ! त्या रुमालावर तर वीणेनें तुमच्या दोघांच्या छब्या काढलेल्या आहेत ! नि तो आज तुम्हांला ती अहेर करणार आहे—वर्ष-महाणानिमित्त.

मंजुळा—म्हणजे ?

श्रीपादराव—नि लग्नाचा विचार वीणाताईचा झालेला आहे तो वैजनाथाशीं.

मंजुळा—खरंच कीं काय ?

वैजनाथ—खरेंच वहिनी !

मंजुळा—मी वेडी तर नव्हते आईनं सांगितलेलं खरं मानायला !

श्रीपादराव—( मंजुळेचे दोन्ही हात धरून ) वेडीच नाहीं तर काय !

[ केन्या येतो. ]

केन्या—धनी, पुरे झाली ही चाकरी !

[ आचारी, पाणक्या व कुळंबीण प्रवेश करितात. ]

आचारी—महाराज, सोडवा ह्या कहरांतून !

पाणक्या—सरकार, जीव कावून गेला !

कुळंबीण—धनीसाहेब, जीव देत्यें आतां !

श्रीपादराव—अरे, झालें काय तुम्हां सगळ्यांनाच ?

केन्या—एकच दिवसांत जीव नकोसा झाला धनी, आईसाहेबांच्या तोफखान्यापुढें ! रोज हें असेंच चालायचें असलें, तर द्या रजा सगळ्यांनाच !

श्रीपादराव—बरें जा, लागा आधीं आपापल्या कामाला ! आलें आहे माझ्या लक्षांत तें सारें ! त्याच विचारांत आहें मी !

[ चाकरमाणसें जातात.

[ दिनुमामा सोंवळ्यानें—हातांत रेशमी गीता घेतलेले—प्रवेश करितात. ]

दिनुमामा—हद्द असो ह्या बाईपुढें ! मी आपला गीतेचा नित्यपाठ करीत बसलों होतों, तों धमरली मजवर येऊन !

श्रीपादराव--वैजनाथ ! आतां काय--आमच्या सासूबाईना करावें तरी काय ?

वैजनाथ--आपल्या घरीं जायला सांगावें, नि दुसरें काय ?

श्रीपादराव--खरेंच ! त्यावांचून तोडच नाहीं दुसरी ! आतां, हिला वाईट वाटेल जरा ! पण--

मंजुळा--कांहीं नाहीं वाईट वाटत मला ! इथं ही सरकस नि गोंधळ माजवायलाच रहाणार किनई ! त्यापरती दोन पावलं दूरच राहिलेली काय वाईट ?

श्रीपादराव--पण सांगणार कोण त्यांना इथून जा म्हणून ?

दिनुमामा--मी घेतों ही कामगिरी आपल्या अंगावर ! पण या घरांत नको ही ज्वालामुखी !

श्रीपादराव--मामा, हें झेपेल आपल्याला ?

वैजनाथ--मामाच हें करूं शकतील !

मंजुळा--खरंच मामंजी ! आपणच घ्या हें मनावर !--पण नीट मिनतवारीनं सांगा बरं आईला !

श्रीपादराव--हो ! शक्य तितक्या मिनतवारीनेंच सांगा !

दिनुमामा--त्याची नको काळजी !

वैजनाथ--त्या पहा, त्याच इकडे येताहेत चवताळून !

मंजुळा--अगबाई !

श्रीपादराव--मामा, घाबरूं नका, आम्ही सगळीं इथून जातों. नि मग होऊं द्या आपले नि त्यांचे दोन हात !

[ श्रीपादराव, मंजुळा व वैजनाथ पळून जातात.

चंडिकाबाई प्रवेश करतात. ]

चंडिकाबाई--पळा ! पळा इथून ! मी काय खाऊन गिळूनच टाकत्यें किनई ! नि हि पोरटीहि त्यांच्यांत ! झाली वाटतं त्यांना सामील !

दिनुमामा--चंडिकाका-बाई, खालीं बसा ! मी आपल्याला असें विचारतों--रागावूं नका ! या दोघांचा संसार ज्या अर्थी एकमनानें नि एकतंत्रानें

चालला आहे, त्या अर्थी त्यांच्या सुखांत तिसऱ्या परकी माणसाचा लोकला कशाला !

चंडिकाबाई——म्हणजे !

दिनुमामा——म्हणजे असें—आपण—

चंडिकाबाई——कोण ! मी——

दिनुमामा——आपण तिकडे अच्युतरावांना सोडून इकडे रहाणें, म्हणजे लौकिकदृष्टयाहि वाईट, नि——

चंडिकाबाई——म्हणजे मी इथं नको, असंच किनई तुझं सांगणं, थेरड्या!

दिनुमामा——माझेंच नाहीं चंडिकाबाई——आपल्या जांवयानें नि मुलीचेंहि——

चंडिकाबाई——तुझ्याकडे कामगिरी दिली आहे वाटतं थेरड्या ! तूंच-तूंच कान फुंकले असशील त्यांचे ! हो—तूंच ! पण मी थोडीच वगलें आहे धूप घालायला तुला, नि जांवयाला नि त्या कारटीलाहि ! मी ही इथं रहाणार ! ——हो, ती कारटी एक वेडी झाली, नि तिला आपलं हिताहित कळेनासं झालं, तरी मला कळतं आहेना ? मला तें पाहिलं पाहिजे ! मी नाहीं ग बाई पोरीला सोडून जायची या कसाबाच्या तावडींत——नि त्यांत आज वरिस नहाण !

[ श्रीपादराव हातांत तार घेऊन व मंजुळा आणि वैजनाथ त्यांचे मागून अशीं प्रवेश करितात. ]

श्रीपादराव——आईसाहेब ! आपल्याला नातू झाला ! अच्युतरावांची ही आतां तार आली आहे—त्यांना गेल्या रात्रीं पुत्ररत्न झाल्याची !

चंडिकाबाई——काय ! माझ्या बाळाला मुलगा झाला ! शतायु होवो !

मंजुळा——आई दादाला मुलगा झाला, तूं मोठी भाग्यवान् !

चंडिकाबाई——खरंच मी भाग्यवान् ! आतां मी कधीं घरीं जाईन, नि माझ्या बबुड्याला घेऊन बसेनसं झालं आहे मला !

दिनुमामा——( स्वगत ) अरिष्टच टळलें म्हणायचें ! सुंठीवांचून खोकला गेला !

श्रीपादराव—आईसाहेब, जाण्याची तयारी इतक्यांतच कशाला ! जाल सावकाशीनें उद्यां !

मंजुळा—आई खरंच—

चंडिकाबाई—नाहींग बाई ! आतां कधीं एकदां माझ्या बबुड्याला पाहीन नि खेळवीनसं झालं आहे मला ! तुम्हंहि असंच गोड होऊंदे, म्हणजे येईन वरं तुझ्याकडे !

श्रीपादराव—मग काय ! आज रात्रीचाच बेत झाला आपला निघ-ण्याचा ! नाहींच आपण ऐकत !

मंजुळा—आई, माझं थोडं ऐक—

चंडिकाबाई—नाहींग बाई–मला आज गेलंच पाहिजे ! बबुड्याला टाकून मला आतां पळभरहि रहावायचं नाहीं ! मी लागत्येंच आतां बाई जायच्या तयारीला. [ जातात.

श्रीपादराव—मामा, पडत्या फळाची आज्ञा ! होऊं द्या आईसाहेबांच्या प्रयाणाची तयारी !

दिनुमामा—हो, मी त्याच उद्योगाला लागतों. [ जाऊं लागतो. ]

श्रीपादराव—नि जेवणाचीं पानंहि आतां वाढायला सांगा ! परत गेलेल्या मंडळीची क्षमा मागून त्यांना पुनः घेऊन यायला मी नि वैजनाथ आतां जातोंच !

दिनुमामा—ठीक ! [ जातात.

मंजुळा—मी मात्र आज भाग्यवान् खरी !

( वीणा प्रवेश करते. )

वीणा—मंजुळाताई, तुमच्या दादाला म्हणे मुलगा झाला, नि आई आज जाणार—

श्रीपादराव—होय ताई, ह्या दोन्हीहि आनंदाच्या गोष्टी आज घडून आल्या.

मंजुळा—तुम्ही तरी मोठ्या लबाडच आहांत किहो वीणाताई ! तो आमचा रुमाल आणा कुठं आहे तो ?

वीणा—( श्रीपादरावांस ) काय—एवढंसं गुपितसुद्धां राहिलं नाहींना मंजुळाताईला सांगितल्यावांचून!

श्रीपादराव—माफ कर वीणाताई, सांगावेंच लागलें ! तीच सांगेल तुला कां तें !

मंजुळा—( हंसून ) सांगेन तुला मग, काय गम्मत झाली ती ! हं, दे एकदां आतां तो रुमाल !

वीणा—( हंसत मंजुळेच्या हातीं रुमाल देऊन ) ह्या गरिबाच्या देणगीचा स्वीकार व्हावा !

मंजुळा—( रुमालावरील चित्रें निरखून पहात ) मलाहि येईल उठ्ठ काढतां याचं बरं वीणाताई ! ( स्वगत ) आतां आईला हा दाखवित्यें, नि तिची सगळी समजूत घालत्यें.

श्रीपादराव—हं, वैजनाथ ! आतां ह्याच आनंदाच्या प्रसंगीं तुमचें दोघांचेंहि मीलन होऊं द्या !

मंजुळा—खरंच—खरंच !

[ श्रीपादराव वैजनाथाचा व मंजुळा वीणेचा हात धरून एकमेकांच्या हातांत घालतात. ]

वैजनाथ—पण आमच्या सासूबाई नीट—सौम्यच आहेत ना ?

वीणा—कोण ? माझी आई ?

श्रीपादराव—पुतळाकाकूंची गोष्ट कशाला पाहिजे ! त्यांच्या नखाचीहि सर आमच्या सासूबाईंना यायची नाहीं !

मंजुळा—खरंच बाई !

श्रीपादराव—आमच्या सासूबाईंसारख्याच सासवा सगळ्या जांवयांना मिळत्या तर जावयांची कीड इतकी वाढतीच ना ! असो ! आतां लौकरच तुमचा लग्नविधि होईल. देव तुम्हांला अखंड सुखांत ठेवो ! व समाजसेवेकरितां शतायु करो !

मंजुळा—तथास्तु !

[ शेवटचा पडदा पडतो. ]

[ ३ ]

# शुभ मंगल !

## अंक पहिला

### प्रवेश पहिला.

[ स्थळः—बाजीरावांच्या वाड्यांतील दिवाणखाना. बाजीराव लोडाशीं बसले आहेत; नर्मदाबाई प्रवेश करितात. ]

नर्मदाः—मनोरम कांहीं ऐकत नाहीं !

बाजीरावः—म्हणजे !

नर्मदाः—म्हणतो, लग्नच नाहीं करायचं मला !

बाजीरावः—म्हणजे !

नर्मदाः—लग्न ठरवायला सांगितलं होतं कुणी, म्हणतो तो !

बाजीरावः—म्हणजे !

नर्मदाः—म्हणतो, लग्नच करूं नये माणसांनीं !

बाजीरावः—म्हणजे !—मग कुणी करायचीं लग्नं !

नर्मदाः—लग्नंच कशाला करायला हवीं कधीं कुणी, म्हणतो तो ?

बाजीरावः—म्हणजे !

नर्मदाः—म्हणतो, एवढा 'यमये' झालों, तो का लग्न करून घ्यायला ?

बाजीरावः—आणि तुझ्यासारखा दिवटा 'एम्. ए.' आम्हीं लग्न केलं नसतं, तर निपजला असतां का ?— नाहीं विचारलंस त्याला !—अरे गाढवा ! लहान वयांत एवढी विद्या संपादन केलीस, वाचलंस–सवरलंस, आणि हेच तारे तोडतोस का अकलेचे ? आणि आतां कोंडूनानांना शब्द देऊन चुकलों तें ? आणि तिथिनिश्चयहि झाला ना सोमवारीं सप्तमीचा ? आतां ह्या बाजी-रावानं काय विष खायचं, तो नाहीं बोहल्यावर चढला तर ?—अरे गद्ध्या ! लग्न नाहीं करणार, मग काय त्या विवेकानंदासारखा मनोरमानंद होणार?—विचारावंस कि नाहीं त्या नंदीला असं !

नर्मदाः—विचारलं, तूं का संन्यास घेणार ? तर म्हणतो, संन्याशी-बिन्याशी नाहीं होत मी ! ती काळजी नको तुला ! पण मी आपला असाच राहीन ! नि साहेबांचीं नांवहि घेतलीं दोनचार!—त्यानीं कुठं लग्न केलीं म्हणतो.

बाजीरावः—आणि हा तसाच रहाणार ? कसा रहाणार ? तो बाळा-भाऊंचा दिनकर दिवे लावतो आहे, तसेच लावणार किनई ! बुवा त्याचं एक लग्न तरी झालं आहे ! लग्न होऊन सुद्धां माणसं अशीं दिवटीं निर-जतात, तर लग्न न करून काय काय झेंडे फडकवाल, कांहीं नियम आहे ? विवेकानंदासारख्यांची गोष्ट राहूं द्या बाजूला ! लोकोद्धारासाठीं त्यानीं आपल्या इहसर्वस्वाचा बळी दिलेला ! लोकांनीं लग्नं करावींत, प्रवृत्तिपर व्हावं, गृहस्था-श्रमी होऊन ईश्वरी योजनेचं साफल्य करावं, ही जाणीव लोकांत उत्पन्न करून देण्याकरितां तर त्यांनीं लग्नपाश अडकवून घेतला नाहीं ! बहुजनांनीं उत्तम गृहस्थाश्रमी व्हावं, म्हणूनच तर त्यांच्यासारखे अल्पजन गृहस्थाश्रमी झाले नाहींत ! लोकांना सुखाचा संसार करायला शिकवावं म्हणूनच तर हे विवेकानंद काय—शंकराचार्य काय संसारांत पडले नाहींत ! तूं का त्या कोटींतला आहेस ?. तसा असनास, तर लग्नच कुणी करायला नको म्हणून अक्कल पाजळतास का ?—गद्धा आहे का आंत ? ऐकतो आहे किनई ? हें?

नर्मदाः—नाहीं ! रागारागानं बाहेर गेला ! कुठं त्याच्या कलपांत वाटतं !

बाजीरावः—मग आतां पुढं कसं करणार ? तिथिनिश्चय झाला, हुंड्याची रक्कमसुद्धां पाठवून देत होते ते पांच हजारच्या पांच हजार!—म्हटलं, नको आजच ! तरी काय ?—ह्या बाजीरावचा शब्द गेला आहे, ठरलं म्हणून!—तो काय हा मागें घेणार ? त्याहून अफू खायची पाळी आली, तरी बेहेत्तर ! ( उठून फेऱ्या घालावयास लागतात. तों बोजे घेतलेले कापडवाला मार-वाडी, मोतीवाला, सोनार, शिंपी; पळे खांद्यावर टाकलेले आचारी, ब्यँड-वाला, चौघडा सनईवाला, ताशेवाला; असे प्रवेश करितात. )

मारवाडीः—रावसाब ! बाजीरावसाब !

मारवाडी—रावशाब ! बाजीरावशाब !

मोतीवालाः——सरकारसाहिब !

आचारीः——यजमान !

इतरः——धनीसाहेब !

बाजीरावः—( स्वगत ) काय करणार ? ही लग्नतयारीची सेनाहि येऊन ठेपलीच ! ( बसत. )—तुम्हांलाहि बातमी लागली वाटतं ?

मारवाडीः——जी हां शरकार ! बाजीरावशाबकड लगन, नि आमाला कशा नाय कळेल ?— चंदेरी पागवटो, नागपुरी धोतरजोडो, येवला पीतांबरी, आजमिरी किनखाब, गजनवी मखमाल,——

आचारीः——लाडू, बुंदी, मोतीचूर, राघव, नारायण,—सर्व प्रकार !— श्रीखंड, बासुंदी, जिलबी, मांडा आदि सर्व करतों आम्हीं यजमान !—

सोनारः——अलंकार, पवची, गोप, कंठी, चौकडे, सलकडी, बिगबाळी,—

सनईवालाः—चिजा, धनाश्री, मालकंस, पिलू, भैरवी, मेघमल्हार, सारंग, केदार, बागेसरी, छायानट.

शिंपीः——अंगरखे, पैलूदार, इंदुरी, लष्करी, कोल्हापुरी, पुणेरी.

मोतीवालाः——मोती, टपोरा, बारका, पानीदार, लाल्या, सफीद.

मारवाडीः—( नर्मदाबाईस शालू, शेला, शाला, पैठण, लुगडा, खण.

सोनारः—( नर्मदाबाईस ) चंद्रहार, राखडी, चंद्रकोर, मोहनमाळ, केतक, कंकण, सरी, ठुशी, पैंजण, कंबरपट्टा, चिंचपेटी, कोल्हापुरीसाज, कंठा, चंपकमाल, कुडे, बुगडया, बाळ्या, चोबे, बहादुऱ्या,— सर्वे परकार करतो हा राघुशेट !

मारवाडीः——हा पागवटो, वऱ्हाडी माणस लोकाला बहुत चांगला !— हा किती पांचशे लावून देऊं ? हा पहा कशा जाड शणंग आहे ती ! वऱ्हाडी माणस तर ही वर जलम काढील, अन नातो पणतो बि जलम काढाल, अशा हाये हा शणंग ! हा पांचशे बस्स शाब !

मोतीवालाः——मोती जोड बिगबाली वास्ते, पांचशो बस सरकार ?

सोनारः—आणि सलकडी, पवच्या, गोप, कंठ्या, चौकडे बि पांचशे पांचशे पुरत्याल वऱ्हाड्यांना ?

शिंपी–अंगरखे पांचशे कसं पुरतील किनखाबी ?

मारवाडीः—पीतांबरी, धोतरजोडो पांचशे बस्त शाब ?

सनईवालाः–वाजांत्री सुरू करूं तर धनीसाब ?

ब्यँडवालाः–अन् ब्यँड एकदम करूं खाविंदसाहेब ? ( बाहेर पुकारून ) एकदम ! बजाव ! एकदम ! ( ब्यँड वाजूं लागतो ).

बाजीरावः–( एकदम उभे राहून ) अरे बाबांनो ! माफ करा ! वाजंत्री नका वाजवूं एव्हांशीं ! बंद करा तीं !

मारवाडीः–आणखी काय काय लागल ?

सोनारः—आम्हीं येतो शेगडी ऐरण घेऊन !

शिंपीः–मी हकलतोंच पोऱ्यांना मशनी घेऊन !

आचारीः—सैंपाक किती पानांचा करायचा सांजच्याला !

बाजीरावः—( ओरडून ) अरे बाबांनो ! तुमची आज मला जरूर नाहीं ! आणि मला आतां बाहेर जायचं आहे थोडं ! या तुम्हीं आतां !

मोतीवाला:–कल ?–ऐसा क्यों साब ?

मारवाडीः–फजर वखत ! क्यों शाब ?

शिंपीः–असं कसं सरकार ?

बाजीरावः–( स्वगत ) ही सेना थोरल्या बाजीराव साहेबांचासुद्धा धुव्वा उडवील ! मग धाकट्या बाजीरावाची काय चटणीच करतील हे लोक ! ( पागोटें घालून निघून जातात. )

सर्वः–ऐसा क्यों साब !–असं कसं सरकार !– साहिब ! यजमान ! खावंद ! धनीसाब ! ( बाजीरावामागोमाग जातात ).

## प्रवेश दुसरा

[ स्थळः–क्लब बिल्डिंग पुढील बाग, बाकांवर मनोरम, आण्णासाहेब व जगन्नाथ बोलत बसले आहेत. जवळ टेनिसकोर्ट दिसत आहेत. ]

मनोरमः–मला कांहीं वेड नाहीं लागलं, तें मी ह्या चौदा वर्षांच्या पोरीशीं, किंवा अन्य कुणा पोरीशीं लग्न करीन !

जगन्नाथः–अर्थात् ! नाहींतर मनोरमाची मनोरमता ती काय राहिली ?

अण्णासा०:—पण मुळीं लग्नच करायचं नाहीं कुणाशीं, कीं ह्या कोंडू-जानाच्या सोनीशींच तेवढं करायचं नाहीं ?

मनोरमः—पुढलं नाहीं सांगतां येत आज !— पण ह्या कोंडूनानांच्या मुलीशीं मात्र नाहीं करणार खास !

अण्णासा०:—कारण ?

जगन्नाथः—पहिलें कारण—

मनोरमः—तिला मीं पाहिलेली नाहीं आजवर !

जगन्नाथः—वाहवा ! हें कारण तर अगदींच कुचकामाचं ! आज निदान पांच हजार वर्षे तरी आपल्या समाजांत जीं लग्नं होत आलीं आहेत, त्यांत कितीशा वरांनीं वधू पाहिली होती ?—असो ! दुसरं कारण ?

मनोरमः—ती कांहीं माझ्या मनास नाहीं येत !

जगन्नाथः—आहे ! ह्यांत कांहीं अर्थ आहे ! मुलीला कधीं पाहिलेली नाहीं !—आणि ती माझ्या मनास कांहीं येत नाहीं !—अगदीं तर्कशास्त्राला धरून आहे हें !—बरं, तिसरं कारण ?

मनोरमः—मला लग्नच करायचं नाहीं !

जगन्नाथः—हें मात्र अगदीं खरं कारण !

अण्णासा०:—पण कां नाहीं करायचं लग्न ?

मनोरम—लग्न कां करायचं, तेंच नाहीं कळत मला !

अण्णासा०—वा ! एकूण लग्न ह्या संस्थेवरच कटाक्ष आहे वाटतं ?

मनोरमः—आहेच म्हणाना ? आहेच आहे !

अण्णासा०:—पण आपल्या बाजीरावसाहेबांचं लग्न झालं, म्हणूनच आपल्यासारख्या तत्त्ववेत्त्याचा जन्म झाला, नाहीं का ?

मनोरमः—म्हाताऱ्यांना काय कळतं आहे ? त्यांचीं लग्नं त्यांच्या वडिलांनीं केलीं, तशीं आमचींहि करूं पहातात ! पण मी नाहीं करून घेणार तसं!

अण्णासा०:—पण आतां ' नाहीं ' म्हणून कसं चालेल ? तिथीनिश्चय देखील झाला ना ?

मनोरमः—केला असेल त्यांनीं ! पण मी उभा राहीन तर ना लग्न होईल ?

जगन्नाथः—मनोरम नाहीं बसला उभा रहायला !

अण्णासा०:—पण लग्न ठरलं, आतां तुम्हीं उभे नाहीं राहिला, तर गोपाळाच्या बापाला—कोंडूनानाला तोंडघशी पाडलंसं नाहीं का होणार ?

मनोरम:—तसं असलं, तर बाबांनींच रहावं उभं लग्नाला !

जगन्नाथ:—आणि हुंडाहि घ्यावा पांच हजारच्या पांच हजार !

अण्णासा०:—हें नाहीं ठीक मनोरम ! बाजीरावसाहेबांचा दहा लाखांचा शब्द गेला आहे; लग्नाला उभं राहिलंच पाहिजे.

मनोरम:—सध्यां तरी माझा लग्न न करितां आजन्म अविवाहित रहायचा निश्चय आहे !

जगन्नाथ:—सध्यां तरी !

अण्णासा०:—म्हणजे आजन्म हा निश्चय टिकणारच !

मनोरम:—पुढलं पुढं ! मी आपला सध्यांचं बोलतों आहे ! पुढलं कुणी सांगावं !

जगन्नाथ:—अगदीं खरं ! तशाच एखाद्या स्वर्गांगनेशीं गांठ पडली, तर मनोरमाचा हा वाङ्‌निश्चय पालटणार नाहीं, म्हणून कशावरून ?

अण्णासा०:—अर्धांगी तरी कशी हवी आपल्याला, तें कळूं द्या !

जगन्नाथ:—हो ! होऊं द्या वर्णन मनोरम रमणीचं !

मनोरम:—वयानं सोळा वर्षांची !

जगन्नाथ:—वय सोळाची—

मनोरम:—बांध्यानं माझ्यासारखी—उंच नीटस अशी !—

जगन्नाथ:—उंच निटसशी—

मनोरम:—नेत्र सतेज, प्रेमपूर्ण !

जगन्नाथ:—नेत्रीं सतेज प्रेमळ ती !

मनोरम:—रूपानें अप्रतिम अप्सरेसारखी !

जगन्नाथ:—काव्य, चित्रकला ह्यांची भोक्ती !

मनोरम:—रूपानें अप्सराच ऐशी !

जगन्नाथ:—काव्यचित्र ह्यांची भोक्ती !

अण्णासा०:—वाहवा जगन्नाथपंडित ! म्हणा एकदां हें वधूवर्णन !

जगन्नाथः—वय सोळाची, उंच नीटसशी, नेत्रीं मनेज, प्रेमळ ती ! रूपानें अप्सराच केवळ, काव्यचित्र ह्यांची भोक्ती !

अण्णासा०:—वा छान !—बरं ! पुढें ! आणखी कोणते गुण हवेत स्त्रियामध्यें ?

मनोरमः—मन सुसंस्कृत, अंतःकरण प्रेमानं ओथंबलेलं, वागणं मधुर—मोहक, कल्पना प्रौढ—प्रगल्भ, माझ्यासारखीच उच्च विद्या विभूषित—पदवीधर, जिचें ध्येय थोर—उदात्त विश्वव्यापि——

जगन्नाथः—अरे थांब—थांब—थांब !—दम टाकूं दे मला थोडा ! छाती कोंडली बघ ! फाटलीच म्हणेनास ! कवित्व तर पार पळून गेलं घाबरून !

मनोरमः—थांबतोंच तर !—पुरेच करतों आतां !

जगन्नाथः—हा बघ तुझा भावी शालक गोपाळ आला इकडे ! तेव्हां पुरेच कर आतां !

[ हातीं टेनिसबॅट असलेला गोपाळ प्रवेश करतो. ]

गोपाळः—मनोरम, तुम्हांला नानाभाई बोलावितो आहे, बॅट घेऊन ! तो म्हणतो, मॅच कबूल केली आहे तुम्ही त्याच्याशी !

मनोरमः—हो—हो ! खरंच !

[ बॅट घेऊन जातो. ]

जगन्नाथः—का गोपाळ ? मनोरम कांहीं तयार नाहीं सोनूताईला वरायला !

गोपाळः—हो असं ऐकलं मी. आतां बोलत होते कीं काय तसं ?

जगन्नाथः—हो, त्याच गोष्टी निघाल्या होत्या ! आपल्याला बायको कशी पाहिजे, त्याचंहि चित्र रेखाटलं त्यानें !—काय अण्णासाहेब ? आपण कांग्रेसा-निमित्त बराच प्रवास केलेला आहे ! आपल्याला आढळली का कुठं मनो-रमाची बायको ? किंवा आढळण्याचा संभव तरी दिसतो का आपल्याला ?—आणि कदाचित् आढळलीच, तरी मनोरमाला माळ घालायला तयार होईलच, असा काय नियम ?

अण्णासा०:—पण हें मनोरमांना कळावें कसें ?

गोपाळः—आपण त्याच्या मित्रांनीं कळविलं पाहिजे हें !

जगन्नाथः—अर्थात् ! कळविलं तर पाहिजेच ! तयारी आहे माझी ! तुझी तयारी आहे का ?

गोपाळः—ह्मणजे ?

जगन्नाथः—एक नामी युक्ति सुचली आहे मला ! नाटक करायला हवं थोडं ! नि गोपाळ तुला भूमिका घेतली पाहिजे ह्या नाटकांत–नायिकेची !

अण्णासा०:—नुकतीच कॉलेजच्या नाटकांत घेतली होतीच त्यानं ! अवघड नाहीं त्याला !

गोपाळः—कार्यभाग साधत असेल, तर तयारी आहे माझी !

जगन्नाथः—कार्यभाग साधला नाहीं, तर नांव नको घेऊं जगन्नाथ म्हणून !–पण अण्णासाहेबांचंहि काम आहे नाटकांत थोडं !

अण्णासा०:—पार्टांपैकी वाटेल तो पार्ट घ्यायला तयार आहे मी ह्या नाटकांत !

जगन्नाथः—वकीलांचं सहाय्य ज्या कामांत त्या कामीं प्रत्यक्ष ब्रह्मदेव उलटला, तरी यश हें ठेवलेलं ? मग काय गोपाळ ! ठरलं ना हें ?

गोपाळः—ठरलं !

जगन्नाथः—आजच्याआज–रात्रींच–उरकून घ्यायचं नाटक ! शुभस्य शीघ्रं !

अण्णासा०:—ठीक !

( मनोरम व नानाभाई प्रवेश करितात. )

नानाभाई:—पण कबूल कर किनई हरलों म्हणून !

मनोरमः—बरं–हरलों ! बाकी, ठरावाप्रमाणें तीन सेट्स व्हायला हवे होते !–पण असो ! संध्याकाळ झाली ! एकांतच निकाल !

जगन्नाथः—काय ? अंपायर पाहिजे होय ?

नानाभाई:—नको नको ! लागला निकाल !

जगन्नाथः—लागला ना ? मग चलावं आतां घरीं ! पुनः यायचंच आहे रात्रीं इथं ! कलकत्त्याच्या बॅरिस्टर चौधरींची मुलगी मिस हेमलता इथं आलेली आहे, तिला पानसुपारीला बोलाविली आहे आज रात्रीं क्लबांत !

अण्णासा०:—हो ! मंडळी आज रात्रीं यायचं सर्वांनीं दहा वाजतां ! मनोरम, नानाभाई, गोपाळ यायचं बरं सर्वांनीं !

गोपाळ:—पण मला कसं यायला सांपडेल दहाला ?

जगन्नाथ:—हो ! त्याला नाहीं यायला सांपडणार वेळेवर ! मला ठाऊक आहे तें !

अण्णासा०:—पण उशिरां तरी राहूं नको यायला !

गोपाळ:—यवेन !

मनोरम:—बरं ! जायचं आतां !

सर्व:—ठीक-ठीक !

( जातात. )

---

## अंक दुसरा.

### प्रवेश पहिला.

स्थळ:—अण्णासाहेबांच्या घरांतील एक आडदालन.

[ हातीं पत्र घेतलेला अर्ज्या प्रवेश करितो. ]

अर्ज्या:—( स्वगत ) आत्तां कलपांत जातांना धन्यानीं—अन्नासावानीं—ह्यो पतुर मस्नि दिला ! पर, कुनी दिला ह्यो; कुट दिला ह्यो; काय बि थांगपत्त्या लागूं देऊं नग बाईसाबास्नि ! म्हंजि तुजा पगार वाडवीन !—म्हून बजावून सांगतलाय त्यांनी ! त्यापरमान ह्यो बाईसाबास्नि दिला, कीं, ह्या अर्ज्यांचा पगार बि वाढलाच, नि मंग टमा बि ह्याची मांगारिन झालीच ! ब्या भना इक्तं सारं ह्या पतुरांत हाय नाय ! माझा मोटा पगार बि हाय यांत, नि नहान्या ठमाचं माझं लगिन बि हाय यांत ! टका नि ठमा, दोनि बि हायेत यांत जनू !— चला, अर्ज्योबा ! आतां सुस्ती नका करूं ! देऊन टाका ह्यो पतर बिगिबिगी !—अर्ज्या ! पर असंच केलं तर ! ठमाहीच दिला ह्या, नि बाईसाबाशी नेऊन द्यायाला सांगितल तर ! म्हंजे बाईसाबामी सोडून इच्यारलं, कुनी दिला ह्यो ! कुंट दिला ह्यो ! तरी आपन नाव सांयला बि नग, नि काय बि नग !—व्हय असंच ! धन्यानी जसा

मस्नि वजावलाय, ह्यो कुनी दिलं, कुटं दिलं, काय बि बोलूं नग, म्हंजे तुम्हा पगार वाडवीन, तसं आपन बि ठमाला वजावावं, ह्यो कुनी दिलं, कुटं दिलं, काय बोलू नग, म्हंजे तुला घरधनीन करीन ! न्हायी तर न्हायी करनार हा परान गेला तरी !-ह्यो वाईसाव आल्याच इकडं ! आपन आता तकडं ठमा बसल्ये तकडं जावं, नि घावं ह्यो पतर तिशी ! ( जातो. )

[ सरला प्रवेश करिते. ]

सरला:—( स्वगत ) ' तुझं मनोरम ऐकेल; तूं त्याला समजुतीच्या दोन गोष्टी सांग, ' म्हणून नर्मदाआत्या संध्याळीं सागून गेल्या; नि मींहि त्यांच्या समजुतीसाठीं त्यांना ' हो ' म्हटलं ! पण त्या लग्नासारख्या गोष्टींत मी का त्याला शिकवायला हवं ? एवढा विद्वान् झाला आहे, वाचतो—सवरतो पहातो, लग्न म्हणजे काय, संसार म्हणजे काय, हें ज्याला कळतं त्याला का मीं बुद्धि शिकवायला हवी ! नि हवी असली, तरी नव्या मताची मंडळी, ही का माझं ऐकायला थोडंच बसली आहे ? नि माझं मनोरम ऐकेल असं असतं, तरी इकडच्या मनाच्या सध्याच्या स्थितींत मी त्याला भेटलेलं खपेल स्वारींला ! तो कुठं आठचार दिवशीं इकडे यायचा,—हल्लीं तर तो नाहींच येत बापडा,—तर तेंहि जिथं खपेनासं झालं, तिथं मी त्याला जाऊन भेटणं कितीसं खपेल इकडे ! बापड्याबद्दल स्वारीनं काय हा विपरीत ग्रह करून घेतला आहे तरी ! म्हणे, जनदृष्टीला वाईट दिसतं त्याचं इकडे येणं नि तासन तास गप्पा ठोकीत बसणं ! त्याच्याबरोबार मी लहानाची मोठी झाल्यें, तें नाहीं कुठं जनदृष्टीला वाईट दिसलं ! नि आतांच त्याचं इकडे येणं लोकांना वाईट दिसावं, हें नवल नाहीं का ? पण तिकडे जें रुचत नाहीं, तें नको, म्हणूनच मी तिकडे असं विचारलं नाहीं ! बापड्याच्या स्वाभावाची अद्याप पारखच नाहीं झाली इकडे ! ज्याला भाऊ म्हणण्यांत मला भूषण वाटतं; लोकदृष्टीनं आतेभाऊ पण प्रेमानं जो मला सख्खासा झाला आहे, ज्याच्याशीं बोलत बसल्यें असतां, लहानपणाच्या कडू गोष्टीहि गोड्या होतात; लहानपणचे सुखदुःखाचे अनुभव सुखमयच होतात; त्या माझ्या दादासंबंधानं, बाल्याइतक्याच निर्मल अशा त्या माझ्या मनोरमासंबंधानं

असं हें किल्मिष मनांत तरी यावं कसं ? खऱ्याखुऱ्या घुतलेल्या तांदुळा-प्रमाणें जर त्याची वृत्ति आहे, तर त्याला भाऊ म्हणण्यांत मला कां नाहीं अभिमान वाटणार ? त्याचा सर का कुणाला तरी येईल ! ह्या सरलेला सख्खा भाऊ असता, तर त्याच्या मनांत जसं माझ्याबद्दल कधीं भलतंसलतं येणं शक्य नाहीं; किंवा मनोरमाला एखादी, सख्खी बहिण असती, तर तिच्याबद्दल जसं त्याच्या मनांत कधीं भलतंसलतं येणं शक्य नाहीं, तसंच माझ्या मनोरमाच्या मनांत माझ्याविषयीं कधीं भलतंसलतं येईल, असं स्वप्नस्वप्नांतराहि आणायला नको ! शुद्ध गंगोदकांत अशुद्धत्व नांदेल का कधीं?

[ ठमी हातीं पत्र घेऊन प्रवेश करिते. ]

ठमी:—बाईसाब, ह्यो पतुर आत्ता येका पोऱ्यानं दिला आनुनशान !

[ पत्र देऊन जाते. ]

सरला:—( स्वगत ) माझ्या नांवाचं पत्र ! ( पत्र फोडीत ) कुणाचं बरं ! ( खालीज सही वाचीत ) " मनोरम!" —बाई ! कां लिहिलंन ? ( वाचीत ) " सरले!—माझ्या प्रेमाच्या कसोटीची ही वेळ आहे ! हें माझ्या लग्नासंबंधीं चाललेल्या ' अव्यापारेषुव्यापारा ' वरून तुला कळून आलेंच आहे ! तुजकरितांच मी आमरण अविवाहित रहाण्याचा निश्चय केलेला आहे हें तुला सांगायला नकोच !"—म्हणजे ! म्हणतो तरी काय हा !—" हल्लीं मला धरूनबांधून बाशिंग बांधण्याचें घाटत आहे, तरी एकदां तुला मी मनानं वरिली असतां—" अगबाई ! " मी आपली अशी मोट बांधून घेईन, हें शक्य नाहीं !"—अरे कपट्या !— " म्हणून मी उद्यां सूर्योदया-पूर्वीच येथून काळें करण्याचें योजिलें आहे !"—काळतोंड्या !— " तेव्हां माझ्या तुजवरील प्रेमाप्रमाणें जर तुझें मजवर एकाग्र प्रेम असेल—" अरे चांडाळा !— " मी तुला मनानं वरिली आहे, त्याप्रमाणेंच तूं मलाहि मनानं वरिला असशील,"—चांडाळग बाई चांडाळ !— " तर येत्या पहांटेस बरोबर पांच वाजतां तुझ्या घरामागील बागेंत बकुलीच्या झाडाखालीं तूं मला शेवटची भेट देऊन "—गळेकापू सैताना !— " ह्या संकटांतून पार पाडण्यास मला बळ दे "—आग लागो तुझ्या जिव्हेला ! " माझ्या याचनेचा अव्हेर करून तूं मला न भेटशील, तर तुझें मजवरचें प्रेम म्हणजे केवळ

माझ्या कल्पनेचा खेळ होय असें मी समजेन!—तुझ्याकरितां आजन्म अविवाहित रहाणारा मनोरम!"—चांडाळण बाई!—हें पत्र लिहिण्यापूर्वी तुझे हात कसे नाहीं झडून गेले? किंवा नर्मदाआत्यांच्या पोटीं तरी कशाला आलास त्यांना शीण द्यायला? 'भाऊराया'—'भाऊराया' म्हणून ज्याची मी आजवर गाणीं गाइलीं; अगदीं मला शब्दोच्चार करतां येऊं लागला, तेव्हांपासून ज्याला मी मनू—मनू ह्या गोड नांवानं हांक मारूं लागल्यें; नाना खेळ खेळतां ज्याची मी सावलीसारखी कधीं पाठ सोडिली नाहीं; तोच का हा मनोरम! तोच का हा पूर्वजन्मीचा वैरी! इतका काळा मांग असेल, असं कधीं माझ्या स्वप्नीं तरी आलं होतं का? "पत्र्याची नारी" डाव्या पायाचा करी केर' असं जुन्या गाण्यांत ताईबाई भाऊरायाला सांगते, तें त्याला सांगण्याची सुद्धां मला गरज वाटली नाहीं, तोच हा भाऊराय बहिणीबद्दल अशी दुष्ट बुद्धि धरतो! बंधुरत्न समजून गळ्याशीं धरला, पण गारगोटी ठरून गळा कापूं लागला! शुद्ध बंधुप्रेमाचा आस्वाद घेत असतां, त्या आंत दडलेली गांधील डसावी, अशांतलीच ही गत नव्हे का? अमृत समजून विषाचा आश्रय केला, तर त्याचा परिणाम विपरीत व्हायचा राहील? बाई, उगाच मी तिकडे दूषणं दिलीं! ह्या गाढवाबद्दलची तिकडची परिक्षा खरी! कस्तुरी समजून अंगाला चिखल लावला, तर आपण एक त्याला कस्तुरी समजूं; पण जनदृष्टीला तो चिखल असाच दिसणार! ह्या सैतानाच्या बाबतींत जनदृष्टीला मी केवढी नांवं ठेवलीं, नि तीं खोड काढली! पण अखेरीस गाढवाचे कान बाहेर आलेच! नि स्वारीनं म्हटलेल्या गोष्टीचा अनुभव आला!—बाई, वाटतं तिकडे हें पत्र दाखवावं, नि चांगली खोड मोडावी त्याचीं!—पण असंहि वाटतं, जाऊं द्यावं! आणि स्वारीला नये कळवूं ह्याविषयीं!—पण तें नाहीं उपयोगी! त्याची खोड तर मोडायचीच! पण ती स्वारीकडून नव्हे, तर ठमीकडून! त्याच्यावर कींवहि करतां कामा नये, किंवा रागहि काढतां कामा नये! तर त्याला चांगली अद्दल घडेल, असा धडा शिकवावा! (मोठ्यानें) ठमे! अग ठमे!

ठमी—(आंतून) जी बायसाब!

सरला—इकडे येग!

ठमीः—( आंतून ) जी व्हय !

सरला—( स्वगत ) ह्या मानभावाला मी आजवर आपला सख्खा भाऊ समजल्यें ! ह्या काळकपटयाला धुतल्या तांदुळासारखा समजल्यें ! ह्या शेणखळ्याला शुद्ध गंगोदक समजल्यें ! ( ठमी येते )—– हें बघ ! असं कर ! आपला तो शेणखळ्याचा डबा आहे किनई मोठा—–

ठमीः—जी व्हय !

सरलाः—त्यांत आधीं शेणखळा तयार करून ठेव चांगला भरून !

ठमीः—जी व्हय ! पण आतां ह्या वक्ती कशाला—

सरलाः—काय, कशाला कांहीं नको उगा पंचाती करूं ! सांगत्यें तसं कर आधीं !

ठमीः—–जी व्हय !

सरलाः—–शेणखळा तयार करून ठेवायचा चांगला ! आणि पहाटेस उठायचं !—मी उठवीन तुला म्हणा !—आणि मागल्या दारीं बकुळीच्या झाडाखालीं जें कुणीं उभं दिसेल, त्याला आंघोळ घालायची त्या शेणखळ्यानीं !

ठमीः—पन बायसाब, कुनी भूतखित असलं त्यो तर—–

सरलाः—–खाऊ दे खाललं त्यानं तुला तर ! पण भ्यायचं नाहीं मुळींच ! नि कसं अगदीं मनाजोगं न्हाण घालायचं त्याला बरं ! म्हणजे बघ तुझा पगार वाढवीन ह्या महिन्यापासून !

ठमीः—–शेनखला बनावत्येच मी बगा ! पन पगार वाडवाचा, त्यो अर्जुबाचा वाडवा बायसाब ! मला नग भारी पगार !

सरलाः—–अग सटवाई ! त्याचं नि तुझं लग्नाचं जमलं आहे, नाहीं का ?—बरं ठीक ! त्याचा पगार वाढवीन ! त्याचा पगार काय नि तुझा पगार काय, तुमचं लग्न झाल्यावर एकच !—जा तर !—आधीं तेवढा शेणखळा करून ठेव, अगदीं डबा भरून !—हं घडयाळांत घणघण घंटा होईल तेव्हां ऊठ, भी उठल्यें नाहीं तर ! नि मला उठीव !—आणि अर्ज्याला सांग पुढल्या दिवाणखान्यांत झोंपायला ! स्वारी आज क्लबांतच निजणार आहे !—कुणी बंगाली बाई आली आहे. तिच्याकरितां जलसा आहे

रात्रीं क्लबांत म्हणून !–शेणखळा जा करून ठेव आधीं ! मी घड्याळाला किल्ली देऊन ठेवत्ये, नि झोपत्ये आतां ! ( जाते ).

ठमी–( स्वगत ) ह्यो बकुळीच्या झाडाखालच्या भुताला अंगुल घालायाला अर्जुबालाच पाठवावं ! शेणखला, झाडनं, सारावनं, अंगुर, ही कामं अर्जुबाचींच ! तवा ह्यो भुतासाठनं शेणखला करायाचा त्यो बि अर्जुबालाच सांगत्ये, त्याला अंगुल घालायाची, त्यो बि अर्जुबालाच सांगत्ये; नि वर त्येची झाडनी करायाची बायसाबाची सांगी असती, तर त्यो बि अर्जुबालाच सांगितली असती करायाला ! पन त्येची न्हाई गरज दिसंत भुताला ! अंगुल पुरता डबाभर शेनखलाच होया त्याला ! अर्जुबाला सांगावंच इक्लं' काम ! नि टंगाल मंगाल करायाला लागला अर्जुबा, तर बजावत्ये, बग, तुजा पगार वाडला आता, तरीबि नाय करनार तुल्नि मंगल !– ह्यो इक्त काम नाय केलास शेनखाल्याच्या अंगुलीच तर सांगून ठेवने ! ( जाते. )

## प्रवेश दुसरा.

( स्थळ–क्लबबिल्डिंगमधील दिवाणखाना. अण्णासाहेब व नानाभाई बोलत ! बसले आहेत, असा प्रवेश. )

अण्णासा०—एकूण आजच्या नाटकाची कथा सांगितली तुम्हाला जगन्नाथानं !

नानाभाई—हो–ठीक जमविलं आहे नाटक हें !

अण्णासा०—पण प्रयोग कसा काय वठतो, तें पहायचं आतां !

नानाभाई—वठेल ! ती नको काळजी ! [ मनोरम प्रवेश करितो. ]

मनोरम—काय !–बाकीची मंडळी कुठं आहे ? जगन्नाथहि नाहीं आला अजून ?

अण्णासा०—वा ! तो तर केव्हांच येऊन मिस हेमलतेला आणायला गेला आहे !

मनोरम—असें ! आणि गोपाळ तर आज यायचाच नाहीं !

अण्णासा०—येईल तो ! पण जरा उशिरां !

नानाभाई—ही हेमलता चांगली विद्वान् असेल !

अण्णासा०:—हो ! चांगलीच विद्वान् आहे ती ! भाषा तरी किती येताहेत तिला ! मराठी पण काय नामी बोलते ती ! ज्या प्रांतांत जायचं, त्या प्रांताची भाषा बोलायची, असा बाणा आहे. तिचा [ मोटारीचा आवाज ऐकू येतो. ] ही आलीच ती ! ( पुढें होतात; जगन्नाथ व वंगतरुणीचा वेष घेतलेला गोपाळ प्रवेश करितात. )

गोपाळः—कसं काय श्रीयुत अण्णासाहेब !

अण्णासा०:—यावं मिस हेमलता ! आपल्या येण्यानं फारच आनंद झाला आम्हाला ! हे डॉक्टर नानाभाई !

गोपाळः—कसं काय डॉक्टरसाहेब !

नानाभाईः—ठीक आहे ! आपल्या ओळखीचा लाभ झाला, हें भाग्यच माझं !

अण्णासा०:—हे आमचे मनोरम इनामदार !

गोपाळः—कसं काय श्रीयुत मनोरम ! आपली माहिती दिली आहे मला तुमच्या श्रीयुत जगन्नाथांनीं ! आपला पुरता समाचार घेत्येंच आतां जराशानं !

मनोरमः—( जगन्नाथास ) अरे तिला सांगितलंस तरी काय काय मजबद्दल ?

जगन्नाथः—भलतं असं कांहीं नाहीं सांगितलं—घाबरूं नको !

मनोरमः—कायरे हिचं रूप ! बोलणं—चालणं—हंसणं—सारंच गोड !

जगन्नाथः—हं ! शब्दभांडार संपवूं नको इतक्यांत ! तिच्याशीं बोलायला दोन शब्द शिल्लक असूं दे जवळ !

मनोरमः—अरे जिथं हृदयच्च हललं, तिथं शब्दाला काय तोटा ?

जगन्नाथ—मला नव्हतं ठाऊक हें ! मी समजत होतों, हृदय हललं कीं शब्द संपले !

गोपाळ—( जवळ येऊन ) श्रीयुत मनोरम ! तुम्हांला पाहून मला किती तरी आनंद झाला आहे आहे म्हणून सांगू ?

मनोरम—माझं हें महद्भाग्यच होय !

जगन्नाथ—मिस हेमलतेजवळ बोलत बस तूं इथंच ! आम्ही तिकडे गाण्याची जुळवाजुळव करतों.

[ मनोरम व गोपाळवांचून सर्व दिवाणखान्याच्या दुसऱ्या टोंकाला जातात. ]

गोपाळ—( बसून ) श्रीयुत मनोरम ! बसा असे ! उभे कां ?

मनोरम—( बसून ) मिस हेमलता, आपल्याला पाहिल्यापासून मला काय वाटतें आहे नि काय नाहीं, तें शब्दांनीं सांगतांच येत नाहीं ! हें असं कां वाटावं, तेंहि कळत नाहीं !

गोपाळ—न कळण्यासारखं कांहीं नाहीं त्यांत हल्लींच्या ह्या रूपांत आपण परस्परांनां ओळखीत नाहीं, तरी पूर्वरूपांत आपली ओळख असली पाहिजे; हेंच असं वाटण्याचं कारण !

मनोरम—असंच असावं ! मानवी आत्मा ही केवढी चमत्कृति आहे !

गोपाळ—ज्ञानी असून अज्ञानी !

मनोरम—मानवी जीवित हें एक परस्परविरोधी गोष्टींचें मिश्रणच होय ! नाहीं ?

गोपाळ—तसं नसतं, तर तें किती कंटाळवाणं नीरस होतं !—पण हें पहा गाणं सुरू झालं !

मनोरम—आपल्याला गाणं ऐकायचं आहे; तेव्हां—

गोपाळ—छे ! मला हें संभाषणसंगीतच अधिक आवडतं ! पण—खरंच ! तुम्हाला ऐकायचं आहे गाणं ! किती वेडी मी ? माझ्या हें लक्षांतच नाहीं आलं !

मनोरम—नाहीं—नाहीं ! मला नाहीं ऐकायचं गाणं !

गोपाळ—पुरुषाची जात किती बाई ढोंगी ! मनांत एक, जनांत एक ! अशी त्यांची रीत !

मनोरम—हा आमच्या शिक्षणाचा परिणाम नसेल, म्हणून कशावरून ?

गोपाळ—तसंच असेल !—ऱ्या बाई आम्हीं बायका !—इतक्या शिक्षणासवरलेल्या नसतों त्या !

मनोरम—तुमची गोष्ट नाहीं तशी !

गोपाळ—म्हणजे ? मी शिकलेली आहे, म्हणून ढोंगी नाहीं का ?

मनोरम--नाहीं-तसं नाहीं माझं म्हणणं !

गोपाळ-तुम्हीं पुरुष काय बोलतां, तुमचं तुम्हांलाच कळत नाहीं ! तुमची जात म्हणजे एक महाकूटच आहे !

मनोरम-स्त्रीजात हें त्याहून महाकूट आहे !- विशेषत: स्त्रीहृदय !

गोपाळ--तसलं कूट स्त्रीहृदय नाहीं हें माझं !

मनोरम--तें कसं आहे, तें कळेल तर केवढं भाग्य !

गोपाळ--घटका-अर्धा घटकेंत कळणार नाहीं म्हणून कशावरून !

मनोरम-वा ! मग आणखी काय पाहिजे !- पण आपण इतक्या काळ अविवाहित कशा राहिलांत ?

गोपाळ--कशी राहिल्यें ! लहानपणापासून माझा निश्चय कीं बी. ए. झाल्यावांचून लग्नच नाहीं करायचं !

मनोरम-आपण बी. ए. आहांत कीं काय ?

गोपाळ--त्यात काय मोठंसं !-आहेच !

मनोरम--त्यांत काय मोठंसं ? आपल्या समाजांत पदवीधर विदुषी कितीशा आहेत ?

गोपाळ-कां-पुष्कळ आहेत !

मनोरम--मला तर आपणच पहिल्या भेटलांत !

गोपाळ--हा का माझा दोष !

मनोरम--तुमचाच दोष, मिस हेमलता ! तुम्हीं दिसल्या वेळेपासून मी भानावरच नाहीं !- माझं चित्तच आपण हरण केलं आहे !

गोपाळ--काय हरण केलं आहे तुमचं मीं !

मनोरम--माझं मन, माझं अंतःकरण, माझं सर्वस्व !

गोपाळ--बाई !-आपण कवि दिसतां !

मनोरम--नाहीं ! मी कवि असेनसें नाहीं वाटत मला !

गोपाळ--नाहीं कसें ! आपण कवीच आहांत !

मनोरम--छे ! मला स्वताला कवि व्हावसं वाटतच नाहीं मुळीं माझ्या मित्रांनीं मात्र कवि, ग्रंथकार व्हावसं वाटतं !

गोपाळ—मला नाहीं बाई असं वाटत! मला वाटतं, आपण शेले सारखे कवि व्हावें!—नि अवघ्या जगाला प्रेमनिशेत धुंद करावें!

मनोरम—प्रेम निशा! धुंद!—खरंच आपण शेलेच्या बरोबरीच्या कवि आहांत!—नाहीं! मी चुकलों!—कवियित्री आहांत!

गोपाळ—तशीच मी चित्रकलेचीहि फार वेडी आहे!

मनोरम—काय! आपण चितारीहि आहांत! जगांतल्या सान्या सुंदरींची मुकुटमणि अशी तरुणी पदवीधर असून कवि व चित्रकारहि आहे! आणखी तरी कोण आहांत आपण?

गोपाळ—आणखी! बॅरिस्टर चौधरींची मुलगी!

मनोरम—खरोखर! ज्यांचें वकिलीचं उत्पन्न वर्षाचं पांच सात लाखांचें तरी आहे म्हणून म्हणतात, त्या बॅरिस्टर चौधरींचा आपण मुलगी! मग आणखी काय राहिलं! मिस हेमलता!—माझ्या तारुण्याचं सारं सुखस्वप्न आपल्या ठिकाणीं मूर्त झालेलं आहे!

गोपाळ—म्हणजे?

मनोरम—माझ्या जीविताच्या अधिष्ठात्री देवते, माझ्या कल्पनासृष्टींतील आदर्श रमणी, होय म्हण! व मला सुखी कर!

गोपाळ—' होय ' कशाला म्हणूं?

मनोरम—माझं सर्व प्रेम, माझा सर्व जीव, माझं सर्व अंतःकरण तुझ्या ठिकाणीं जडलं आहे! माझा स्वीकार कर!

गोपाळ—स्वीकार करूं?—म्हणजे काय करूं?—मी नाहीं समजल्ये!

मनोरम—म्हणजे माझी सहधर्मचारिणी होऊन मला धन्य कर!

गोपाळ—काय म्हणून?

मनोरम—माझ्या जन्माचें साफल्य ह्या उभ्या जगांत तूंच एकटी करूं शकशील म्हणून!

गोपाळः—पण माझ्या जन्माचं साफल्य ह्या उभ्या जगांत आपणच एकटे करूं शकाल, असं मला नाहीं वाटत!

मनोरमः—नाहीं? तर मग माझा अव्हेर करणार तूं? अशी निष्ठुर होऊं नको! माझं प्रेम कसोटीस लाव!—पण नाहीं म्हणूं नको!

गोपाळः---कसोटीस लावूं ? कराल मी सांगेन तें ?

मनोरमः---तुझ्या शपथ, तुझ्यावरील प्रेमाकरितां तूं सांगशील, तसं करीन !

गोपाळ:---माझ्यावरील प्रेमाकरितां मी सांगेन तें कराल ?

मनोरम:---खास-खास करीन ?

गोपाळः---तर मग माझ्यावरील तुमच्या प्रेमाकरितां माझ्या धाकट्या बहिणीवर प्रेम करा आणि तिला आपली सहधर्मचारिणी करा !

मनोरम---धाकटी बहीण !

गोपाळ---होय मला बहीण आहे एक धाकटी ! माझ्यासारखीच आहे ती ! मजहून थोडी लहान आहे, इतकंच ! तिला करितां आपली अर्धांगी ?

मनोरम---तुजवरील प्रेमाकरितां--करतों सांगतेस तसं !

गोपाळ---( मोठ्यानें ) मंडळी, इकडे या ! ( आण्णासाहेब, जगन्नाथ वगैरे येतात. ) श्रीयुत मनोरम काय म्हणतात, तें ऐकून ठेवा !

मनोरम---तुजवरील माझ्या प्रेमाकरितां तुझ्या धाकट्या बहिणीला मी आपली सहधर्मचारिणी करण्याचं वचन देतों !

गोपाळ---( छद्मवेष टाकून ) करा तर हें वचन पुरें !

मनोरम---कोण ! गोपाळ तूं !

गोपाळ---होय ! आणि माझी धाकटी बहीण म्हणजे सोनूताई !

अण्णासाहेब---वचनानं बांधले गेलांत आपण आतां मनोरम ! सुटका नाहीं त्यांतून !

जगन्नाथ---आतां फक्त ' शुभ मंगल सावधान ' म्हणून अक्षदा टाका-वयाच्या उरल्या, बरं का मनोरम ?

नानाभाई---शाबास गोपाळ !

सर्व---शाबास मनोरम !

( हंसत जातात. )

---

# अंक तिसरा

## प्रवेश पहिला

स्थळ—अण्णासाहेबांच्या घरांतील आडदालन

[ ठमी प्रवेश करिते. ]

ठमी—( स्वगत ) अर्जुबाला त दवाडलाच शेनखल्याच्या डम्यानिशी त्या बकुलीखालच्या भुतास्नि न्हान घालायला!—पन ह्या भूनचशा काय नेम? कुनि मानुस बि असायाचा? भूत म्हनावा, त बकुलीवर रहायचा सोडून खाली कशाला आला? नि मानुस म्हनावा, त ह्या पहाटच्या थंड-पारी आंत घरांत निवाऱ्याखाली रहायचा टाकून बाहिर खाली कशाला गेलं?—अरारा! कोन हा थंडीचा तारटा! अशा कडाक्याच्या थंडींत शेनख-ल्याच्या थंडगार न्हानानीं मानसाचा भूत व्हायचाच, पन भुताचा बि भूत व्हायला रहायचा नाय! अशा ह्यो कडाक्याच्या थंडींत ज्यासी ह्यो थंड शेनखल्याचा इस्नान घालायाचा त्याला त भूत व्हायाचंच गारठून, पन न्हान घालायाला बाहिर जानाराचा बि भूत व्हायाचा गारठ्यानीं! अशा वक्ती ह्या ठमाचा बाप उतरला सर्गांतनं, नि बया बि उतरली, नि म्हंगाली 'ठमा, ह्यो शेनखल्याचा डबा उचल, नि भाहिर जाऊन ये जरा!' त म्हनन 'तूं माजा बा न्हवस, नि तूं माजी बया बि न्हवस!' मगं दुसऱ्याची काय कता? पन अर्जुबाची मर्दाई खरी! ह्यो मर्दाईबद्दल त्याचा पगार आता वाडनारच नि मंग ह्यो ठमाला त्या मर्दाची बाईल व्हायला काय बि हरकत नाय! खराखुरा मरद अर्जुबा. ह्यो पहाटच्या पारीं कालुस्नांतनं भुताला इस्नान घालायाला गेला तो; पन भूत बगाल बोकांडीस बिकांडीस का काय, ह्योची काय; बि तमा नाय त्याच्या जीवाला! ( शेणखळ्यानें माखलेले आण्णासाहेब समोर येतांना दिसतांच ) भूत! भूत! भू! भूत! ( मटकन बसून डोकें मांड्यांत खुपसून ) भू–त! भू–त! भू–त!

[ एका दारानें आण्णासाहेब व उलट दारानें अर्ज्या, असे प्रवेश करितात. ]

अर्ज्या—अग, घातला नहान अगदीं पोटभर त्या भुतास्नि! ( आण्णा-साहेबास पाहून ) भूत! भूत! भू–त! भू–त!

ठमी—भूत ! भूत ! भूत ! भू–त !

[ घाबरून सरला प्रवेश करिते. ]

सरला—अरे काय ! झालं काय ! ( आण्णासाहेबांस पाहून ) अगोबाई ! ( मटकन बसते )

अर्ज्या—भूत का धनी ! धनी का भूत !

ठमी—भूत ! भूत ! भूत ! भूत !

अर्ज्या—का धन्याचा भूत !

ठमी—भू–त ! भू–त ! भू–त !

अण्णासा०...अरे भूत नाहीं ! मी आहे ! ओरडूं नका ! ( सरलेजवळ जाऊन ) क्षमा कर. ( तीस उठवितो. )

अर्ज्या—ह्यो तर धनीसाब. अरे बाप ! ( घाबरून पळून जातो. )

ठमी—( वर पाहून डोळे उघडीत ) अग बाय ह्यो तर धनीसाब ! ( पळून जाते ).

अण्णासा०—क्षमा कर एकवार ! तुझं सत्व पहाण्याकरितां तें पत्र मीच तुला लिहिलं होतं, डाव्या हातानें. मनोरमाचं का तें अक्षर ? नीट बघ पुनः एकदां !—

सरला—बाई–बाई ! खरंच का ?

अण्णासा०—नि त्याबद्दल मला शासनहि यथा योग्य मिळालं हें ! मनांतलें किल्मिष पार धुवुन गेलं ह्या क्षणखळ्याच्या स्नानानं ! आतां आधीं पाण्याचा बंब सांग पेटवायला झटपट ! मनोरमाची हकीकत सांगतोच तुला आतां सविस्तर ! ( जातात. )

## प्रवेश दुसरा

स्थळ:—कमलिनींनीं भरलेलें एक विस्तीर्ण सरोवर

[ सरोवराकांठीं एका धोंडीवर मनोरम सचिंत बसलेला आहे ]

मनोरम:—( स्वगत ) ह्या कमलिनीसारखीच माझी स्थिती नाहीं का ? बालरवीच्या दर्शनानं ह्यांचीं मुखकमलं प्रफुल्ल झालीं आहेत खरीं; पण त्याच्या सामर्थ्यानं ह्या पंकविमुक्त कांहीं होत नाहींत ! प्रकाशप्रसादानं त्या हलूंडुलूं लागल्या आहेत लन्वा; पण त्यांचं परिस्थितिबंधन कांहीं त्यांना सुटत नाहीं !

ह्या उभ्या प्रदेशाचा मी एकटा वारस; माझीं सगळीं मनोराज्यें कुर्वीत उतरण्याचं मला सामर्थ्य असावं खरं; पण सामान्य रंकाप्रमाणं परिस्थितीचीं बंधनं मलाहि सोडीत नाहींत ! इतर बंधनें राहोत, पण माझ्या मित्रांनीं घातलेलें हें वचनबंधन मी कसें तोडूं ? माणसाचं वचन म्हणजे देवसाक्षीच आहे; निदान मी तरी तसं आजवर लेखीत आलों. पण हें असं प्राणघातक बंधन माझ्या मित्रांना तरी मला घालण्याचा अधिकार पोंचतो ? आणि असलें हें आत्मघातकी वचनबंधन मी तरी मानिलें पाहिजे असें ठरतें ? मित्रांनीं अधिकारातिक्रमाचें पातक केलें, म्हणून मीहि आत्मघाताचं पातक करावं ? हें कोडं कसं सोडवायचं ? वचनभंग करून काळोखी लावून घ्यायची ? कीं आत्मघात करून अक्षय दुःखांत पडायचं ? —हें कूट सोडवूं तरी कसं ? सभोंवार पसरलेलं दिवसरात्रीच्या संधिकाळचं गूढ सूर्यप्रभा उकलून टाकीत आहे ! अखिल चराचराच्या अंतर्यामीचेंहि गूढ ती आतां उकलील. पण माझ्या अंतर्यामीचं हें कोडं सोडविणारी ज्ञानप्रभा कुठं आहे ? माझ्या जीवनांतल्या ह्या संधिकाळचं गूढ उकलून मला, माझं भावी जीवन कोणत्या मार्गानं सुखकर करतां येईल, हे कोण सांगेल ? कीं माझ्या जीवनांतला हा संधिकाळ सृष्टीच्या संधिकाळाप्रमाणें रात्र संपवून दिवस दाखविणारा नसून, सायंकाळाप्रमाणें दिवस संपवून रात्र दाखविणारा आहे ?—पहा ! सृष्टीला आपलं जीवन-गूढ सोडवितां आलं ! त्यामुळें तिच्या मुखावर ही प्रभा चमकूं लागली ! आतां क्षणार्धांत माझ्या पायाखालच्या ह्या दगडाच्या डोक्यांत सुद्धां प्रकाश पडेल !—पण मी ? माझ्या डोक्यांत ह्या वेळीं प्रकाश पाडून मी काय करणें योग्य, हें मला कोण सांगेल ? अं ! ह्या टेंकडीवर कोण बरं ही अचानक येऊन उभी राहिली ! एका दृष्टिक्षेपानें टेंकडीमागील सर्व भूप्रदेशाचं ओलांडन करून, कुतूहलानं ही ह्या पुढील सर्व दृश्याचा पार घेत आहे ! श्रमानं हिची गौरमुखप्रभा आरक्त झाल्यानें ही उषःकन्याचशी भासते आहे ! हे दीप्तिमान नेत्रतारक, हें धवल भालाकाश, हा घनकज्जल केशकलाप, आणि हें तृणहरित वस्त्र, ह्यांनीं ही हिच्या पायाशीं पसरलेल्या भूमिभागाची बाळराणीच शोभते आहे !—कोण ही तरलदृष्टि ! एकसमयावच्छेदें ही चारी दिशांचं आक्रमण करते आहे !—हिच्या मागून कुणी धांवत

येत आहे वाटतं ! एकदम खिदळून हरिणीसारखी हिनें काय उडी घेतली ही ! ह्या मुग्ध बालिकेचं हें खिदळणं स्वर्गांगनांच्या नूपुरनादालाहि लाजवील ! —तो पहा एक गोंडसा मुलगा तिला धरण्याकरितां धांवत येतो आहे ! तिच्या पाठचा भाऊ दिसतो तो ! ही त्या जाळवंडा आड झाली ! तो आला हिमेंहि पुनः धूम ठोकली !—गेली ! तोहि काय जीव तोडून धांवतो आहे ! वारा प्यायलेल्या पांखरासारखीं धावताहेत दोघींहि ! किती गोड हा त्यांचा लपंडाव ! हिच्या गालावरच्या गौर आरक्त वर्णाच्या लपंडावाइतकाच गोड ! हिची गति तरी किती चपळ ? टेकडीच्या उतरणीवरच्या धोंडांतून वाऱ्यासारखीं पळताहेत हीं ! मेघाशीं लपंडाव खेळणाऱ्या चपलेचीच आठवण देते ही ! ( उठून ) आली ! इकडेच आली ती ! ( सोनुताई धांवत प्रवेश करिते व मनोरमास पाहून थबकून उभी रहाते; भालू पाठीवर धांवत येऊन तिला पकडतो. )

भालू—हरलीस सोने !

सोनुताई—अरे चीप ! पुरे आतां !

मनोरम—( स्वगत ) कोण ! सोनी ! चतकशी करूं या आधीं ! ( उघड ) तुमचा लपंडाव चालला होता वाटतं ?

भालू—सोनीची नि माझी पैज लागली होती ! तिनं मला शिपटलें, तर मी दहा लाडू खायचे आतां तिच्या लग्नात ! नि मी तिला शिपटलें, तर तिनं दहा लाडू खायचे—( खिदळत )—माझ्या लग्नांत !

मनोरम—लग्न व्हायचं आहे वाटतं आतां इतक्यांत ह्यांचें !

भालू—हो ! इनामदारीण व्हायची आहे ना आतां ती ?

मनोरम—इनामदारीण ! ती कशी बुवा !—मी नाहीं समजलों !

भालू—सोने, घेना तुझ्या नवऱ्याचं नांव मनोरमराव इनामदार म्हणून !

सोनुताई—( हळूच ) चीप बस माल्या !

मनोरम—असं असं ! मनोरमरावाच्या लग्नाची तयारी चालली आहे, ती ह्यांच्याशीं वाटतं ? मग बरोबर ! खऱ्या इनामदारीण आहेत ह्या !—पण म्हणे, ते मनोरम लग्नच नाहीं करीत मुळीं ! तें खरं खोटं वाटतं ?

सोनुताई—खोटं नाहीं तें ! म्हणतात तसं ! पण त्याचं थोडंच चालायचं आहे ?

मनोरम—म्हणजे ! तुम्हीं त्यांना धरून बांधून आपल्या मुठींत आणणार वाटतं ?

सोनुताई—हो—नाहींतर काय ? ब्रह्मदेवानं आधींच गांठ बांधली आहे, ती त्यांना थोडीच टाळवेल ?

मनोरम—म्हणजे ! तें कसं कळलं तुम्हांला ?

सोनुताई—कां नाहीं कळणार ? टिपणांत सगळे गूण जमले आहेत दोघांचे ते का उगीचच ?

मनोरम—असं का ! टिपणं देखिल मनाजोगी जमलीं आहेत वाटतं ! मग ठीक !—पण असं विचारतों, टिपणांतले गूण जमले, म्हणून ब्रह्मदेवानंच गांठ बांधली आहे, असं कसं म्हणतां येईल ?

सोनुताई—पूर्वीचा जन्मोजन्मीचा ऋणानुबंध असल्यावांचून का कुठं टिपणांत सगळे गूण जमतात ? म्हणजे ब्रह्मदेवानंच गांठ बांधली जन्मोजन्मींची, असं नाहीं का ?

मनोरम—असं असं ! अनेक जन्मांचा पतिपत्निसंबंध असल्यावांचून असा योग येणं शक्यच नाहीं म्हणतां ! ( स्वगत ) माझ्याइतका भाग्यवान् मीच, असं मला वाटतं आहे आज ! ह्या सगळ्या प्रदेशाचा मी वारस, म्हणूनहि मला अभिमान वाटला नव्हता, इतका ही बालिका,—ही मुग्धदेवता,—जिनं माझं आज तारण केलं तीच, माझी अर्धांगी होणार, म्हणून मला वाटतो आहे !

सोनुताई—( स्वगत ) बाई ! ह्यांना मी कधीं तरी पाहिल्यासारखं वाटतं! कोण बरं हे ? तिकडच्यासारखा ह्यांचा तोंडवळा आहे ! पण तिकडची स्वारी अशा ह्या गबाळ वेषांत, नि गाडीवांचून सडी कशाला येईल ह्या इथं?

माल्—काय हो तुमचं नांव ?

मनोरम—माझं नांव ? ( स्वगत ) आतां सांगायला काय हरकत आहे! ( उघड ) माझं नांव मनोरम !

सोनुताई—( स्वगत ) अगबाई !

भालू—अरे बापरे ! आमचे मनोरमराव तेच तुम्ही का ?

मनोरम—होय तोच मी ! आणि ही तुमची ताई ती माझी पत्नि ! ( एका हातीं सोनुताईचा हात व दुसऱ्या हातीं भालूचा हात धरून ) चला आपण आतां बरोबरच घराकडे जाऊं !

भालू—अरे बाप ! ( खिदळत ) शुभ मंगल !— सावधान !

मनोरम—तथास्तु ! ! [ जातात.

---

## [ ४ ]

# भीमा-माया !

[ अंक पहिला. प्रवेश पहिला. स्थल, दिवाकराच्या घरांतील दिवाणखाना. माजघराच्या दारांतून वत्सला व खोलीच्या दारांतून डॉक्टर नानाभाई प्रवेश करितात. ]

वत्सला—कसं आहे डॉक्टर आज तिकडचं प्रकृतिमान ?

नानाभाई—बरं आहे ! कालच्याहून बरं आहे ! दुखणं जरी जीवावरचं आहे, तरी तुमच्या नशीबानं लागतील हातीं दिवाकर, बरं वत्सलाताई ?

वत्सला—माझ्या नशीबानं ! माझं नशीब धड असतं, तर हें इतकं कशाला झालं असतं ? माझं नांव कां टाकलं असतं ? मी दृष्टिसमोर नको, माझा शब्दहि कानीं पडायला नको, अशी मी फुटक्या नशीबाची ! म्हणून तर ना हें विष खावं, किंवा विहिरींत जीव द्यावा, असं मला झालं आहे; नाहीं का नानाभाई ? नि आतां तर-( रडते )

नानाभाई—असं काय बरं वत्सलाबाई ! तुम्ही समजूतदार, नि हें काय ? असं रडून कसं होणार ? मी आपल्याकडून शक्य तेवढं आज तीन दिवस करतों आहे ! आणि देवाच्या दयेनं दिवाकर बरेहि होतील ! धीर सोडूं नका ! कसाहि प्रसंग आला तरी तो धीरानं काढला पाहिजे ! रडून काय उपयोग !

वत्सला—खोलीच्या दाराकडे पहावं, नि मुळु मुळु रडावं, इतकं देवानं माझ्या वांट्याला ठेवलं आहे ! खोलींत जाऊन तिकडच्या तोंडाकडेहि

पहायची चोरी ! मग त्यांच्या पायाची सेवा घडणं लांबच राहिलं !—आतां-तरी ह्या कमालकरंटीला तिकडची सेवा करूं देतां का डॉक्टर ? पदर पसरते ! इतकी भिक्षा घालतां का ?

नानाभाई—पण तुम्हांला पाहून त्यांचं पित्त खवळून प्रकृति बिघडणार नाहीं का ? आणि शिवाय, गुंगीतहि ते त्या नायकिणीच्या नांवाच्या–गुला-बाच्या नांवाचा घोष करित असतात, तो ऐकून तुम्हांला तरी बरं वाटेल ?

वत्सला—सारं सोशीन ! पण मला त्या पायाची सेवा घडूं द्याच ! तुम्ही मला भावासारखे आहांत ! भावानें बहिणीचे कोड पुरवायला नकोत ? त्या अवदसेकडे स्वारी एकाएकीं बेशुद्ध पडली, तेव्हां त्यांना गाडींत घालून घरीं आणलेंत आणि सेवाशुश्रुषा चालविली आहेत, ती सारी तुमच्या ह्या अभागी बहिणीकरितांच ना ? मग एवढीच गोष्ट करायला कांकू कां बरं करतां ?

नानाभाई—वत्सलाताई, माझ्याकडून हरकत नाहीं ! पण तुम्हांला पाहून रागानें त्यांचें दुखणें विकोपाला जाऊं नये, इतकंच माझं म्हणणं !

वत्सला—पण मला तिकडून ओळखणारच नाहींत, असा कांहीं उपाय नाहीं का करतां येणार ?

नानाभाई—असा उपाय !—होय ! शुश्रुषेकरितां मीं पाठविलेली सेविका म्हणून तुम्ही म्हटलंत; नि डोळ्याला काळ्या भिंगाचा चष्मा लावून वेष पालटलात, तर जमेल !—दुसरा तर कांहीं उपाय नाहीं दिसत !

वत्सला—आवाक तसं करीन ! चष्मा लावीन, वेष पालटीन; पण तिकडच्या पायांची सेवा घडल्याचें पुण्य माझ्या पदरीं पडूं द्याच !—द्या तर एक चष्मा नि दोन सादीची पातळं आणून !

नानाभाई—धीरानं घ्या. संध्याकाळीं मी येईन, तिथवर त्याचा विचार करा ! एकदम कोणतीहि गोष्ट करणं बरं नव्हे ! मी येतों आतां !—त्या पहा तुमच्या आत्याबाई आल्या ! मला पळ काढूं द्या इथून ! नाहींतर एकदां का त्यांच्या तावडींत सांपडलों, की सुटकाच नाहीं इथून ! (जाऊं लागतात.)

वत्सला—पण मला एवढी भिक्षा घालतां ना ? हो ! घालायलाच हवी ! मी ऐकणारीच नाहीं !—सांगूं का ? रात्रीं मी स्वप्न पाहिलें—कुणी तवाज्ञ-

बाई सुणानात्यांनी माझी ओटी भरते आहे, नि तुझं कल्याण होईल, म्हणून मला आशीर्वाद देते आहे!--देव करील तर तसंच होईल! तिकडच्या पायांची सेवा करायची संधी मला याच द्या! म्हणजे तसंच होईल, असं माझं मन मला सांगतं आहे!

नानाभाई—देव करो, आणि तुमचं स्वप्न खरं होवो!--पहा म्हातारीनं पाहिलंच मला! येतों मी आतां! संध्याकाळीं पाहूं काय करायचें तें! आलीच म्हातारी!

[ काठी टेकित विकेशा भीमामाई प्रवेश करिते. ]

भीमामाई—कोण? डाक्तर का ते! असे पळतां कां?--मी दिसलें म्हणून होय? ( वत्सला जाते )

नानाभाई—नाहीं--म्हणून नाहीं माईसाहेब! उभं रहायला वेळ नाहीं, म्हणून निघालों!

भीमामाई—त्या पांढऱ्या पायाच्या सटवीशीं बोलत उभं रहायला तेवढा वेळ मिळतो तुम्हाला. नि मला पाहिली, कीं कामें निघतात, असंच किनई!--काय? ती आतां कसली चवकशी करीत होतीं? नवरा कधीं मरतो, नि धनदौलत आपल्या हातीं कधीं पडते, हेंच विचारीत होतीना?

नानाभाई—असं कसं वाटेल त्यांना माईसाहेब?

भीमामाई—मी वेडीच किनई? तीच तेवढी शहाणी! तरी बरं नवरा नांव घेत नाहीं तें! नाहीं तर त्या हडळीनं नाच मांडला असता नाच! नवरा कधीं मरेल, नि कारभार आपल्या हातीं कधीं पडेल, असं झालं आहे अवदसेला. आतांच मला विचारीत नाहीं सटवी! ती पुढं थोडीच विचारणार आहे? मी सख्खी नसल्यें, सावत्र असल्यें, तरी आईच ना दिवाकराची? तिकडच्या मागें नि सख्ख्या आईच्या मागें मीच ना दोघांच्या ठिकाणीं? मी कोणीच नव्हे का? मी कोणीच नाहीं का डाक्तर? बोला—द्या मला उत्तर त्याचं?

नानाभाई—असं कसं माईसाहेब?

भीमामाई—दिवाकराच्या मागें कसं रे होईल देवा माझं!

नानाभाई—पण दिवाकराविषयीं असं अमंगल कां चिंतितां ? बरे होतील ते, आणि शंभर वर्षे जगतील, बरं भीमामाई–साहेब !

भीमामाई—मी का वेडी आहें ? मला कळत का नाहीं ? तो आतां ह्या दुखण्यांतून कसचा उठणार, नि कसचा मला लाभणार ! ही पांढऱ्या पायाची वरवटली घरांत असल्यावर त्याला गुण येणार कसा, नि तो हातीं लागणार कसा !

नानाभाई—असं भलतं नका बोलूं ! हें ऐकून हृदयाला घरे पडतात माईसाहेब !

भीमामाई—हिचा पांढरा पाय घराला लागला, नि पोराचा पाय घरांत टिकेनासा झाला ! त्यानं तरी काय करावं ? हीच कपाळकरंटी ! नशीब घड असतं, तर नवऱ्याला आवडती नाहीं का ? चांगली माझ्या मामेभावाच्या लेकीची–ध्वाडी ती घोडी सांगून आली होती ! म्हटलं तिला करा ! पण माझं कोण ऐकतो ? तिकडच्या बुद्धीला भ्रंश झाला नि ही हडळ पोराच्या गळ्यांत बांधली ! मग कां नये होऊं संसाराचा असा बाजार ?

नानाभाई—पण घेतों आतां मी रजा ! ( जाऊं लागतात )

भीमामाई—थांबा थोडे ! चाललां कुठं मला नीट उत्तर दिल्यावांचून ? असं विचारत्यें, आतां ह्या दिवाकराचं बरंवाईट झालं, तर ह्या धनदौलतीचं पुढं कसं करायचं ?–हो ! पुढं तंटेबखेडे माजायचे, त्या परतं आतांच कांहीं करून टाकलेलं काय वाईट ?

नानाभाई—काय करून टाकायचं ?

भीमामाई—काय मृत्युपत्र कीं काय म्हणतात तें !

नानाभाई—दिवाकर कां शुद्धीवर आहेत, ते मृत्युपत्र करणार ? बेशुद्ध स्थितींत मृत्युपत्र कसं होईल ?

भीमामाई—मी का वेडी आहे, कीं दुधखुळी आहे ! अहो डॉक्तर, बेशुद्ध स्थितींतहि मृत्युपत्रें होतात म्हणे !

नानाभाई—हें कुणी–आपल्या भाच्यानीं सांगितलं असेल आपल्याला ? वकील आहेत ते; मी पडलों डाक्तर ! मला ह्या कायद्याच्या खुव्या ठाऊक नाहींत !

भीमामाई—भाचा केव्हां सांगणार ? मी काय ही आतां त्याच्याकडून जाऊन आल्यें ? छे बाई ! मी गेल्यें होते आपली देवाच्या दर्शनाला ! भाचा कशाला मला सांगेल, नि सवरेल ?

नानाभाई—येतों मी आतां ! उशीर झाला !

भीमामाई—तशी नाहीं मी जाऊं द्यायची हो डॉक्टर ! मी का वेडी आहे ? मला काय तें नीट सांगा, नि मग जा आपले खुशाल ! असं विचारत्यें, दिवाकर जरी हल्लीं बेशुद्ध असला तरी तो शुद्धींत आहे, असं तुम्हीं लिहून ठेवलंत, नि मृत्युपत्रावर साक्ष घातलीत, तर नाहीं का होणार ?

नानाभाई—प्राण गेला, तरी नाहीं होणार असं !

भीमामाई—मग ही दौलत कुणाला मिळणार ?

नानभाई—दिवाकरांच्या वारसाला !

भीमामाई—वारस कोण ? मुलगा नाहीं, मुलगी नाहीं !

नानाभाई—बायको ! वत्सलाताई !

भीमामाई—नि मी ? मी कोणी नव्हे ? ही भीमा, कोणी नव्हे ? मला–ह्या भीमाला–नाहीं मिळायची दौलत ?

नानाभाई—असं कसं होईल माईसाहेब ? जाऊं द्या आतां मला ! ( जाऊं लागतात; भीमामाई काठीनें आडविते. )

भीमामाई—नाहीं जाऊं देणार मी ! द्या मला आधीं ह्याचं उत्तर ! मी कोणीच का नव्हे ? मला–ह्या भीमाला कां नाहीं मिळणार दौलत ?

नानाभाई—असं कसं होईल माईसाहेब ? ( जातात )

भीमामाई—अरे डाक्टरड्या ! मी कुणीच नव्हे काय ? थांब, तुझी खोड मोडल्यें चांगली ! तुझ्या बायकोकडून–रेवतीकडून खोड मोडल्यें तुझी चांगली ! तरच मी नांवाची भीमामाई ! ( जाते )

## प्रवेश दुसरा

[ स्थळ, डॉ. नानाभाईंच्या बंगल्यातील एक दालन ]

[ रेवतिबाई प्रवेश करिते. ]

रेवति—( स्वगत ) बाई, भीमामाई म्हणते, तें खरं असेल ?–पण म्हातारं माणूस खोटें कशाला सांगेल ? स्वार्थाचा किंवा माझा थोडाच हेवादावा

सांगायचा आहे बापडीला, तें एक स्वारीपर नसतं कुभांड रचून माझ्या मनांत असं काळं किल्मिष उत्पन्न करील ? तसं जर कांहीं नाहीं, तर तिनं काय अडलं होतं मुद्दाम इथं येऊन मला स्वारीविषयीं जागें करायचं ? पण स्वारीविषयीं भीमामाईचा समजच मुळीं चुकीचा झाला नसेल म्हणून कुणीं सांगावं ? चुकीचा समज होऊन पराचा कावळाहि पुष्कळदां होत असतो ! त्यांतलेंच हें नसेल, असं कुणीं म्हणावं ? पण भीमामाईसारखी म्हातारीं माणसं अशीं चुकतील ? वयानें माणसाची बाह्यदृष्टि मंदावते खरी; पण अंतर्दृष्टि तीक्ष्ण होत असते ! त्यामुळें वयोवृद्ध माणसाचा निव्वळ तर्कहि खऱ्या माहितीपेक्षां खरा ठरतो ! तेव्हां स्वारीवर लक्ष ठेवायला भीमामाईनीं जें मला बजावून सांगितलं आहे, तें केवळ तर्काच्या आधारावर जरी असलं तरी त्यानं आपण जागें होणं बरं नव्हे ? खास तिच्या सांगण्यांत कांहींतरी तथ्य हें असलंच पाहिजे !—बाई, परवा स्वारीच्या बोटांतली आंगठी नाहींशी झाली, तेव्हां मी सहज विचारलं कुणाला दिलीबिली तर नाहीं ? ’ त्यावर ‘ होय ! घेतली ती एकीनें ! ’ असं उत्तर दिलं स्वारीनं हंसत—हंसत ! तें खरं तर नसेल ? त्यावेळीं मला ती सगळी थट्टाच वाटली, नि आंगठी स्वारीच्या बोटांतून कुठं तरी बाहेर गळून पडली, म्हणून समजल्यें मी ! पण ती खरंच कुणी सटवाईनं घेतली नसेल म्हणून कशावरून !

[ हातीं कांहीं पत्रें घेऊन पोऱ्या प्रवेश करितो. ]

पोऱ्या—टपाल दवाखान्यांत नेऊन देऊं कीं कसं ?

रेवति—अरे आतां दवाखान्यांत केव्हां नेऊन देणार ? स्वारी यायची वेळ नाहीं का झाली आतां ? दे इकडे तें ! आत्तां होईल येणं इतक्यांत !

पोऱ्या—जी होय ! ( पत्रें देतो )

रेवति—नि खोली झाडली नाहींस अजून ! ती झाड जा आधीं ! पुस्तकं वेडींवाकडीं पडलीं आहेत खोलींत, नीट लावून ठेव !—बरं का ?

पोऱ्या—जी होय ! ( जातो )

रेवति—( पत्रें पहात स्वगत ) हें बाल्कोचं कार्ड कुणाचं ? ‘ बाबुलजी छगनलाल जव्हेरी, कोट, मुंबई ’ काय म्हणतात हे ? ‘ डॉक्टरसाहेब यांस नमस्कार विनंती विशेष: आपल्या हुकुमाप्रमाणें चंद्रहार तयार झाला आहे,

कुरुपतीअंतीं प्रत्यक्ष पाहून जाण्याची कृपा व्हावी. कळावें, लोभ असावा, हे विनंती. ' अगबाई ! हा चंद्रहार कुणाकरितां ! माझा जीवच कसा उडून गेला ! खास, कुण्या सटवाईसाठींच होते आहे ही खरेदी !—चांडाळणी ! काय करूं ग ! तुझं नांव नि ठावठिकाण कळतं, तर दाखवित्यें तुला काय तें !—पण तिचा तरी काय दोष ? ही स्वारीच अशी उल्लु न होती, तर कशाला येत्या गोष्टी ह्या घराला ? काय-काय बाई मानभावांच्या गोष्टी सांगणं होत असतं माझ्याशीं ! नि बाहेर हे चाळे ! बरी बाई भीमामाईनीं जागी केली मला ! नाहींतर मी आपली बिनघोर घोरत पडल्यें होत्यें !—नि स्वारी म्हणजे रामासारखी एकपत्निव्रताचा अवतार, म्हणून मनांत मांडे खात होत्यें ! आतां बाहेरून स्वारीचं येणं होऊं द्या, म्हणजे घालत्यें पदरांत माप भरून ! भीमामाईची ताकीद, आंगठी बोटांत दिसेना तेव्हां तिकडू-नच दिलेला कबूलीजबाब, नि हें आत्तां आलेलं चंद्रहाराचं पत्र !-आणखी तो किती पुरावा काय हवा स्वारीला लाजवायाला ?

[ पोऱ्या आंगठी व एक पुस्तक घेऊन प्रवेश करितो. ]

पोऱ्या—ही बघा आंगठी ह्या बुकांत गवसली !

रेवति—अगो बाई ! ( आंगठी व पुस्तक घेऊन ) आतां आठवलं सारं ! तिकडच्या हातांतून मीच ही कधींशी चाळ्यानीं काढली; नि हें 'संसारसुख ' वाचीत होत्यें त्यांत खूण म्हणून ठेवून दिली ! ( पोऱ्यास ) शाबास ! बरी लागली ही तुझ्या हातीं. हें पुस्तक दे ठेऊन टेबलावर !

पोऱ्या—( पुस्तक घेऊन ) जी होय ! [ जातो.

रेवति—( स्वगत ) बाई बाई ! आंगठीची शंका उगीच आली मला एकूण ! हें असं होतं ! म्हणून आणखी कांहीं पुरावा मिळाल्यावांचून नाहींच देतां कामा कशाची ओळख स्वारीला काडीभरहि ! घाई करून नाहीं उपयोग !-नाहींतर एक करतां एक ! तोंडघशी पडायचं ! नि मग तोंड काढायची सोय नाहीं ! तरी पण ह्या चंद्रहाराच्या बाबतींत माझी शंका फुकटजायाचा संभव नाहीं ! एरवीं भीमामाईनीं मला जागी केली आहे, ती कां उगीचच ? ( जाते. )

---

# अंक दुसरा

## प्रवेश पहिला

[स्थळ, दिवाकराच्या घरांतील प्रशस्त खोली.]

[ पलंगावर दिवाकर झोंपी गेलेला असून, जवळ काळा चष्मा लाविलेली व सेविकेचा वेष धारण केलेली वत्सला उभी आहे, असा प्रवेश. ]

वत्सला—( स्वगत ) डॉक्टरांच्या कृपेनं मला हें सेविकेचं सोंग घेता येऊन, गेले तीन दिवस, नि तीन रात्री इकडच्या पायांची सेवा करण्याचं सुख मला मिळालं, ही माझी पूर्वपुण्याईच होय! देवाच्या दयेनं माझ्या सेवेला यशहि आलं आहे, असं डॉक्टर म्हणतात. आज तर स्वारीला चांगली गाढ झोंपहि लागली आहे!

( गडी प्रवेश करितो )

गडी—माईसाबानीं भाइर कोन कहार मांडलाय! म्हंगत्यात, म्या आंत खोलींत येनार! न्हायी ऐकायची मी!

वत्सला—झोंप लागली आहे म्हणावं साहेबांना! गडबड करूं नका! झोंप झाल्यावर या आंत!

गडी— जी व्हय!

( गडी जातो, तों भीमामाई प्रवेश करिते. )

भीमामाई—पण मी कशी ऐकेन? मला का कळत नाहीं, माझं पोटपाणी पिकलं नाहीं, म्हणून मला का मायेचा जिव्हाळाच नाहीं? माझ्या पोराला पहायला मला, ह्या भीमाला चोरी? नि ती माझ्या घरांत?

वत्सला—साहेबांना झोंप लागली आहे; तोंवर आपण बाहेर असाल तर बरं होईल!

भीमामाई—कोण ग तूं?—हा आवाज तर ओळखीचा दिसतो!—अग सटवाई! तूं का इडली? नि तूं माला सांगणार बाहेर जायला? अग चांडाळणी! कानामागून आली, नि डोईजड झाली! चाळिशी लावून पारशीण बनली काय? अग नटवे!—हें सोंग आणून नवऱ्याला ठकवणार, होय तूं? नवऱ्याला ठकवशील, पण मी भीमा नाहीं ठकायची बरं!—पण घाट तरी काय आहे तुझा? नवऱ्याच्या औषधांत सोमल

कालवायचा!—असाच किनई अवदसे? त्या दिवशीं त्याच्या अन्नांत तूंच कांहीं तरी कालविलंस, नि म्हणूनच तो बेशुद्ध पडला कसबिणीकडे गेल्यावर, खास! तूंच—तूंच सटवे केलंस! मला का सांगायला हवं?

वत्सला—देवा रे देवा!—पण आधीं बाहेर व्हा कशा! प्रकृति पुनः बिघडली, तर कसं होईल!

भीमामाई—बाहेर जाऊं? मी बाहेर जाऊं? जात्यें बर! जात्यें, नि जगभर दवंडी पिटत्यें, तूं नवऱ्याला विष घातलंस म्हणून! तूं—तूं सटवे त्याचा प्राण घेतलास म्हणून सांगत्यें उभ्या जगाला!—समजलीस? बाहेर जाऊं होय? जात्येंच! पाऊल नाहीं टाकीत घरांत, तुझी धिंडका ओंवाळल्या-वांचून बरं सुनटले?—बाहेर जात्ये. भाच्याकडेच जाऊन रहातें आतां. मला का कळत नाहीं? मी का वेडी आहे? हीं चालल्यें! (जाते)

वत्सला—जागी झालीच स्वारी!

दिवाकर—( डोळे उघडून ) गुलाब! गुलाब! अग गुलाब! ( सभों-वार पाहून ) कुठं आहे बरं मी?— गुलाब!

वत्सला—( स्वगत ) तिच्या नांवाचा घोष!—अजूनहि तिच्या नांवाचा घोष!

दिवाकर—( वत्सलेस पाहून ) कोण तुम्ही? मला हें कुठं आणिलें आहे?

वत्सला—आपल्याच घरीं आहांत आपण!—आपल्याच खोलींत!

दिवाकर—( सभोंवार पाहून ) होय!—पण तुम्ही कोण?

वत्सला—मी सेविका!—आपल्या शुश्रूषेला आहे!—आपण आजारी आहांत, नाहीं का?

दिवाकर—हो!—पण किती दिवस झाले, मी आजारी पडून?

वत्सला—सगळं सांगत्यें! पण बोलण्याचे श्रम घेऊं नये आपण! स्वस्थ पडून रहावं, म्हणून डॉक्टरांची सांगी आहे!

दिवाकर—पाणी द्या थोडं! तहान लागली आहे!

वत्सला—ऊन कॉफी आणत्यें? पाणी प्यायचं नाहीं! डोळे मिटून स्वस्थ पडून रहावं! मी कॉफी घेऊन येत्यें!

दिवाकर—बरं तर ! ( डोळे मिटतो; वत्सला जाते. ) किती प्रेमळ तरी ही सेविका ! ही सांगेल तें ऐकावंसंच वाटतं ( वत्सला कॉफी घेऊन येते ) आणली ? ( उठून बसूं पहातो )

वत्सला—नये उठूं ! श्रम झेंपणार नाहींत आपल्याला तितके ! मी पाजत्ये कॉफी ह्या चमच्यानं ! ( कॉफी पाजते. )

दिवाकर—किती बरं वाटलं आतां ! थोडा उठून बसूं का ?

वत्सला—छे ! उठायचं नाहीं ! त्रास होईल आपल्याला त्यानं ! असंच पडलं रहावं ! नि झोंप आली तर पहावी आणखी !

दिवाकर—ठीक–ठीक ! ( डोळे मिटतो )

वत्सला—म्हणजे बरं वाटेल आपल्याला ! नि लौकर प्रकृति सुधरेल !

दिवाकर—खरंच का ?

वत्सला—बोलूं नये मुळींच ! स्वस्थ पडावं !

[ दिवाकर डोळे मिटून स्वस्थ रहातो. ]

दिवाकर—गुलाब ! गुलाब !

वत्सला—( स्वगत ) पुनः तोच घोष !

दिवाकर—( डोळे उघडून ) गुलाब कुठं आहे हो ?

वत्सला—इथं नाहीं ती !

दिवाकर—मग कुठं गेली ती ?

वत्सला—कुठंशी लांब गेली म्हणतात ! कुणा संस्थानिकाबरोबर गेली ती, असं डॉक्टरसाहेब म्हणत होते !

दिवाकर—मला कुणी आणलं घरीं तिच्याकडून ? बेशुद्ध पडलों मी तिच्याकडे, इतकं आठवतं मला !

वत्सला—होय ! तिच्याकडे आपण बेशुद्ध झालांत ! तिच्या नोकरानं सोडा आणून दिला; तो प्यालांत, नि बेशुद्ध झालांत !–असं डॉ. नानासाहेब म्हणत होते ! त्यांनींच आपल्याला गाडींत घालून इथं आणलं ! हे गेले सहा-सात दिवस आपण बहुतेक गुंगींतच होतां !

दिवाकर—सोडा ! खरंच तो सोडा प्यालों; नि बेशुद्ध पडलों !

वत्सला---पण आतां स्वस्थ पडावं ! बोलण्याचे श्रम घेऊं नयेत ! प्रकृती बिघडेल, नि डॉक्टर मला रागें भरतील !

दिवाकर---बरं ठीक ! ( डोळे मिटतो व पुनः लागलेच उघडितो. ) गुलाब कुठं गेली हो !

वत्सला---पुनः तेंच !---ती कुठंहि गेली असली, तरी कसबिण ना ? ती का तुमची बांधलेली आहे, बायकोप्रमाणं ?

दिवाकर---बायको ! बायकोशीं मला काय करायचं आहे ? एक गुलाब ठाऊक मला ! तीच माझी बायको ! ती कुठं आहे सांगा बरं ! तुम्हीं नाहीं कळूं द्याल, तर मी जाऊन तिचा शोध लाविल्यावांचून राहीन ?--कीं ती इथंच आहे; पण डॉक्टर नि तुम्हीं मला फसवीत आहांत ?

वत्सला---मी फसवीन ? आपल्याबद्दल मला काय वाटतं आहे काय नाहीं, तें एक देव जाणे !

दिवाकर---तें दिसतच आहे ! हें तुमच्या डोळ्याला पाणीहि आलं ! माझ्याबद्दल तुम्हांला इतकं का बरं वाटावं ? गुलाबलाहि माझ्याबद्दल इतकं कधीं वाटतं ना !

वत्सला---बोलून चालून कसबीण ती ! नाहीं का ?--आपल्या पैशावरच तिचं सारं लक्ष असणार ! हे उघडच !

दिवाकर---पण तुम्हांला माझ्याविषयीं इतकं कां बरं वाटावं ? ह्या गेल्या सहा सात दिवसांत माझ्याकरितां तुम्हांला कितीतरी कष्ट पडले असतील !

वत्सला---माझं कर्तव्यच आहे तें !

दिवाकर---हे सेविकेचं काम किती दिवस करीत आहां तुम्हीं ?

वत्सला---थोडे दिवस ! अगदीं अलीकडे लागलें ह्या कामाला !

( डॉ. नानाभाई प्रवेश करितात. )

नानाभाई---कसं काय दिवाकर ? बरं वाटतं ना आतां ?

दिवाकर---याहो डॉक्टर ! किती बरं वाटतं आहे आतां मला !

नानाभाई---( दिवाकराचा हात हातीं घेऊन ) जिंकलं आतां !--त्वास जिंकलं ! पण ह्या सगळ्याचं श्रेय ह्या बाईंना आहे बरं ! ह्यांच्या एकनिष्ठ

सेवेमुळंच दिवाकर तुम्हीं आम्हांला लाभला आहांत ! गेल्या सात रात्रीं त्यांना कशी ती झोंप ठाऊक नाहीं ! काय ? खरं किनई हें ?

वत्सला—उगाच कांहीं तरी स्तुति करायची माणसाची !

नानाभाई—उगाच कशी !–नि त्यांत आश्चर्यहि नाहीं. दिवाकरांना पुरेच आपलेसे करायचा घाट नसेल तुमचा, म्हणून कशावरून ?

वत्सला—कोण ही भलतीच थट्टा !

दिवाकर—पण मला आतां ह्या खोलींतच किती दिवस ठेवणार ?

नानाभाई—आपण बाहेरले जग विसरेतोंपर्यंत. पहा ह्या बाहेरल्या जगानीं आपल्याला कोणत्या स्थितीला आणलं तें ! देवाच्या दयेनें ह्यांच्यासारखी सेविका तुम्हांला मिळाली, म्हणूनच तुम्हीं आज आम्हांशीं बोलतां आहांत !

वत्सला—मी बापडीनं काय केलं ! डॉक्टर साहेबांमुळेंच ह्यांचा हा पुनर्जन्म !

दिवाकर—पण निदान संध्याकाळीं गाडींत बसून मोकळी हवा घेऊन यायला काय हरकत ?

नानाभाई—हरकत नाहीं कांहीं ! पण तें आणखी दोन दिवसांनंतर ! नि तें हि ह्या बाई बरोबर असतील तर !

दिवाकर—वा: ! त्या असल्या तर मला हि आनंदच वाटेल ! त्या जवळ असल्या म्हणजे आपण उच्च उच्च वातावरणांत आहों, असं मला वाटतं ! त्यांचा शब्द कानीं पडला, म्हणजे अंतर्बाह्य शुद्ध झाल्यासारखं मला वाटतं !

नानाभाई—त्यांचा सहवास तुम्हांला इतका आवडतो, हें पाहून फार आनंद वाटतो मला !

दिवाकर—नुसता आवडतो इतकंच नव्हे डॉक्टर ! त्यांचा सहवास घडावा, म्हणून असंच आजारी पडून रहावं, असं वाटतं मला !

नानाभाई—साहजीकच वाटेल तसं ! नवल नाहीं त्यांत !

वत्सला—पण स्वारी औषध घ्यायला खळीस येते, बरं डॉक्टरसाहेब !

दिवाकर—नाहीं हो ! तसा खळीस नाहीं येत मी ! पण औषधें तरी किती घ्यायचीं माणसांनीं !

नानाभाई—किती असलीं तरी घ्यायलाच हवींत आणखी थोडे दिवस !

दिवाकर—घेतोंच आहे ना मी.

नानाभाई—बरं तुमचे डोळे कसे आहेत बाई. काळ्या चष्म्याचा कंटाळा नाहीं ना आला अजून ?

वत्सला—कंटाळा कसा बरं येईल ! डोळे बरे व्हायला हवेत ना ?

दिवाकर—लौकर बरे होऊं द्या ते ! काळ्या चष्म्याच्या काळोखांत रहाणं बरं नाहीं ते !—काय तरी विलक्षण सामर्थ्य आहे त्यांच्यांत ! ' औषध नको बुवा ' असं म्हणतो, नि ह्यांच्या डोळ्यांकडे बघतों तों ! पटकन तें घेऊन टाकावं असं होतं !

नानाभाई—आणि त्या मुळंच बरे झालांत तुम्ही !( उठून )—बरं ठीक ! —येतों आतां.—बाई, डोळ्यांची काळजी घ्या आणखी थोडे दिवस आणि असं करा ! ( वत्सलेशीं बोलत बोलत जातात. )

## प्रवेश दुसरा

स्थळ—डॉ. नानाभाईच्या बंगाल्यांतील दिवाणखाना.

[ रेवतीबाई प्रवेश करिते. ]

रेवति—( मोठ्यानें ) अरे तेवढं टपाल आण बरं पेटींतून कांहीं असलं तर.

पोऱ्या—( आंतून ) जी होय.

रेवति—( स्वगत ) भीमामाईनीं सूचना दिल्यापासून जीवाला कसं तें चैन नाहीं. हुरहुर—हुरहुर—सारखी हुरहुर लागून राहिली. ज्या सटवाई-करितां तो चंद्रहार घडला, तिचं तेवढं नांव कळेल, नि स्वारीच्या पदरांत सगळं माप घालून पुनः असल्या फंदांत न पडण्याची शपथ स्वारीकडून घेववीन, तेव्हांच हा घोर सुटेल जीवाचा. तिचं नांव ठाव कळावं, निदान तिच्यासाठीं आणखी काय काय चाललं आहे, त्याची कल्पना यावी, म्हणून रोजचं सगळं टपाल मी आधीं पाहिल्यावांचून स्वारीकडे जाऊंच देत नाहीं. तरी बाई चंद्रहाराच्या त्या पत्रावांचून दुसरं बोटभर चिटोरहि नाहीं लागत हातीं अजून.

[ पोऱ्या टपाल घेऊन येतो. ]

पोऱ्या—हें इतकंच टपाल होतं पेटींत.

रेवति—( टपाल घेऊन ) बरं ठीक. जा तूं आतां दुसऱ्या कामाला.

पोऱ्या—जी होय ! ( जातो )

रेवति—( टपाल पहात स्वगत ) हीं वर्तमानपत्रं ! हीं राहूं द्या बाजूला. एरव्हीं ह्यांची मी केवढ्या उत्कंठेनं वाट पहात असायची नि जगांत कुठं काय चाललं आहे, कुठं काय झालं आहे, हें कळायला आतुर असायची. पण सध्यां घरांतच काय चाललं आहे, काय घडतं आहे, तेंच कळत नसल्यामुळं जीवाची जी होळी झाली आहे, तिच्यांत दारच्या सगळ्या गोष्टींची आहुति झाली आहे म्हणायची.–हें कार्ड कुणाचं ? कसा कळणार ह्यांतला मजकूर ?–हें पडलं इंग्रजींत लिहिलेलं. बाई, हे लोक मराठींत कां नाहीं लिहीत पत्रं ? ज्यांची जन्मभाषा मराठी, देशभाषा मराठी, त्यांनीं आपले घरगुती व्यवहार तरी मराठींत नकोत करायला !–हें पाकिट कुठलं ? त्याच्या पोस्टाचा शिक्का इंग्रजींत–कळणार कसं कुठलं तें. बाई; हें एक कार्ड बाळबोधींत दिसतं आहे.–हें कुणाचं.–" जगन्नाथ " ! स्वारीचे मित्र जगन्नाथराव जावडेकर काय लिहिताहेत ? " नमस्कार वि. वि. ज्या इराणीवर तुमचं इतकं मन गेलें होतें, तिला तुमच्यासाठीं मी आपल्या बिऱ्हाडीं घेऊन आलों आहे. तिची प्राप्ति झाल्याबद्दल तुमचें मी मनःपूर्वक अभिनंदन करितों. खरोखरच, तिचें रूप कांहीं अवर्णनीय आहे. हरिणासारखे नेत्र– " अग सटवाई त्यांचा कां नाहीं होत तुझ्या डोळ्यांच्या. " लांब सडक केशकलाप–हीं पाहिलीं म्हणजे कोणाचें मन तिच्यावर बसणार नाहीं ? महत्प्रयासानें मी तिला आपल्या बिऱ्हाडीं आणली आहे. इथं आल्यापासून तिनें कांहींहि खाललें पायलें नाहीं. तिनें खावें प्यावें म्हणून मी आपल्याकडून पुष्कळ प्रयत्न केला; पण ती कशाला म्हणून शिवली नाहीं. तुम्ही शक्य तितक्या लौकर येऊन, गिरगावांतील माझ्या बिऱ्हाडांतून तिला घेऊन जावें, हें बरें. " अगबाई. ह्या अवदसेला घरांत आणून ठेवणार वाटतं. [ कार्डाचा चोळामोळ करीत ] बाई–कसाब ! कसाबाची करणी

मांडली आहे ही सगळ्यांनीं. नि तो चंद्रहार घडला आहे, तो ह्याच सट-वाईला—इराणी कीं दुराणी, कोण ती मेली, तिला देण्याकरितांच खास. नि म्हणूनच ती स्वारीला वश झालेली दिसते.—काय करूं अवदसे. तुला गिळूं कीं जाळूं पोळूं होऊन गेलं आहे.—महाराज, आपण असें असालसं कधीं माझ्या, ध्यानीं मनीं स्वप्नींहि आलं होतं का पूर्वीं !—अगबाई ! स्वारीच आली.

[ डॉ. नानाभाई प्रवेश करितात. ]

नानाभाई—काय ?

रेवति—( कपाळाला आठ्या घालून ) कांहीं नाहीं.

नानाभाई—म्हणजे. तुझं कपाळबिपाळ का दुखतं आहे.

( जवळ जातो. )

रेवति—दुरूनच बोलावं गडे.

नानाभाई—अरे बार, रागावली आहेस वाटतं. पण डोळ्यांना पाणी आलेलं दिसतं. काय झालं तरी काय ?

रेवति—कांहीं नाहीं झालं.

नानाभाई—मग अशी कां दिसतेस ?

रेवति—कपाळ दुखतं आहे थोडं माझं.

नानाभाई—नुसतं कपाळ कांहीं दुखत असलेलं नाहीं दिसत तुझं खास. त्याहून विशेष असं कांहीं झालेलं दिसतं. नीट बोल. कळूं दे मला काय झालं तें.

रेवति—( चोळामोळा केलेलं कार्ड दाखवून ) हें—हें पत्र वाचलं मी आत्तां.

नानाभाई—काय—कसलं पत्र आहे तें, पाहूं दे.

रेवति—जसं कांहीं ठाऊकच नाहीं कांहीं. गांवचंच नाहीं आपण जणूं.

नानाभाई—मला कसं कळणार त्यांत काय मजकूर आहे तो, मी जर वाचलेंच नाहीं तें तर.

रेवति—( पत्र साफसूफ करून पुढें धरून ) हें पहावं. वाचावं आतां.

नानाभाई—( पत्र वाचून ) असं. मग त्यांत रागवायला काय झालं तुला ?

रेवति—काय झालं.–खरंच–खरंच, मी काय कुणीच नव्हे ? उरावर सवत आणून बसविली, तरी मी रागावतें म्हणजे अर्थ काय ह्याचा ?

नानाभाई—सवत ? ती कोण ?

रेवति—ही इराणी कीं दुराणी ? सवत नव्हे, तर कोण सासू वाटतं माझी ?

नानाभाई—( हंसून ) अग, ही तर भाटी आहे इराणी ! कोटांत एका खोज्याकडे पाहिली होती ती मी ? माझ्या मनांत फार भरली ती ! म्हणून जगन्नाथरावनीं खरेदी केली आहे माझ्याकरितां.

रेवति—इराणी भाटी ?

नानाभाई—हो ? फार—फारच सुरेख आहे ती ! तुला फार आवडेल ती !

रेवति—इराणी भाटी ?

नानाभाई—हो ! इराणी मांजरी आहे ती ? बाईबिई कुणी नव्हे !—वेडी कुठली !

रेवति—मांजरी ! बाई मला कसं कळावं बरं हें, मी म्हटलं—

नानाभाई—सवत म्हणून !–वाहवा ! तुम्हीं बायका म्हणजे काय !—जगांतल्या स्त्रीवाचक वस्तुमात्रांचा तुम्हांला मत्सर !–त्यांतली एखादी आम्हांला आवडेल कीं काय म्हणून !—खासें ! खासा संशय आला तुला !

रेवति—इराणी मांजरी !—

नानाभाई—अग हो ती इराण देशांतली, म्हणून तिला नांवच ‘ इराणी ’ मिळालं आहे ! समजलीस आतां !

रेवति—इराणी मांजरी, मग तो चंद्रहार कुणाला दिला ?

नानाभाई—( हंसून ) चंद्रहार होय ? जव्हेरीचं कार्ड वाचलेंस वाटतं ! तो चंद्रहार तुझ्यावांचून दुसऱ्या कुणाला देणार मी ? नि तुला देण्याकरितां तर हा आतां परभारें जाऊन घेऊन आलों आहे, त्या जव्हेरीकडून.

( खिशांतून चंद्रहार काढून तिच्या गळ्यांत घालतो ) तुला स्मरण नव्हतें वाटतें.—अग आज आपल्या लग्नाला बरोबर पांच वर्षे पुरीं झालीं. नि त्याचं स्मरण म्हणून हा चंद्रहार तुझ्याकरितां करायला सांगितला होता. तुला न कळवितां आज अचानक तुझ्या गळ्यांत घालायचा माझा घाट होता; म्हणून तुला आधीं ह्या विषयीं कळविलं नाहीं, नि घेऊनहि आलों नाहीं आजपर्यंत. कळलं आतां सगळं ?

रेवति—कळलं गडे. नि माझी शंका दूर झाली आतां. क्षमा व्हावी.

नानाभाई—पण अशी कुशंका आली तरी कशी तुला वेडीला !

रेवति—बाई, वेडीच मी. भीमामाईच्या शब्दावर विश्वास ठेविला नि इकडच्याबद्दल विपरीत ग्रह करून घेतला.

नानाभाई—असं, त्या भीमामाईनीं केली वाटतं ही सगळी माया—पण आतां ती दूर झाली ना.— खासा सूड उगविला म्हातारीनीं माझा.

रेवति—सूड तो कसा ?

नानाभाई—तिचे ते वकील भाचे मृत्युपत्र तयार करीत होते दिवाकरांचें दिवाकर बेशुद्ध असतांना. नि मला साक्ष घालायला सांगत होती म्हातारी त्यावर. प्राण गेला तरी असें मी करणार नाहीं, म्हणून तिला सांगितलं मी. त्याबद्दल सूड घेतला म्हातारीनं असा.

रेवतिः—चांडाळीण. माझ्या सुखांत माती कालवीत होती. पण मीच वेडी नव्हे. —तिचं सांगणं मनावर न घेत्ये तर.

नानाभाई—असो. आतां इतउत्तर तरी कुणी कांहीं म्हटलं, तरी असल्या भलत्या संशयाला मनांत जागा देऊं नको. म्हणजे भीमामाईनं तुला एक चांगला धडाच शिकविलास होईल.—समजलीस !—बरं ! जाऊं दे तें !— आतां भूक लागली आहे, ताटें वाढायला सांग आधीं !

( जातात. )

# अंक तिसरा

## प्रवेश पहिला

[स्थळ—दिवाकराच्या घरांतील दिवाणखाना. दिवाकर झोक्याच्या आराम खुर्चीवर पडून वाचीत आहे; वत्सला प्रवेश करिते. ]

वत्सला—काय बरं हें ? वाचण्यानं त्रास नाहीं का होणार !

दिवाकर—पुरंच करितों आतां ! एव्हडं एक गीत राहिलं आहे ! [ वाचतो. ]

नभीं लटकतीस तूं नटुनियां जरी चांदणी,
महीस खिळतों हि दीन तृणपुष्प मी होउनी,
तरीहि तुज वांछितों सतत दीर्घ निश्वासुनी ।
प्रिये ! प्रणय उच्च नीचपण केधवां ना गणी ।

नभीं लटकतों हि मी नटुनियां जरी चांदणी,
महीस खिळतीस दीन तृण पुष्प तूं होउनी,
तरीहि तुज वांछितों सतत दीर्घ निश्वासुनी ।
प्रिये ! प्रणय उच्च नीचपण केधवां ना गणी ।

वत्सला—हं—पुरें झालं आतां !

( पुस्तक घेऊन बाजूला ठेविते. )

दिवाकर—पण आतां मी साफ बरा नाहीं का झालों ?

वत्सला—प्रकृति साफ झाली, असं डाक्टर म्हणाले ! नि माझीहि उद्यांपासून गरज नाहीं, असं ते म्हणत होते !

दिवाकर—छे ! डॉक्टरना काय कळतं आहे ? माझी प्रकृति कांहीं साफ बरी झाली नाहीं अझून ! मी कांहीं जाऊं द्यायचा नाहीं तुम्हांला इतक्यांत !

वत्सला—पंधरा दिवस तर झाले; आणखी किती रहायचं !

दिवाकर—मी म्हणेन तितके दिवस ! सारा जन्म.

वत्सला—वा बाई ! असं कसं चालेल ?

दिवाकर—न चालायला काय झालं ?

वत्सला—छे !

दिवाकर—बरं ! आणखी एक पंधरा दिवस तरी !

वत्सला—आणखी पंधरा दिवस—रहात्यें बापडी ! पण—

दिवाकर—पण काय ?

वत्सला—ज्याचीं दुःखें त्याला ठाऊक !

दिवाकर—तुम्हांला तीं काय दुःखें ? लग्न नाहीं, संसार नाहीं ! मग दुःखें कसलीं तुमच्या मागें ? पण आतां लग्न तरी केव्हां करतां !

वत्सला—सांगवत नाहीं !

दिवाकर—आणि ते भाग्यवंत पुरुष तरी कोण ! सांगतां का आम्हांला !

वत्सल—कळेल पुढें ! पण त्यांत भाग्य तें काय !

दिवाकर—वा ! तुमच्यासारखी प्रेमळ, सद्गुणी भार्या ज्याला लाभणार त्याचं भाग्य केवढं थोरं !

वत्सला—काय तरी बाई वर्णन हें ! कुणी म्हणेल, जसं खरेंच !

दिवाकर—खरंच तर काय खोटं बोलतों मी ! उगाच स्तुति करतों तुमची !

वत्सला—आपल्या अर्धांगीसमोर कराल का ही अशी स्तुति !

दिवाकर—न करायला काय झालं ? त्या हडळीला का मी भिईन !

वत्सला—अगबाई ! हडळ ती कशी ?

दिवाकर—कशी ती कांहीं मला ठाऊक नाहीं. माईसाहेब म्हणतात, ती मुलखाची हडळ म्हणून.

वत्सला—म्हणजे आपली अर्धांगी, नि ती कशी आहे, तें आपल्याला ठाऊक नाहीं. नि माईसाहेबानां ठाऊक तें. नवल नाहीं!

दिवाकर—आहे खरं असं, आमचं लग्न झालं इतकेंच काय तें. बाकी आमचा कांहींच संबंध नाहीं.

वत्सला—असं पातक तरी काय केलं आहे त्यांनीं.

दिवाकर—पातक ! माईसाहेबानां ती आवडत नाहीं—हेंच.

वत्सला—बाई बाई ! चमत्कार आहे. तुमच्याशीं तिची जन्माची गांठ, ती माईसाहेबानां आवडत नाहीं एवढ्याच कारणाकरितां तुम्हांला नकोशी व्हावी. नि ती खरोखरी कशी आहे तेंहि न पहातां !— आश्चर्य नव्हे हें !

दिवाकर—आहे खरं असं !

वत्सला—आपण मला ठरविली आहांत, तितकीच प्रेमळ, तितकीच सद्गुणी अशी आपली अर्धांगी आहेसं आतां आपल्याला जर कळून आलं तर पुनः तिचा स्वीकार करायला काय हरकत असावी ?

दिवाकर—मी त्या गोष्टीचा विचारच केला नाहीं आजवर.

वत्सला—पण आतां तरी विचार करायला नको का ? नाहींतर आपल्या चुकीकरितां दुसऱ्याचा जन्म फुकट जावा, हें देवाच्या घरीं पातक नव्हे का ?

दिवाकर—खरं सांगूं ! तुमचा सहवास घडण्यापूर्वी असले शुद्ध विचारच मला कधीं शिवले नाहींत. शुद्ध, उच्च, पुण्यकर असं कांहीं आहे, हे तुमच्याच सहवासांत मला कळून आलं. आणि मागचें माझें अशुद्ध, नीच पापी जीवन मागचें मागें टाकून देऊन, नवजीवनाला आता उपक्रम करावा, असं तुमच्याच सहवासांत मला वाटायला लागलं आहे !

वत्सला—हें ऐकून मला किती आनंद होतो म्हणून सांगूं. हा आपला खरा पुनर्जन्मच होय. देवानं हें आपणाला नवजीवनच दिलं म्हणायचं. ह्या दुखण्यांतून आपण उठलांत, म्हणजे नुसतं मृत्यूच्या दाढेंतून सुटलात इतकंच नव्हे तर मृत्युहूनहि भयंकर अशा सर्व संहारक पातकाच्या कचाटींतूनहि आपण सुटलात.—असं म्हणायला काय हरकत आहे.

दिवाकर—पण ह्याचें सर्व श्रेय ह्या देवतेला.

वत्सला—छे. ह्याचं सर्व श्रेय त्या करुणाघनालाच.

दिवाकर—ह्या देवतेचा सहवास जर निरंतर घडेल, तर माझें हें नवजीवन सहजच शुद्ध, उदात्त होईल.

वत्सला—खरंच का वाटतं असं !

दिवाकर—खरोखरच. देवाशपथ.

वत्सला—तर मग मंगळसूत्रानीं मी ह्या पायाशीं आधींच बांधलेली नाहीं का ?

दिवाकर—म्हणजे ?

वत्सला—म्हणजे ( काळा चष्मा काढून ) मी आपली दासी वत्सला नाहीं का ?

दिवाकर—कोण ?—मी स्वप्नांत तर नाहीं ?

वत्सला—पूर्ण-पूर्ण जागृति आहे ही. मायामोहानें आपला वियोग केला होता; आज प्रेमजागृतीनें आपला योग घडविला आहे. ही मायालीला,—ही

भीमामाया,—जीवाशिवामध्येंच द्वैत आणून रहात नाहीं; जीवाजीवामध्येंच द्वैत आणून रहात नाहीं; तर एका जीवाच्या दोन अर्धांत, पतिपत्नींतहि द्वैतभाव उत्पन्न करीत असते. आतां प्रेमरूपी परमेश्वरानं तिचा निरास केला आहे. आतां पूर्ण जागृतीवांचून, पूर्ण जीवनावांचून दुसरं काय उरणार.

दिवाकर—लाडके. ( बाहू पसरून आलिंगन द्यावयास जातो, तों शेवटचा पडदा पडतो. )

---

# [ ५ ]

# त्राटिकेचा अवतार !

## अंक पहिला

### प्रवेश पहिला

[ स्थळ:—बाबासाहेब कुबेरांच्या बंगल्यांतील दिवाणखाना, बाबासाहेब व भार्गव प्रवेश करितात, ]

भार्गव—असा धीर सोडून कसं चालेल, बाबासाहेब ?

बाबासाहेब—धीर सोडूं नको ? काढेकिराईत खायला सांगणं सोपं रे बाबा ! पण त्याचा कडूपणा तें खाणारच सांगू जाणें !—तेंही केलं,—आजवर धीरही धरला ! आणखी किती खाऊं धीर ? गेलीं दोन वर्षं धीरच खाल्ला ना ? म्हटलं आज नाहीं उद्यां येईल ताळ्यावर पोरटी ! पण ती आपली आहे तशी आहे त्राटिका ! आतां वरणार कोण हिला, आणि आम्हांला नातवंडं दिसणार कसची ? आतां यंदा ही चांगली म्यॅट्रिक्युलेशनला बसणार, म्हणून हिला अनुरूप अशीं किती सुंदर स्थळं मी पाहिलीं ! बॅरिस्टर सुंदररावासारखे, सरदार नानासाहेबासारखे हिरे कारटीला पहायला आले ! पण हिचं हें त्राटिकेचं वारं अंगांत संचरून, बापड्यांना पळतां भुई थोडी झाली ! झालं, ही लतिका म्हणजे दुसरी त्राटिकाच, असं एकदां जगभर झालं !—आतां कोण हिला वरतो, नि गळ्यांत बांधून घेतो ?

भार्गव—तरी पण धीर नाहीं सोडतां कामा ! हूड आहेत त्या अद्याप —!

यान्या सोळा वर्षांच्या! आणखी चांगलीं पांचसात वर्षे जाऊं द्या, खास उघडतील डोळे त्यांचे!

बाबा०—तिचे डोळे उघडतील खास; पण त्याआधींच माझे मिटणार नाहींत कशावरून?–तें कांहीं नाहीं! लग्न हें यंदा झालंच पाहिजे!

भार्गव—लतिकाताईंचं नाहीं झालं, तर आपलं तरी निदान!

बाबा०:–माझं लग्न? काय, थट्टा करतोस कीं काय? साठी लागली ना आतां, भार्गवा?

भार्गवः—थट्टा कां करीन?–खरंच म्हणतों कीं! साठी लागली म्हणून काय झालं? शेजारच्या दादुआण्णांच्या वेणूमारखी एखादी चांगली उफाडयाची मुलगी पाहून आपल्या डोकीवर यंदा मंगलाक्षता पडूं द्या, म्हणजे रावबहादूर बाबासाहेब कुबेरांचं नांव सांगणारा, ह्या धनदौलतीचा शिधा वारस लाभण्याची जरी आपल्याला आशा नसली, तरी ताइसाहेबांचं हें नाटिकेचं वारं खास पळून जाईल त्यानं!

बाबा०:—खोटं नाहीं भार्गवा! कारटीचं वारं खचित् उतरेल त्यानं! खास–असंच! बघतों आतां! इतक्यांत दहाला ते गोपीनाथ वकील, आणि दोन प्रहरीं ते भय्यासाहेब जहागीरदार येणार आहेत तिला पाहायला! त्यांच्या समोर ही नीट गुणांनीं वागली, तर ठीकच! आणि जर का नेह-मीचं हें वारं अंगांत संचरलं, तर उद्यां मी आपलं स्वतःचंच लग्न ठोकतों. मग परवांच ‘राम’ म्हणालों तरी बेहेत्तर!

भार्गवः—बेहेत्तर बाबासाहेब! बाकी, खरं म्हटलं तर, साठींत ‘शिव मंगल’ म्हटलं काय, अथवा ‘राम’ म्हटलं काय,—सारखंच!

बाबा०:—(भिंतीवरील घडयाळाकडे पाहून) दहा व्हायला तर आलेच! आतां इतक्यांस येतील गोपिनाथ वकील!–जा आधीं. लति-केला जाऊन सांगा, ‘तयार अस; मीं जें कांहीं सांगितलं आहे, तें लक्षांत बाळग’–म्हणून! आणि पगडी घाडून दे आंतून. (भार्गव जातो.) हे आलेच गोपिनाथ वकील! (पोऱ्या पगडी आणून देतो, ती घालून) यावं वकीलसाहेब! (गोपिनाथ प्रवेश करतो.) घ्या! दहाला दोन मिनिटं

कमी, तोंच आरण ठेवलेले! हें असं पाहिजे!—बसावं! (दोघेही बसतात.)

गोपिनाथः—पण ठरलेल्या वेळेनंतर, उशीर करून कोणतीही गोष्ट होणं जितकं वाईट, तितकंच ती वेळेच्या आधीं होणंही वाईट! (मनगटावरील घड्याळ पाहून) माझं घड्याळ चांगलं दोन मिनिटं पुढं दिसतं! एरव्हीं, मी आधीं येतों ना! कारण, मी पडलों धंद्याचा माणूस!

बाबा०:—नाहीं—नाहीं—गोपिनाथराव, आमचंच घड्याळ मागं असावं! आमच्यासारखंच तें वृद्ध! वेटयानं काम तरी किती द्यायचं!—बरं तें असो. आतां आपलं मुख्य काम. आमची लतिका,—तिला आपण पूर्वी कधींशीं पाहिली असल्याचं काल म्हणालांत, नाहीं का?

गोपिनाथः—होय—होय!—पुष्कळदा!—

बाबा०:—अस्सं! किती गुणाची आहे म्हणून सांगूं! पण—पण जरा कुठं हूड आहे. एकुलती एक, आमच्या कुटुंबाच्या मागं हीच आमचं इहसर्वस्व! तेव्हां थोडी लाडांत वाढलेली!—अल्लड आहे! पण त्याचं काय मोठंसं!

गोपिनाथः—त्याचं काय मोठंसं!—चालायचंच असं!—कारण—मी पडलों धंद्याचा माणूस!—

बाबा०:—तरी पण माझी लतिका म्हणजे लाखांत एक मुलगी आहे बरं का वकीलसाहेब! पाहालच तुम्ही तिचे सगळे गुण!

(छबी धापच्या धापच्या धांवत प्रवेश करते)

छबी:—सोडवा हो सोडवा धनी मला ताईसाहेबांच्या तावडींतून! पाठीस लागल्या आहेत माझ्या त्या! (बाबासाहेबांच्या पाठीशीं दडते.)

बाबा०:—अग, चूप! चूप!

छबी:—चूप कशी राहूं आतां! खाऊन टाकतील मला त्या!

बाबा०:—अग, भिऊं नको. धीर धर जरा.

छबी:—नाहीं धीर धरवत साहेब ह्या उप्पर! नको मला ही चाकरी नि ताईसाहेबांचा हा जाच!

बाबा०:—नको तर जा ! नीघ- हो चालती इथून !-( गोपिनाथास ) माझ्या लतिकेची गोष्ट नाहीं बोलत हो ही !

छबीः—मग दुसऱ्या कुणाची, साहेब ? लतिकाताईसाहेबांचंच सांगत्यें आहे मी ! ( गोपिनाथास ) आपण भले माणूस दिसतां; आपणच सांगा, असल्या नाटिकाबाईचा जाच आम्ही चाकर माणसांनीं कुठवर सोसायचा ! पाहा ही अंगावर शाईची दौत फेंकलेली !

बाबा०—कर तोंड काळं ! नाहीं तर—

गोपिनाथ—खरंच कीं काय ही सांगते तें ? हो— कारण मी पडलों धंद्याचा माणून !

बाबा—नाहीं हो ! खरं कसं असेल हें ? हिनं कांहीं कामबिम नसेल ऐकलं !—

लतिका—( आंतून ) कुठं गेली ती सटवी ? गेली कुठं ती छबटली ?

बाबा०—आटोपलं ! आलीच इकडे कारटी ! ( केस मोकळे सोडलेली लतिका प्रवेश करते, )

लतिका—( छबीचे दोन्ही कान धरून ) अग सटवाई ! मला प्रत्युत्तर करत्येस ? ( कान धरून हालविते. )

बाबा—ग बाळ, ऐक—

लतिका—मी नाहीं ऐकायची, बाबा ! हिच्या अंगावर शाईची दौत फेंकली मीं सहज गमतीनं ! त्याचा इतका कांगावा करत्ये, नि मला उत्तर करत्ये ! साफ सांगत्ये मी, मला नाहीं खपायचं हें असलं !

छबी—सोडा ताईसाहेब, माझे कान ! आतां लगिन झालं, कीं नवऱ्याचे उपटा कान पोटभर ! मी नाहीं बसल्यें कान उपटून घ्यायला नि कुणाचा नवरा व्हायला !

लतिका—नवऱ्याचे कान ! नवऱ्याचे कान उपटायला थोडीच कमी करणार आहे ही लतिका ! त्याचीच—त्याचीच रंगी तालीम करत्ये आहे बरं ही छबटले ! ( कान उपटीत ) नवरदेवाचे कान हे असेच उपटून—आखूड करून घ्यावे लागतात हो !

गोपिनाथ—अरे बापरे ! ( कान हातांनीं झांकून ) कारण मी पडलों धंद्याचा माणूस !

बाबा०—पुरे-पुरे कर आतां ! ( खालीं मान घालतात. )

लतिका—( लक्ष न देतां ) बायकांत बायका दोन ! तुकोबाची जिजाई नि सॉक्रेटिसाची झँटिपी ! रोजच्या रोज असे कान खुडून त्यांनीं नवऱ्यांना सुतासारखे सरळ, नि मेणासारखे मऊ केले !—नि साऱ्या जगाला आज त्यांचे गोडवे गायला लावलं !

गोपिनाथ—धन्य-धन्य लतिकाबाई ! धन्य तुमची ! हा उद्दामपणा चालूं कसा दिलांत बाबासाहेब, आजवर ? वेळींच लगाम कां नाहीं घातलीत ?

लतिका—( चपापून ) कोण बाई, आपल्याला कुणी सांगितला हा लांडा कारभार ? लगाम, नि ती ह्या लतिकेला ? आपण पुरती ओळखली नाहींसं दिसतं मला ?

गोपिनाथ—पुरत्या ओळखल्या ! त्राटिका आहांत दुसऱ्या कोण ?—

लतिका—त्राटिका ! त्या बावळ्या त्राटिकेची नि माझी बरोबरी ? त्या प्रतापरावाच्या,—काय पण त्याचे प्रताप !— आरड्याओरड्यानं, नि उपासमारीनं गोगलगाय बनणारी ती अशिक्षित त्राटिका, आणि ही सुशिक्षित लतिका सारखीच होय ?—थांबा, दाखवित्येंच तुम्हांला मी कोण आहे तें ! ( कान उपटण्यास पुढें जाते. )

गोपिनाथ—( एकदम उठून, हात जोडून. ) नाहीं-नाहीं बाईसाहेब, त्राटिकेच्या बाप आहांत आपण ! ह्या बाईला का ह्या गोपिनाथ वकिलाच्या गळ्यांत अडकविण्याचा डाव होता बाबासाहेब आपला ? वाः छान धंदा हा ! —हे !—कारण मी पडलों धंद्याचा माणूस !—एखादा चाबुकवीर प्रतापरावच हवा ह्यांना वठणीवर आणायला ( जातो ).

लतिका—अगबाई ! कोण हे ? वकीलसाहेब कीं काय ?

बाबा०—मग दुसरे कोण कैदासणी ?

लतिका—दुर्दैव माझं ! वेडी तर नाहीं मी ? मला कसं कळूं नये हे वकीलसे ?

बाबा—कळेल कसं तुला कारटे? रड आतां अशीच! कसा सोन्यासारखा वकील,—गेला ना हातचा? कसा मनाजोगा नवरा होता!

लतिका—तसे ते नसते, तरी बाबा, मी त्यांना करून घेतले असते तसे!

बाबासा०—कान उपटून ना?—थांब, तुला वळणावर आणायला आतां एक चांगलीच तोड काढतों. ( जातात. लतिका व छबी पोट धरून हसूं लागतात. )

छबी—सत्रा आणे साधलं नाटक ताईसाहेब!

लतिका—पण हें करूं तरी कुठवर नाटक मी, छबे? ते टाळसूरचे जहागीदार येणार आहेत आतां जराशानं! आणूं तरी कुठवर हें नाटिकेचं सोंग!—कसलं तरी सोंग हें करायला हवंच! त्यावांचून तर सुटकाच नाहीं! वडील माणसं पोटच्या गोळ्याला जोंपर्यंत वाटेल त्याच्या गळ्यांत अडकवायला कचरत नाहींत, तोंपर्यंत असलीं सोंगं नि नाटकं करायलाच हवींत!—हे टाळसूरचे भय्यासाहेब जहागीरदार आहेत म्हणे संगीताचे वेडेपीर! मी आपलं नेहमीचं वारं आणून कैदाशणीचे अगदीं खडे सूर जरी काढले, तरी त्यांच्या संगीतज्ञ डोक्याचा सूर ढळेलच, नि डोक्यांत राख घालून ते निघून जातीलच, असा काय नेम? तेव्हां आतां अगदीं निराळ्याच सुरावर गात्यें आणि बघत्यें ह्या टाळसूरकरांचा सुरेलपणा कुठवर टिकतो तें!

छबी—पण गडे, त्या स्वारीला,—आपल्या मनांतल्या मूर्तीला कळलं हें, कीं आपल्यासाठीं अशीं नाटकं चाललीं आहेत, तर बाई केवढा आनंद होईल तिकडे? पण ताईसाहेब, त्यांचं नांव अजूनही नाहींच ना कळूं द्यायचं ह्या दासीला? मी नाहीं हो कुणाला कळूं द्यायची तें! घ्याना एकदा तें नांव! हं! म्हणा गडे, दारीं होता कोनाडा—

लतिका—इश्श! नको तुझा दारचा कोनाडा माझ्या मूर्तीला ह्या इथं—ह्या हृदयाच्या कपाटांत मीं ठेवलं आहे त्यांना लपवून. आणि इतक्यांत नाहीं मी थांगपत्ता लागू द्यायची कुणालाही! तूं पहूच नको भरीस तें नांव विचारण्याच्या, मी तें आपण होऊन सांगेतोंपर्यंत. ( स्वगत ) श्रीकंठ! तुमच्या त्या गोड, अमृततुल्य गोड नांवाचा उच्चार करण्याचंहि धारिष्ट

होत नाहीं माझ्या ओठाना, तुमचं मन कसं आहे तें मला कळलं नाहीं तोंपर्यंत ! ( जातात )

## प्रवेश दुसरा

( स्थळ—दिवाणखाना. बाबासाहेब व इंदुरी नकटी पगडी घातलेले भय्यासाहेब जहागिरदार बोलत बसले आहेत. )

भय्यासाहेब—खाशी ! पण आतां उशीर नको. होऊं द्या घरांत हुकूम ! जयपूरचा एक गवय्या यायचा आहे आमच्याकडे हजिरी द्यायला जराशानं. तेव्हां मला गेलं पाहिजे हें आऽपून. कारण, बाबासाहेब, गाणं न् बजावणं आहे, तर सगळं कांहीं आहे ! तें नाहीं, तर कांहीं नाहीं !—अशी आहे आमची स्थिति !

बाबा०—संगीताची आपली आवड सर्वश्रुतच आहे, भय्यासाहेब!

भय्या—बहुत खाशी ! वेडच आहे म्हणाना मला त्याचं ! तो आमचा एक मोर्चाच आहे. त्याची पूजा-अर्चा हेंच आमचं इहसर्वस्व.

बाबा०—कोणाचा कांहीं-कोणाचा कांहीं—

भय्या०:—खाशी !— मोर्चा हा असायचाच ! कोणाचा घोडी नाचवण्याचा तर कोणाचा कलावंतिणी नाचवण्याचा; कोणाचा गाड्या उडविण्याचा, तर कोणाचा पतंग उडविण्याचा ! -मिळून मोर्चा असल्यावांचून जग कसं चालायचं ? ह्यांतलाच आमचा हा संगीताचा मोर्चा !- म्हणजे ह्याचा अर्थ मी संगीताची किंमत पतंग-गाड्या उडविण्याइतकी, किंवा घोडी-कलावंतिणी नाचविण्याइतकीच करतों, असा नाहीं समजायचा, बाबासाहेब !

बाबा०:—छे छे ! असा कसा करीन मी, भय्यासाहेब ?

भय्या०:— बहुत खाशी ! संगीत हें प्रत्यक्ष ब्रह्म आहे. ' नाद ब्रह्म ' असं त्याला आपल्या प्राचीन ऋषींनीं म्हटलं आहे ! संगीतानं परब्रह्माशीं जितकी आपली सहज मिळवणी होऊं शकते, तितकी अन्य कोणत्याही योगानं होणं शक्य नाहीं ! जिवा-शिवाची योग-ग्रंथी संगीत जशी गोडपणें बांधूं शकेल, तशी कर्मयोग, राजयोग, ज्ञानयोग किंवा भक्तियोग ह्यांना

बाघतां येणं अशक्य !—आणि म्हणून मी संगीताला ' योगराज ' म्हणतों!

बाबा०—पांचवा योगच आहे, म्हणाना !

भय्या०—खाशी ! संगीत हा पांचवा योगच आहे, असं नाहीं, तर योगांचा योग आहे, बाबासाहेब !

बाबा०—असं खरं,—पण—

भय्या०—बहुत खाशी !–पण आजला त्याचा आणि: आपला वियोगच झालेला आहे ! तो वियोग दूर करून आपला व संगीताचा पुनश्च योग घडवून आणणं—

बाबा०—ह्या योगायोगाच्या गोष्टी आहेत !

भय्या०—बहुत खाशी !–पण मुख्य विषय बाजूलाच राहिला ! माराच हांक आतां बाबासाहेब आंत !

बाबा०—( समोर पाहून ) आलीच ती !

भय्या०—अच्छा !–बहुत खाशी !

बाबा०—( स्वगत ) आरंभ तर ठीक केला आहे पोरीनं ! ( लतिका येते.)

भय्या०—खाशी ! संगीताची आवड असेलच चांगली.

लतिका—संगीत ' मूकनायक ' भारी आवडतं मला !

बाबा०—( स्वगत ) मुकी कां नाहीं होत पोरटी !

भय्या०—बहुत खाशी !—भारी आवडतं ना संगीत !

बाबा०—भारी आवडतं तिला संगीत !

लतिका—छे बाई ! मुळींच नाहीं !

भय्या०—वा जी !–म्हणजे ?

बाबा०—( स्वगत ) विचित्र कारटी ! ( उघड ) लाजाळू आहे ती, भय्यासाहेब ! गोंधळून गेली अगदीं !—बाळ गोंधळूं नको ! नीट सांग, आहे म्हणून !

लतिका—गोंधळून गेल्ये बाई मी ! गोंधळ हा संगीताचाच एक प्रकार! –पण त्याचं संगीत नाहीं मला आवडत.

भय्या०—बहुत खाशी !–म्हणजे ?

बाबा०—( स्वगत ) लागली कारटीची जीभ धांवायला भेरावेरा !

( उघड ) गोंधळल्यासारखी करूं नको. तुला गाणीं आवडतात, नाहीं का ?

लतिका—हो तर ! भारी आवडतात मला—

भय्या०—खाशी ! रागदारी वगैरे कळते का ?

बाबा०—वा, तें काय विचारावं ! रागदारी तर तिला इतकी कळते, कीं कांहीं पुसूं नका !

भय्या०—बहुत खाशी ! आणि वाद्यं वगैरे कोणतीं आवडतात ? सतार, दिलरुबा, बीन, ताऊस, कीं--

लतिका—सनई, चौघडा, एकतारी, टाळमृंदग, घंटा, शंख, पिपेरी--

भय्या०--वा जी !–बहुत खाशी !–म्हणजे ?

बाबा०--( स्वगत ) सुटलीच कारटी बेताल ! ( उघड ) तिची वाद्यांची अभिरुचि फारच व्यापक आहे. व्यापक अभिरुचि ही तर आजकालच्या शिक्षणाचा उत्तमोत्तम संस्कार आहे, नाहीं भय्यासाहेब ?

भय्या०—खाशी ! तरी पण, त्यांतल्या त्यांत विशेष आवडीचं असं कोणतं वाद्य ?

लतिका--किरकिरं वाद्य बाई मला किती पण आवडतं !

भय्या--वा जी ! बहुत खाशी ! बहोत खाशी !–म्हणजे ?–

बाबा०--( स्वगत ) आतां करावं तरी काय ह्या कारटीचं ?

भय्या०--खाशी आवड किरकिऱ्याची ! बहुत खाशी वाद्य किरकिरं ! केवढं महावाद्य तें ! संगीत विद्येचा विध्वंस करायला प्रत्यक्ष असुरेश्वरानं घेतलेला अवतारच तो !

बाबा०—आतां एक डोकं फोडून ध्यायचं उरलं आहे हिच्यापुढं !

भय्या०:—बहुत खाशी ! माझं डोकं तर उडूनच गेलं ह्या किरकिऱ्याच्या नामोच्चाराबरोबर ! सतार राहिली, पेटी राहिली, दिलरुबा राहिला, ब्रह्मांड राहिलं !—नि किरकिरं आवडतं !—खाशी ! ह्या किरकिरं संगितवाल्या लतिकाबाईबरोबर साऱ्या त्रिभुवनाचं राज्य मिळत असलं आंदण म्हणून, तरीही हा असा उठून जाणार भय्यासाहेब जहागिरदार !–समजलांत बाबासाहेब ? –( उठून ) बसावं बाबासाहेब ! तो

याकूतखां गवय्या येऊन बसला असेल आमची वाट पाहात आमच्या बिऱ्हाडीं! बहुत खाशी!—घेतों आतां निरोप! (जातो.)

बाबा०:—तुझे डोळे आतां कारटे उघडणार तरी कशानं?—तुझ्या नशिबीं सावत्र आई ही आतां ठेवलेली! भोग आपल्या कर्माचीं फळं, (जातो.)

लतिकाः—(स्वगत) याईबाई! आतां मात्र मला खरीखुरी भीति वाटायला लागली बाबांची! हा राग आतां कोणत्या थराला जाईल, नि काय करील कुणी सांगावं? सावत्र आई तर आतां खास येणारच. आणखी दुसरं काय काय होणार देव जाणे!—पण बाबा, तुम्हीं मला सावत्र आई आणा, नि दुसरं कांहीं करा माझे डोळे उघडायला; एका सूर्याच्या दर्शनावांचून कमलिनीचे डोळे उघडत नसतात दुसऱ्या कशानं! आणि तें दर्शन होईतोंपर्यंत सगळं काळोखाचं ब्रह्मांड जरी उठलं तिला खायला, तरी तें ती कांहीं पहात नसते, हें लक्षांत ठेवा! (छबी येते.)

छबीः—किती—किती पण रागावले आहेत धनीसाहेब! ते आतां लगिन करणार म्हणे स्वतःचं!

लतिकाः—करूं देत लगीन या साठींत!

छबीः—पण ताईसाहेब, सांगा ना मला नांव आपल्या त्या मूर्तीचं! हूं! —सांगायचं आतां!

लतिकाः—शेजारचे दामुअण्णा—

छबी—सांगा सांगा! मी नाहीं कुणाशीं बोलायची—

लतिकाः—शेजारचे दामूअण्णा—

छबीः—(हंसून) काय—दामूअण्णा! हा शेजारचा कवडीचुंबक म्हातारा मनांत भरला आहे आपल्या!

लतिकाः—नाहीं ग, दामूअण्णा नाहीं!

छबीः—मग दामूअण्णाचं कोण!

लतिकाः—त्यांचे पुतणे—श्रीकंठ!

छबीः—अस्सं! विलायतेला कलेक्टराच्या परीक्षेला गेलेले ते होय? वाः

ताईसाहेब! फार–फार नामी निवड केलीत तुम्हीं! पण ते विलायतेला गेले आहेत, ते इथं येणार केव्हांशी?

लतिका—गेल्या बोटीनं यायचे होते!–

छबी—आपल्याला पत्रबित्र आलं होतं का?–वाः, आपली पत्रंही चालू आहेत वाटतं?

लतिका—छे ग! त्यांची माझी ओळख तरी आहे का? मीं त्यांना नुसतं पाहिलेले! चार वर्षांपूर्वी चुलत्याचा निरोप घ्यायला आले होते ते विलायतेला जातांना तेव्हां!

छबी—तेव्हांपासून का त्यांचं ध्यान करतां आहात ताईसाहेब?

लतिका—होय ग. पण आतां असं कर, शेजारच्या दामूअण्णांच्या वेणूला जाऊन भेट! नि—काय करायचं तें सांगतें तुला मगळं, चल! (जातात.)

## प्रवेश तिसरा

[स्थळः—दामुअण्णाच्या घराची ओसरी. दामुअण्णा व बाबासाहेब प्रवेश करितात.]

दामूअण्णा—यावं असं बाबासाहेब! नीट ओसरीवर बसूं आणि बोलूं मोकळेपणानं ह्या गोष्टी. (मोठ्यानें) अरे, कुणी तेवढी बैठक आणा इकडे पाहूं! पण कोण असणार आंत दुसरं, एका वेणूवांचून? मीच जाईन, आणि घेऊन येईन बैठक तेव्हां! (जातो.)

बाबा०—(स्वगत) ह्या वयांत स्वतःच्या लग्नाच्या गोष्टी बोलायला सुद्धां लाज वाटते आहे मला! पण करणार कसं त्याला? माझं लग्न जुळविल्याचं हें नाटक केल्यावांचून लतिकेचे डोळे उघडायला उपाय आहे दुसरा?

[दामुअण्णा गोणपटाचा फाटका तुकडा घेऊन येतात व तो अंथरतात.]

दामूअण्णा—बसावं आतां बाबासाहेब ह्या बैठकीवर!

[बाबासाहेब बसतात; दामुअण्णा जेठा मारून जमिनीवर बसतो.]

बाबा०—मग कसं म्हणतां दामूअण्णा? लग्न करावं मीं ह्या वयांत?

दामूअण्णा—अगदीं बिलकूल हरकत नाहीं आपल्याला लग्न करायला! परवां त्या काका साठ्यांनीं नाहीं का केलं? आपण तर त्याच्याहून कांहीं

नाहीं तरी आठदहा वर्षांनींच लहानच असाल. आपल्याला कांहीं साठी नाहीं लागली अद्याप !

बाबा०—छे छे ! साठी नाहीं लागली,-पण-पण-

दामूअण्णा—पण काय ?

बाबा०—पण मुलगी कोण द्यायला बसलं आहे हो आतां आपल्यासारख्याला ?

दामूअण्णा—मी देतों माझ्या वेणूला !

बाबा०—काय खरंच ?

दामूअण्णा—ईश्वरसाक्ष ! मनापासून इच्छा आहे माझी ! येत्या दशमीच्या मुहूर्तावर उरकून टाकूं शुभमंगळ ! आणि आतांच्या आतां,-ह्याच बैठकीवर करून घेऊं साखरपुडा !

बाबा०—तें करूं सगळं म्हणा ! पण असं विचारतों, तुमच्या वेणूला हें कितवं वर्ष ?

दामुअण्णा—तिला वर्ष,-अहो, आपल्या लतिकाबाई झाल्या किनई बाबासाहेब, त्याच सालीं झाली ही ! हो—लतिकाताई झाल्या भाद्रव्यांत, आणि आमची वेणू झाली पुढं त्याच शिमग्यांत !

बाबा०—म्हणजे लतिकेहून चांगली सहा महिन्यांनीं लहान कीं !—मोठीच अडचण !

दामुअण्णा—कां ?—ह्यांत कसली अडचण ?

बाबा०—अहो, ही लतिकेची आई होणार ना ? मग लेकीहून आई लहान, हें सृष्टिविरुद्ध नाहीं का ?

दामुअण्णा—मग त्यांत काय बिघडलं ? परवां काका साठ्यानं नवं कुटुंब केलं, तें केवढं आहे ? त्याच्या पहिल्या कुटुंबाच्या मुलीच्या मुलीहून चांगलं चारसहा वर्षांनीं लहानच ! मग इथं नाहीं नातीहून आजी लहान ? हें असं चालायचंच, बाबासाहेब ! त्याला कसं करणार ? त्याकरतां लग्नं थोडींच ठेवायचीं आहेत—! मग काय,—साखरपुडा उरकून घ्यायचाच ना ह्याच बैठकीवर ?

बाबा०—थोडं धीरानं घ्या दामुअण्णा. ह्या लग्नाच्या गोष्टी पडल्या त्या धीराधीरानंच केल्या पाहिजेत!

दामुअण्णा—पण ह्या उतारवयातल्या लग्नाच्या गोष्टी! ह्यांत धीरानं घेऊन कसं चालणार? धीर धरायला वेळ आहे कुठं आतां आपल्याला ह्या वयांत, बाबासाहेब?

बाबा०—तें तर खरंच! पण—काय म्हणत होतों?—हो! मुलीचं शिक्षण कितीसं झालं आहे तुमच्या?

दामूआण्णा—शिक्षण? आपल्या लतिकाताईप्रमाणं इंग्रजी मॅट्रिक्युलेशनचा अभ्यास कांहीं नाहीं झालेला तिचा! फक्त मराठी येतं आहे तिला—पण वाचते काय हो धडाधड आगगाडी जशी! (मोठ्यानें) वेणू! बाळ वेणू! अग, तुझीं तीं पुस्तकं घेऊन ये सगळीं इकडे. हे बाबासाहेब आले आहेत पाहायला तुला! त्यांना वाचून दाखीव तीं सगळीं! (स्वगत) जुन्या बाजारातून सबंध एक आण्याचे छदाम खर्चून पोरीसाठीं सतरा पुस्तकं आणलीं! त्याचं अगदीं सार्थक झालं आज! (उघड) बाळ, ये ना झटपट तुझीं तीं सगळीं पुस्तकं घेऊन! (बाबासाहेबांस) आणि साखरपुडा उरकून घ्यायचा ना हातासरशीं ह्याच बैठकीवर? (मोठ्यानें) अरे, कुणी साखरपुडा घेऊन या बरं एक बाजारांतून!—पण 'ओ' द्यायला आणि बाजारांत जायला आहे कोण वेणूवांचून? गेल्या प्लेगांत कुटुंब गेल्यापासून मोठा लंगडा झाला आहे आमचा संसार! पण करणार कसं? मी स्वतः उठेन, आणि जाईन बाजारांत तेव्हां! (उठून) पण वेणू! बये, ये बरं झटकन्! (रडवें तोंड झालेली वेणू पुस्तकें घेऊन येते.) ये बाळ! वाचून दाखीव बाबासाहेबांना तीं सगळीं पुस्तकं! तोंवर मी घेऊन येतों साखरपुडा बाजारांतून!—वाच! घाबरूं नको बरं! (बाबासाहेबांस) घ्यावी आपण परीक्षा तिची! मी हा आलोंच जाऊन उभ्या उभ्या! (कनवटीस हात लावल्यासें करून) अरेच्या! मोड नाहीं!—सुटे छदाम असतील नाहीं चार कनवटीस आपल्या?

बाबा०—छदाम—!— हो — रुपये असतील कांहीं खिशांत! (खिशातून

काढून ) घ्या.

दामूअण्णा—अबबब ! इतके काय करायचे बाबासाहेब ? तरी पण असो, वेळ प्रसंग आहे, असावेत सगळेच ! ( कनवटीस लावीत, स्वगत ) वडिलांनीं मरून श्राद्धाचा खर्च पाठीशीं लावून ठेवला, म्हणूनच केवळ त्यांच्या मरणाचं दुःख करणारा हा दामुअण्णा पदरचे दाम खर्चून साखर-पुडा आणणार ! ( वेणूस ) हं, उघड तुझीं सारीं पुस्तकं आणि वाच अगदीं घडाघड ! मी हा आलोंच परतशावली साखरपुडा घेऊन ! (जातो).

बाबा०—( स्वगत ) बाशिंगही न आणलं येतांना, म्हणजे मिळवली ! ( उघड ) बाळ, घाबरू नको, बैस खालीं.

वेणू—( हुंदका येऊन ) अग आई ग !

बाबा०—अरे बापरे !–अग रडूं नकोस ! मी नाहीं करीत तुला आपली बायको ! खरंच नाहीं करीत ! उगी. अग, साठी झाली, आतां ह्या लग्नाच्या फंदांत पडायला मी का वेडा आहे ? अग, किनई, मला हें सारं नाटक करायचं आहे थोडंसं, समजलीस ?

वेणू—( डोळे पुसून ) म्हणजे ?

बाबा—लतिकेनं काय चालवलं आहे, तुला ठाऊक आहे ना ? हिला सारखे वर मी शोधून आणीत आहे, आणि त्यांना ती वाटेला लावते आहे ! तेव्हां आतां हा माझ्या स्वतःच्या लग्नाचा बहाणा करून तरी ती वळणावर येते का पहायचं. आपल्याला सावत्र आई आली, कीं ती ह्या साऱ्या धन-दौलतीची मालकीण होणार, आणि मग आपण कुणीच नाहीं,–ह्या घरांत आपली काडीवरही सत्ता नाहीं, असं होणार !–ह्या धास्तीनं तिचे हे सध्यांचे चाळे मावळून, मी हें लग्न करूं नये म्हणून माझी नाकदुराई करायला लागली ती, कीं मग मुकाट्यानें मी म्हणेन तशी वागायला तयार होईल !–पण हें साधायला तुझं सहाय्य हवं मला.

वेणू—तें कसं ?

बाबा०—माझ्याशीं तुझ्या लग्नाचं ठरलं आहे, असा खोटाच बहाणा करायचा.—आणि आपण हें खोटंच नाटक करतों आहों, ही गोष्ट कांहीं

कुणाला—कुणाला म्हणून कळवायची नाहीं.–प्रत्यक्ष दामूअण्णांनांही हूं का चूं कळूं द्यायचं नाहीं! कळलं आतां?

वेणू—कळलं.

बाबा०—तर मग पून आतां डोळे नीट.–आणि हो हंसतमुख!—हें ठरलं हो आपलं आतां! मी येऊं तर? दामूअण्णा मिठाई घेऊन येतील ती टाक खाऊन. म्हणावं, मलाच खायला सांगितली आहे ती! आणि म्हणावं, मी येऊन भेटेन उद्यां सकाळीं तुम्हांला, येतों आतां मी! अं!

( जातो ).

वेणू—( स्वगत ) ह्या म्हाताऱ्याचं नि माझं लग्नाचं ठरलं आहे, असा खोटाच बहाणा करूं? नि लतिकाबाईसारख्या मैत्रिणीला फसवूं?–बाई इतकी का मला दुधखुळी समजतात हे? लतिकेनं जें हें नाटक मांडलं आहे, तें कशासाठीं, हें का मला कळत नाहीं? इतर मुलींसारखी बाप बांधील त्याशीं आपली जन्माची गांठ कधीं बांधून घ्यायची नाहीं–म्हणूनच ना तिनं हें सगळं चालवलं आहे? मग त्यांत तिचा काय दोष? आम्हां मुलींना कांहीं आवड निवड नसावीच जणूं! पुरुषांना जशा मनासारख्या बायका हव्याशा वाटतात, तसं आम्हां बायकांना कां नये वाटूं? पण आम्ही पडलों मुक्या गाई! ज्याच्या गळीं बांधाल त्याच्या बरोबर जाणं भाग! माझीच गोष्ट घ्या! ह्या बाबासाहेबांना हें नाटकच करावयाचं आहे म्हणून निभावलें. नाहींतर अण्णांनीं आणलाच होता किनई प्रसंग मजवर ह्या जख्खड जांबुवंताची बायको व्हायचा! तशांतलंच कांहीं होऊं नये, म्हणूनच जर लतिकाताईनं हें माजविलं आहे, तर मीही तिला नको का साहाय्य करायला?–केलंच पाहिजे!– कसं बरं करावं?—हो–असं–असंच! म्हाताऱ्याशीं माझ्या लग्नाचं जुळलं आहे म्हणून बहाणा तर करत्येंच म्हाताऱ्याच्या समजुतीकरितां, नि अण्णांचा राग होऊं नये म्हणून! आणि वर लतिकाताईला कळवूनही ठेवित्यें, हें सारं खोटं नाटक आहे, त्यानं फसून जाऊं नको म्हणून! ( जाते. )

( पडदा पडतो. )

# अंक तिसरा

## प्रवेश पहिला

[ स्थळ—सार्वजनिक वाचनालयापुढील बगीचा. श्रीकंठ व गोपिनाथ बोलत बसले आहेत. ]

श्रीकंठ—विलक्षणच अनुभव !

गोपिनाथ—विलक्षण—म्हणजे काय विचारतोस ? प्रत्यक्ष आर्टिकेशींच प्रसंग ! अरे—कशी वाघिणीसारखी अंगावर आली ती लतिका ! इंग्रजी विद्या म्हणजे वाघिणीचं दूध, म्हणून म्हणतात, त्याचा अनुभव आला ! नकोरे बुवा ह्या इंग्रजी शिकलेल्या आणि उन्मत्त वाघिणी बनलेल्या बायांशीं प्रसंग ! हो—कारण मी पडलों धंद्याचा माणूस !

श्रीकंठ—कां बरं ? सगळ्याच स्त्रियांवर कांहीं तूं म्हणतोस तसा अनिष्ट परिणाम खास नये होऊं !—आणि होत असला, तर मग तसाच सगळ्या पुरुषांवरही कां नये होऊं ? तुझी स्वतःचीच गोष्ट घे गोपिनाथ ! तूं नाहीं कुठं वाघोबा बनलास, त्याच विद्येनं ?—निदान लांडगा—केव्हा तरी ?

गोपिनाथ—असं हें कां व्हावं, हरी जाणे ! पण इतःपर आपण इंग्रजी शिकलेली मुलगी पाहायला देखील जाणार नाहीं, हें ठाम ठरलं !—मग वरण्याची गोष्ट तर लांबच राहिली ! अरे, माझं मोठं सुदैव श्रीकंठ, म्हणून ह्या आर्टिकेचं खरं रूप अचानक बाहेर आलं ! नाहीं तर हिच्या बाह्यरूपावर आणि कुलावर भिस्त ठेऊन जर का एकदां मी रावबहादुरांना कबूल करून चुकलों असतों तर मात्र अगदीं जन्माची चूक केली असती ! देवानंच खैर केली काल,—दुसरं काय !

[ भय्यासाहेब प्रवेश करितात. ]

भय्या०—खाशी ! दैवानंच खैर केली !—नाहीं तर किरकिरं लागलं असतं जन्मभर पाठीशीं !

श्रीकंठ—म्हणजे भय्यासाहेब ?

गोपिनाथ—तुमच्यावर खैर ती काय झाली बुवा ? मजवर मात्र काल अगदीं एका आर्टिकेशीं जन्माची गांठ बांधून घेण्याचा प्रसंग आला होता,

भय्यासाहेब !

भय्या०—बहुत खाशी वकील ! आणि माझ्यावर काल किरकिरं वाद्य-प्रिय अशी एक मुलगी गळ्यांत पडण्याचा प्रसंग कोसळला होता.—काल ह्याच वेळीं, ह्याच वाचनालयांत वकिलांनीं तुमची नि माझी ओळख करून दिली श्रीकंठ, त्यानंतर दोन प्रहरीं एक मुलगी पाहायला गेलों मी. चांगली सुरेख, शिकली सवरलेली ! पण काय ?—म्हणे किरकिरं आपलं प्रिय वाद्य ! वा जी वाद्य ! पेटी राहिली, सतार राहिली, सारंगी राहिली—— ?

गोपिनाथ:—पण त्यांत खैर ती काय झाली ?

भय्या०—खाशी ! किरकिरं वाजविणाऱ्या पोरीला हा भय्यासाहेब आपलं द्वितीय कुटुंब करणार ? त्यापरना आमरण विधुर राहिलों, तर काय बिघडलं ?—अहो, तिचा आणि आमचा एक सूर कसा जमणार ? पति-पत्नीचा एक सूर जमल्यावांचून का कुठं संसार संगीत होणार आहे ? हें इतकं कळत असून तिच्याशीं जन्माची गांठ घालूं ? बहुत खाशी !—आणि आजवर जो संगीताचा अभ्यास केला, वर्ज्यावर्ज्य, उच्चनीच, सूर-बेसूर,—ह्यांचं ज्ञान करून घेतलं, त्याच्यावर पाणी ओतूं ?—वा जी !

गोपिनाथ—मी काल इथून घरीं गेल्यावर ज्या मुलीला पाहायला गेलों होतों भय्यासाहेब, तिच्यांत जर एवढाच दुर्गुण असता, तर खास पतकरतों मी तिला ! कारण, एरव्हीं ती रूपानं सुंदर असून बापाच्या धनंतर धनदौलतीची एकटी वारस आहे !—पण करणार कसं ? पडली अगदीं बेसुर्‍यतखोर नाटिका !—आणि मी पडलों धंद्याचा माणूस !

भय्या०—खाशी मी जिला पाहायला गेलों होतों काल दुपारीं. ती रूपानं अगदीं अप्सरेसारखी, शिकलीसवरलेली, विनयशील, अशी असून शिवाय, आपल्या समुद्रतुल्य दौलतीची एकटी वारस आहे !—बहुत खाशी बायको !—पण करणार कसं ? संगीताचं तिला काडीचंही ज्ञान नाहीं !—नाहीं तर हें किरकिरं आवडतं का तिला ?

श्रीकंठ—सुंदर, सुशिक्षित, विनयशील, आणि श्रीमंत असून, एका संगीताच्या बाबतींत अज्ञान !

गोपिनाथ—मोठाच दोष विनई ! मला जर अशी अर्धांगी मिळेल, तर मी आपलं भाग्य समजेन !—आणि ही तिची किरकिऱ्याची हौस पुरविण्याकरितां सारं घर किरकिऱ्यांनीं भरून टाकीन ! कारण, मी पडलों धंद्याचा माणूस !

भय्या०—बहुत खाशी ! होतां कबूल तिला वरायला ? तुम्ही ' हो ' म्हणायचा अवधि, तिचे वडील,—रावबहादूर कुबेर—लोटांगणं घालीत येतील तुमच्या पायांवर !

गोपिनाथ—( ताडकन् उठून ) रावबहादूर कुबेर !—रावबहादूर बाबासाहेब कुबेरांची मुलगी !

भय्या०—वा जी !— बाबासाहेब कुबेरांची !—लतिका तिचं नांव !

गोपिनाथ—म्हणजे ?—त्या त्राटिकेला पहायला तर मी काल गेलों होतों !

भय्या०—खाशी !—ही बाबासाहेबांची लतिका तर मोठी मर्यादशील, लाजाळू, हाडाची गरीब, केवळ गोगलगाय आहे !—बहुत खाशी !—तिला त्राटिका म्हणतां ?

गोपिनाथ—त्या उद्दाम त्राटिकेला तुम्ही गोगलगाय म्हणतां !

भय्या०—वा जी ! किती गरीब ! किती साधीभोळी ! मोठी विनयसंपन्न मुलगी ! खाशी परिन ! पतीच्या अर्ध्या वचनांत राहायची !—पण तेवढं किरकिरं न आवडण्याइतकी जर संगीताची तिला आवड असती, तर काय—तिच्या गुणांचं चीज होतं ना !

श्रीकंठ—खासं कोडं आहे बुवा हें !—खचित, तुम्ही दोघे निरनिराळ्या दोन मुलींविषयीं बोलतां आहांत !

गोपिनाथ—बाबासाहेब कुबेरांची एकुलती एक मुलगी लतिका—हिच्याविषयीं मीं बोलतों आहे !

भय्या०—खाशी !—आणि मीही बाबासाहेब कुबेरांची एकुलती एक मुलगी लतिका—हिच्याविषयींच बोलतों आहे !

श्रीकंठ—आश्चर्य आहे !

गोपिनाथ—माझी थट्टा तर नाहीं मांडलीत भय्यासाहेब ? हो—कारण,

मी पडलों धंद्याचा माणूस !

भय्या०—बहोत खाशी ! थट्टा मांडली आहांत वकील माझी ! अहो, ही लतिका म्हणजे सौंदर्य-विद्याविनयादि गुणांनीं लवलेली पुष्पलतिकाच आहे केवळ !

गोपिनाथ—पुष्पलतिका ! मला तर तिच्यांत कांट्यांशिवाय दुसरं कांहींच दिसलं नाहीं. त्या कांट्यांचा मात्र चांगलाच अनुभव आला मला !

श्रीकंठ—ह्यात कांहीं तरी गैरसमज झालेला दिसतो गोपिनाथ तुझा,—नाहीं तर भय्यासाहेब, आपला—!

गोपिनाथ—शक्य नाहीं माझा गैरसमज होणं ! कारण मी पडलों धंद्याचा माणूस !

भय्या०—बहुत खाशी ! आणि माझाही मुळींच नाहीं गैरसमज झालेला !

श्रीकंठ—तर मग ह्या कोड्याचा उलगडा कसा करायचा ?—हो, एक तोड आहे. मी जातों आणि बघतों, ही लतिका कशी आहे ती !

भय्या०—अच्छा, सोळा आणे तोड काढलीत श्रीकंठ !—चला, मी देतों तुम्हांला बाबासाहेबांची ओळख करून !

गोपिनाथ—मी देतों ओळख करून हवी तर !—पण नको बुवा !—त्या त्राटिकेशीं प्रसंग यायचा पुन्हा !

श्रीकंठ—तुम्ही कुणीच येऊं नका मजबरोबर. मला ठाऊक आहे बाबासाहेबांचं घर. मी जाईन आणि घेईन ओळख करून !

भय्या०—बहुत खाशी ! चला, उठा तर ह्या क्षणीं.

श्रीकंठ—ह्या क्षणीं नाहीं जमणार. एका तासाभरानें जाईन मी तिकडे. त्या आधीं—हं आतां-मला एका नातेवाईकाकडे जायचं आहे भेटायला. स्वदेशीं आल्यापासून गेल्या चार दिवसांत जायला झालं नाहीं मला त्यांच्याकडे ! आतां हा जातोंच तिकडे.

भय्या०—खाशी !

गोपिनाथ—ठीक जमलं हें ! कारण—

श्रीकंठ—ठीक ! तुम्ही पडलां धंद्याचे माणूस !

भय्या०—वा जी ! बहुत खाशी !

( जातात. )

## प्रवेश दुसरा

स्थळः—बाबासाहेबांच्या बंगल्यांतील आडदालन.

[ लतिका व छबी प्रवेश करितात. ]

छबी—वेणुताईनीं अगदीं आपल्या कानांत सांगायला सांगितलंय मला ( लतिकेच्या कानाशीं ) कीं ' काल रात्रीं बाबासाहेब आले होते आण्णाशीं लग्नाचं बोलणं करायला ! नि आपल्या, नि बाबासाहेबांच्या लग्नाचं ठरलं कायम ! ' ( हंसते )

लतिका—मग अशी हंसत्येस काय तूं ?—मोठी आनंदाचीच बातमी आणिली आहेस किनई ही !—माझ्या तर तोंडचं पाणी पळालं ग हें ऐकून !

छबी—पण पुढें तर ऐका. वेणुताई म्हणाल्या, ' बाबासाहेबांचं नि आपलं झालं आहे संगिनमत ! ' ( हंसते. )

लतिका—पुन: दांत दाखवतेस ? माझ्या जिवांत भरली आहे इकडे धडकी ! नि तुला होतो आहे हर्षवायु !

छबी—( पदराखालचें पत्र देऊन ) हें पत्रच ध्या वेणुताईचं !—म्हणजे कळेल, मी काय म्हणत्यें तें !

लतिका—( पत्र उघडून वाचीत ) " लतिकाताई ईस—तुझे बाबा कांहीं खरंखुरं लग्न नाहीं करीत; लग्न ठरल्याचं नुसतं नाटक करीत आहेत. माझ्याशीं लग्न जुळल्याचा बहाणा करून तुला घाबरवायची व वळणावर आणायची, इतकाच त्यांचा हेतु आहे, तेव्हां घाबरूं नये व आपला निश्चय सोडूं नयें. कळावें. तुझी मैत्रिण वेणू. " शाबास वेणू ! माझी तूं खरी मैत्रिण आहेस. तूं केवढी मोठी कामगिरी केलीस आज ! नाहीं तर खास माझी धडगत नव्हती.

छबी—खरंच ताईसाहेब ! नि दुसरंही एक सांगायचं आहे आपल्याला वेणुताईना इथं दिवाणखाण्यांत घेऊन आले आहेत धनीसाहेब; नि किती

वेळ तरी त्यांच्या कानगोष्टी चालल्लेल्या आहेत तिथं! फार करून, आतां इतक्यांत त्यांचा पाहिला हल्ला होणार आपल्यावर! नि ह्या पहिल्या हल्ल्यांतच आपल्याला दांतीं तृण धरून शरण कसं आणतां येईल, ह्याचंच खलबत चाललेलं असेल ताईसाहेब हे!

लतिका—येऊं द्या म्हणावं आतां तुमचा हल्ला! मीही पण पक्की तयारीनंच आहे तुमच्याशीं तोंड द्यायला! (समोर पाहून) अगबाई! आलंच जोडपं इकडे. सोळा नि साठी—खासा जोडा शोभतो हा! विरोधंना शोभा येते, ती ही अशी! काळ्याकुट्ट रात्रीचं नि पांढऱ्या धगधगीत दिवसाचं लग्न जसं शोभून दिसतं, तसं हें काळ्या केसांचं नि पांढऱ्या केसांचं लग्न शोभतं आहे बाई!—काय—काय पण काय ऐट आणली आहे बाबांनी तरुणपणाची! ते बघ, चालताहेत कसे छाती पुढं काढून! मला नव्हतं बाई वाटलं कधीं, बाबा इतके लबाड असतीलसें!

(बाबासाहेब व वेणू प्रवेश करितात; लतिका पुढं येते.)

बाबा०—(स्वगत) धाबंच दणाणलं असेल कारटीचं! पण उसनं अवसान आणत्यें आहे हें! (उघड, लतिकेस) ही बघ तुझी भावी आई भेटीला आली आहे तुझ्या! खरं म्हटलें तर तूंच जायला हवं होतंस आधीं तिच्या भेटीला.

लतिका—खरंच बाई! चुकी झाली माझी. मानच आहे तसा आतां वेणूचा,—नाहीं, चुकल्यें!—आईसाहेब, आपला!

बाबा०— ती लतिकेची अभ्यासाची खोली,— तीच इतउत्तर तुला बसायउठायला ठीक!—नाहीं?

वेणू—तीच—तीच खोली गडे मला फार आवडते! तीच मला नेहमीं बसायला उठायला हवी.

बाबा०—(स्वगत) हा बाण वर्मीच लागला पाहिजे! (उघड) तर मग तीच तुझी खोली ह्यापुढं हं? हें ठरलं नक्की! (लतिकेस) माझ्या लग्नाचं आतां नक्की ठरलं, हें तुला कळून चुकलंच ना?

लतिका—हो तर बाबा! तें मला केव्हांच कळून चुकलं. नि आवं-

दही किती झाला म्हणून सांगूं !

बाबा०—( स्वगत ) सोंग आणते आहे पोरटी ! ( उघड ) हें बघ, हें सोंग फुकट आहे तुझं !– काय ग, सावत्र आई घरांत येणार, आणि मग घरांत तुझी काडीचीही सत्ता नाहीं उरणार, ह्याचा आनंद झाला का तुला !

लतिका:—प्रथम थोडं वाईट वाटलंच मला, सावत्र आई येणार याचं ! पण ती दुसरी कुणी नसून वेणू येणार, हें पाहून भारी आनंद झाला मला ! किती झाला म्हणून सांगू ! वेणूसारखी माझी प्रेमळ मैत्रिणच आई झाल्या-वर मला काय कमी ? सगळे कोड पुरवील ती लेकीचे,–तुम्ही पुरविलेत तसे !—खरं किनई ग वेणू ?—नाहीं ! पुन्हा चुकल्ये !—आईसाहेब !

बाबा०—( सक्रोध ) कारटे ! ह्याचा अर्थ तरी काय ? तुला आतां घरांत कुणी कुत्रं दिखिल विचारणार नाहीं, हें कळत नाहीं तुला ?

लतिका:—कां नाहीं विचारणार ? माझी मी आहे तशी असल्यावर, तुम्ही आहांत तसे असल्यावर, नि माझी ही मैत्रिण आजवर आहे तशी पुढें राहिल्यावर–मला कां नाहीं कुणी विचारणार ?

बाबा०—तुला कांहींच कसं वाटत नाहीं कारटे !

लतिका—काय बाबा, आई मिळाल्याचं मला वाईट वाटत नाहीं, उलट आनंदच झाला, म्हणून रागावलां तुम्ही ?

बाबा—कां नये राग येऊं ?–तुला वाईट वाटायला नको ? तुझी अक्कल तरी कुठं गेली ? खरं म्हटलं, तर तुझं धाबं दणाणून जीव उडून जायला हवा होता ! तें राहिलंच; आणि उलट वर आनंद झाला तुला ? काय–काय–आतां म्हणावं तरी काय ह्या हट्टवादीपणाला ?

लतिका—बाई बाई ! माणसानं उतारवयांत लग्नाच्या भानगडींत पडलं, कीं स्वभाव असा हा रागीट बनतोसं दिसतं ! बाबा, किनई आपण आधींच, माझी खरी आई गेली तेव्हांच, ह्या लग्नाच्या भरीस पडलां असतां, तर बरं नसतं का झालं ?

बाबा—( वेडावून ) अस्सं, अस्सं ! पण असं खरंच वाटतं का तुला कैदासणी ?

लतिका—खरंच असं वाटतं बाबा !–पण असो. आतां तरी हा विचार केलात, हेंही कांहीं वाईट नाहीं झालं !

बाबा—हद्द झाली पोरटीची !—पण थांब. तुझ्याशीं तंडण्यांत हंशील नाहीं. तुझं हें हट्टवादी वारं उतरायला आतां अगदीं निर्वाणीची मात्रा देतों तुला !

( जाऊं लागतात, तों दामुअण्णा प्रवेश करतो. )

दामुअण्णा—-असं म्हणतों, तेवढा साखरपुडा उरकून घेतला असता आतांच्या आतां, हातासरशीं, आणि येत्या दशमीचा मुहूर्त करून टाकला असता निश्चित, म्हणजे पुढल्या तयारीला लागलों असतों निश्चिन्त !

बाबा०—साखरपुडा—

दामुअण्णा—-साखरपुडा आहेच काल आणलेला ! तेवढा एकदा द्यावा आपल्या हातांनीं, म्हणजे पोरीविषयीं घोर नाहीं उरला मला ! बाकी, आतां साखरपुडा म्हणजे व्हायलाच हवा आहे, अशांतला भाग नव्हे !

बाबा०—( स्वगत ) कसं करणार आतां ह्या लचांडाला ! गळ्चेपीलाच बसला हा दामुआण्णा ! ( उघड ) पण—-

दामुअण्णा—पण जनरूढि आहे ! टाकावी करून ती ! त्यांत काय वेंचलं आपलं ?

बाबा—पण असं बघा, मला जरा बरं नाहीं वाटत ह्या वेळीं ! तेव्हां, मग अंमळशानं पाहूं काय करायचं, काय नाहीं तें ( जातात. )

दामुअण्णा—( वेणूस ) चल बाळ ! आतां ही लग्नाची गर्दी. वेळ नाहीं गमावतां येत आतां असा ! ( वेणूसह जातो. )

लतिका—बाई, खासा—खासा सासरा हा ! बाबांना ह्यानं खरंखुरं बाशिंग नाहीं बांधलं; म्हणजे मिळवलं ! हो–हुंड्याकरितां छदामही द्यायचा नाहीं, म्हणून मुळीं मुलगाच मिळत नाहीं, असं ढोंग करून वेणूला वाढविणारा हा कद्रु दामुअण्णा, आतां बाबासारखा बिनहुंड्याचा मुलगा असा मुठींत सांपडल्यावर त्यांना सुका सोडीलचसा काय नियम ?—-पण बाबा आतां अगदीं वैतागून गेले आहेत मजवर, नाहीं ? नि वर ह्या मोठ्या

बिडर्तीत दामुअण्णाच्या अडकित्यांत सांपडले आहेत ते आतां ! बाई बाई, आतां ती निर्वाणीची मात्रा काय येते देव जाणे !

छबी—किनई तेवढं त्या आपल्या स्वारीचं ठावठिकाण कळेल आतां ह्या दासीला, तर जाऊन सांगेन बापडी धनीसाहेबांना, कीं त्या पंचाक्षऱ्यालाच घेऊन या, ताईसाहेबांचं हट्टवादाचं वारं घालवायला !

( चाकर प्रवेश करतो. )

चाकर—श्रीकंठ देशपांडे नांवाचे गृहस्थ धनीसाहेबांना भेटायला आले आहेत !

लतिका—( चपापून ) कोण म्हणालास ?

चाकर—श्रीकंठ देशपांडे म्हणुन नांव सांगितलं त्यांनीं ! ते म्हणतात, ताईसाहेब भेटल्या तरी चालेल ! तेव्हां काय कळवूं त्यांना !

लतिका—कसं बरं करावं ?—हो !— जा त्यांना कळीव मी आल्येच म्हणुन !—नि बसव त्यांना नीट दिवाणखान्यांत !

चाकर—जी होय. ( जातो. )

छबी—देवच पावला ताईसाहेब ! चला-चला तर आतां ! ( जातात. )

## प्रवेश तिसरा

[ स्थळ—बाबासाहेबांच्या बंगल्यांतील दिवाणखाना, श्रीकंठ एका कोचावर बसला आहे, असा प्रवेश ]

श्रीकंठ—( स्वगत ) अद्याप येत नाहींतशा ह्या लतिकाबाई ? गोपिनाथच्या आणि भय्यासाहेबांच्या भांडणामुळें किती उत्सुक झालों आहे मी, ह्या बाई खरोखर कशा आहेत तें पाहायला ! गोपिनाथ म्हणतो त्याप्रमाणें हें प्रकरण जर का खऱ्याखुऱ्या त्राटिकेचाच अवतार असेल, तर? मात्र जरा तयारीनंच असावं आधीं ! ( समोर पाहून ) आलींच ती दोघींही बापलेक ! पण वडील संतापलेले दिसतात लेकीवर !— कसं बरं करावं ?—हो असंच ! त्या कपाटापलीकडे खुर्ची दिसते, तिथं बसावं !—म्हणजे कळेल हा काय प्रकार आहे तें ! ( जातो. )

[ बाबासाहेब व लतिका प्रवेश करितात ].

बाबा०— शेला घेऊन, हा नट्टापट्टा करून कुठं निघाली होतीस ?—बाहेर नाहीं का ?—फिरायला ह्या भलत्या वेळीं ? सगळं ढोंग ओळखतों मी तुझं !—कुठंच जायचं नाहीं इतःपर, फिरायला नि सवरायला ! ह्या एका दिवाणखान्याबाहेर पाऊल टाकायचं नाहीं कम तें ! कोणत्याही हिंदु बापानं कधीं कोणत्याही हिंदू लेकीला दिली नसेल इतकी स्वतंत्रता आजवर मीं तुला दिली ! तुझ्या ठिकाणीं मुलगा असता, तर त्याला जितक्या स्वैरपणानं वागूं दिलं नसतं, जितक्या स्वैरपणें तुला वागूं दिली ! पण तूं काय !—बहकलीस आणि आमच्या डोकीवर मिरी वाटूं लागून आमच्या चुकीबद्दल आम्हांला थोबाडांत मारून घ्यायला लावलंस ! आतां ह्यापुढें, खरा हिंदु बाप कसा असतो तें बघ ! ह्या इथंच आतां तुझं फिरणं-सवरणं, सभा नाटकं, आणि शाळा--चिळाही ! ह्या चार भिंतींच्या आंत इतःपर तुझं सगळं जग, समजलीस ? पोरटे, तुला कांहींच कशी वाटत नाहीं लाज ?—आणि वर हंसतेस ? ही सगळी थट्टाच समजतेस काय ?- बघच तर मग, ही थट्टा कीं काय तें !

[ जातात व बाहेरून दाराची कडी लावतात. ]

श्रीकंठ— ( स्वगत ) हें असं कां बरं व्हावं ? हिला पाहातांच दृष्टि अशी हिजवरच खिळून कां राहावी ? प्रवासांत असतां प्रत्यक्ष देवांगनांना लाजविणाऱ्या लावण्यलतिका पाहूनही जें झालं नाहीं तें हिला पहातांच व्हावं; जागे आहों कीं स्वप्नांत आहों, असं होऊन जावं, ह्याचा अर्थ काय ? आपण आजवर नकळत जें शोधीत होतों, तें हेंच, असा तर नाहीं ना ह्याचा अर्थ ! ( उठून पुढें येतो. )

लतिका—( स्वगत ) बाई आतां कसं करूं ! तीच मूर्ति ही ! .हं-असंच ! ( शेल्यानें तोंड झांकते. )

श्रीकंठ—बुरखा प्रचारांत येणार वाटतं, आपल्या पांढरपेशांत ?

लतिका—प्रचारांत कसला ? अशा अडीअडचणीच्या प्रसंगीं त्याचा उपयोग नाहीं का ?

श्रीकंठ—ह्यावेळीं अडचण ती कोणती बुवा !

लतिका—हिंदु मुलीच्या जन्माला जावें, तेव्हां कळते ती ! संभाषणाला तर नाहीं ना अडचण होत त्याची ?

श्रीकंठ—नसली तरी भिंतीच्या भेगेंतून प्रणयकथा कुजबुजणाऱ्या नाटकांतल्या नायक-नायिकेसारखंच हें नाहीं का हास्यास्पद ? पण असो ! तुमची इच्छाच नसली शेला दूर करायची तर आमचाही आग्रह नाहीं !-- हें पहा, आपलं तोंड कितीही झांकून ठेवलंत, तरी मला तें स्पष्ट दिसत आहे !

लतिका-तें कसं ?

श्रीकंठ--दृश्यावरून अदृश्याची नाही का—कल्पना होत ? तुमचं मुख चित्रहि काढतों मी पाहिजे तर !-शब्द चित्रहो !

लतिका—ठीक ! काढावं बरं !

श्रीकंठ—नेत्र घुमट, केश पिंगट !

लतिका—इश्श !

श्रीकंठ- निटिल संकुचित, नासिका विशाल !

लतिका--इश्श ! पुरे आपलं चित्र ! ( तोंडावरील शेला दूर करून ) नि बघावं तें मुळाशीं जुळतं का ?

श्रीकंठ—वा ! तें कसं जुळेल ? जुळण्याकरितां कुणीं काढलं आहे तें ? ज्या हेतूनं काढलं, तो साधला ! बस्स, त्याचं काम झालं ! आतां खरं चित्र काढूं का ?

लतिका--नको गडे तेवढं !

श्रीकंठ--पण मी वेडा तर नव्हे ? ह्या अवर्णनीय सौन्दर्याचं वर्णन करूं पाहाणें, हा वेडेपणा नव्हे का ? शुद्धाष्टमीच्या चंद्रबिंबाप्रमाणं प्रत्यक्ष मोहिनीचं निवासस्थान असा, हा निटिल प्रदेश, सायंतारकाप्रमाणं दीप्तिमान नेत्र, मुग्ध असे गुलाब कलिकेप्रमाणें आरक्त असे हे ओष्ठ, भृंगततीसारखा कृष्ण-मनोहर असा हा केशकलाप—कोण कोण ह्याचं यथोचित वर्णन करूं शकेल ?

लतिका—खासं चित्र रेखाटलं हें ! पण बाई माझंच का ? कीं एखाद्या नाटकातल्या नायिकेचं जसंच्या तसं उतरून काढलं हें ?

श्रीकंठ—कुणीं सांगावं ?—एखाद्या नाटकांतल्या नायिकेलाही हें लागूं पडेल कदाचित ! पण इतकं मात्र खरं कीं विधात्यास तुला निर्माण केली त्या वेळीं माझ्या हृत्पटलावर जें तुझ्या रूपाचं अव्यक्त चित्र त्यानं रेखाटून ठेवलं होतं, तेंच तूं दृष्टीस पडतांच हें असं व्यक्त झालं आहे !

लतिका—बाई खरंच का हें ! आपल्या हृदयांतच का मी होत्यें आजवर !

श्रीकंठ—खरोखर ! आजपर्यंत ह्या हृदयांत तूं मला नकळत अमूर्तपणें वास करीत होतीस !—ह्यापुढें आमरण तिथं तूं मूर्त रूपानं वास करीत राहशील !

लतिका—( स्वगत ) केवढी मी भाग्यवान कीं माझं इप्सित मलाच शोधीत आलं इथं !

बाबा०—( बाहेरून कडी काढीत ) अहो, शक्यच नाहीं तें ! तुमचे श्रीकंठ इथं असतील कसे ?

लतिका—अगबाई !

( बाबासाहेब, गोपिनाथ व भय्यासाहेब प्रवेश करितात. )

गोपिनाथ—ते पाहा, ते श्रीकंठ !

भय्या०—बहुत खाशी ! श्रीकंठ !

बाबा०—चमत्कार आहे !—तुम्ही कसे हो इथें ? सिव्हिल सर्व्हिसच्या पदवीला चढलेले श्रीकंठ मला नकळत ह्या दिवाणखान्यांत कसे आले ?

श्रीकंठ—आपणांला भेटायला आलों होतों मी आपल्या नोकरानं मला इथं आणून बसवलं ! तो आपण आणि ही आपली कन्या इथं येऊन, हिला इथं कोंडून ठेऊन आपण गेलांत निघून !

लतिका—होय बाबा ! मी आपल्याला सांगत होत्यें, तों आपणच रागावून जाऊन मला इथं ठेवून दिलीत !

भय्या०—वा जी !—मग कळून आलंच असेल श्रीकंठ तुम्हांला लतिका-बाईंचं किरकिऱ्यावरच प्रेम !

गोपिनाथ—आणि ह्यांचं त्राटिकेचं वारंही येऊन गेलंच असेल आपल्या-समोर, श्रीकंठ !

बाबा--अहो, कसचं किरकिरं आणि कसचं त्राटिकेचं वारं !

श्रीकंठ--नका बाबासाहेब !-नका भलतेच शब्द लावूं तिला ! तिच्या-सारखी विनयवती मुलगी तीच !

बाबा०--काय ग, हे श्रीकंठ म्हणतात, तशीच तूं आहेस काय ?

लतिका--( खालीं पाहून ) त्याच्या दर्शनानं ते म्हणतात तशीच झाल्यें आहे मी इतःपर !

बाबा०--( वेडावून ) होय बाबा ! अग, तुझा तो गेला कुठं हट्टयोग !

लतिका--त्याचं कार्य सरलं, नि म्हणून समाप्ति झाली त्या हट्टयोगाची !

बाबा०--अहाहा ! माझ्या आनंदाला आज खरीखुरी सीमाच नाहीं उरली ! श्रीकंठ, करतांना माझ्या लतिकेचा स्वीकार ?

श्रीकंठ--वडिलांची आज्ञा मी अमान्य कशी करीन ?

बाबा--काय ! मी जागाच आहे ?-कीं स्वप्नांत आहे ?

लतिका--आपण पुरे जागे आहांत बाबा ! मी मात्र आपल्या भावी सुखाचं गोड स्वप्न अनुभवत्यें आहे ह्या वेळीं !

गोपिनाथ--म्हणजे आतां स्पष्टच झालं, लतिकाताईनीं तो त्राटिकावतार कां आणला होता तें !

भय्या०--बहुत खाशी ! आणि किरकिऱ्याची आवड कां पांघरली होती त्यांनीं, तेंही उघड झाल आतां ! श्रीकंट आणि लतिकाबाई, अगदीं रागरागिणीचा जोडा शोभतो तुमचा !-वा जी ! मी विसरूनच गेलों होतों बाबासाहेब,-इंदूरचा तो अस्मानखां गवय्या यायचा आहे आमच्या भेटीला आतां ! तेव्हां घेतोंच रजा मंडळी सर्वांची !-बहुत खाशी! ( जातो. )

बाबा०--( समोर पाहून ) अरे बापरे ! हा दामुअण्णा आलाच माझे प्राण काढायला !-करूं तरी कसं आतां ? पोरी, श्रीकंठ, अरे सोडवा आतां मला ह्या वेताळाच्या किचाटींतून ! पोरी, तुझे डोळे गेलों उघडायला; पण माझेच पांढरे व्हायची वेळ आली आहे आतां खास !

( डोकींत पागोटें घातलेला व हातीं साखरपुडा घेतलेला दामुअण्णा वेणूसह प्रवेश करतो. )

दामुअण्णा—मग कसं बाबासाहेब? ध्यायचा ना आतांच्या आतां साखरपुडा उरकून? वाटेल तर माझ्या घरापर्यंत सुद्धां नको यायला! ह्या इथल्या इथं, हा पुडा पोरीच्या हातीं लावलांत एकदांचा, कीं झालों मी निश्चिन्त आणि लागलोंच पुढल्या तयारीला!

(पोऱ्या पगडी आणून बाबासाहेबांस देतो.)

बाबा०—(पगडी घालून) पण हें पहा दामुअण्णा—?

दामुअण्णा—पण तेंही खरंच! साखरपुडा यथाविधि व्हायचा, म्हणजे तो वधुगृहींच व्हायला हवा! तेव्हां, चलाव घरापर्यंत माझ्या, आणि टाकावा तो उरकून!

श्रीकंठ—(पुढें होऊन) तें असं करूं अण्णाकाका—

दामूअण्णा—(साश्चर्य) अरे! श्रीकंठा, तूं?—पण तूं काय आतां बडा लाटसाहेब झाला आहेस, म्हणतात!—कळलं आम्हांला तें सारं! पण तें असो सध्यां। मग सावकाशीनं बोलूं आपण त्या गोष्टी! मी आहे आतां वेणूच्या लग्नाच्या धांदलींत! तेव्हां—

श्रीकंठ—पण त्यांचंच असं करूं म्हणतों मी—

दामूअण्णा—कसं म्हणतोस?

बाबा०—सोडव दामूअण्णा मला आतां ह्या लग्नाच्या प्रसंगांतून!

श्रीकंठ—बाबासाहेबांच राहिलं नाहीं आतां वय लग्नाचं! तेव्हां वेणूला अनुरूप असा दुसरा वर पाहिला, तर बरं नव्हे?

दामुअण्णा—अरे, पण हुंडा पडेल त्याला! आणि शिवाय, बाबासाहेबांच्या शब्दाची किंमत ती काय राहिली मग?

बाबा०—हुंडा मी देतों माझ्या शब्दाची किंमत म्हणून!

श्रीकंठ—नको हुंडा बाबासाहेब! गोपिनाथाला कांहीं कमी नाहीं दिलं देवानं मग करायचं गोपिनाथ? तुला अगदीं हवी होती तशी,—सर्व दृष्टीनें योग्य वधू आहे माझी ही चुलत बहीण वेणू! आणि तिला इंग्रजी विद्येची कशी ती शिवतही नाहीं झालेली अजून!—ही गोष्ट तुला पाहिजे होती तशी विशेष आहे तिच्यांत! तेव्हां टाकायचना ठरवून!

गोपिनाथ—आपल्याबरोबर आपल्या मित्रांनाही चतुर्भुज , करायचा बेत दिसतो तुझा ! ठीक–ठीक !–तुझा शब्द मी कसा मोडूं ? कारण मी पडलों धंद्याचा माणूस !

दामुअण्णा—झालों मी मुक्त आतां पोरीच्या जन्मजन्मांतरीच्या ऋणांतून !

बाबा०—(स्वगत) आणि माझाही पुनर्जन्म झाला हा आतां इतक्यांत !

(दामूअण्णा साखरपुडा गोपिनाथाकडून वेणूस देवावितो.)

दामुअण्णा—आतां हा येत्या दशमीचाच मुहूर्त साधायचा बरं बाबासाहेब ! लांबणीवर नाहीं जातां कामा लग्नविधि.

बाबा०—लाभेल त्या तिथीला दोन्हीं जोडप्यांचं शुभमंगल एका लग्न-मंडपांत करायचं हो दामुअण्णा !—असो !—पोरी लतिके, तूं आमच्या राजकारणांतल्या आडवणुकीच्या मार्गानं आपलं ध्येय गांठलंस !—म्हणजे, स्वतःच्या प्रयत्नानं, आपल्या जुन्या स्वयंवरपद्धतीनं पतिलाभ करून घेतलास !—ह्याचा मला आनंदच होतो !—ह्याचप्रमाणें नेहमीं प्रयत्नाचा परमेश्वर करा !—म्हणजे तो दुष्प्राप्य जगत्पति सर्वांचं सदैव मंगलच घडवील !—

इतर सर्व—तथास्तु ?

(शेवटचा पडदा पडतो.)

———

## [ ६ ]

# धरून बांधून !

## अंक पहिला

### प्रवेश पहिला

[ स्थळ, शौनकेश्वराची ओसरी. शौनकेश्वर सचिंत बसलेला आहे, असा प्रवेश. ]

शौनकेश्वर--( स्वगत ) वल्लरीचें लग्न कसें होणार ! ए बी सी डी नें चढलेलीं मुलें तर राहोतच; पण अग्निमीळें करूं लागलेलीं लंगोटी पोरटींही हुंड्याची बात बोलूं लागलीं आहेत !–हुंडा ! हुंडा ! हुंडा !—हा एकच शब्दनाद मेघडंबरींत दुमदुमतो आहे ! लग्नाच्या मोसमांत हा एकच शब्द आज सर्वत्र ऐकूं येतो आहे ! ह्या एका शब्दावांचून लग्नाची बातच नाहीं ऐकूं येत ! लग्नाच्या गर्दीत हुंडा हा नायकच म्हणाना ! पूर्वी लग्नगर्दीत वरमाता ही नायिका असे; आज त्या वरमाईचें स्थान हुंड्यानें पटकाविलें आहे ! सर्व मान हुंड्याच्या हातीं !—हुंडाच आज लग्न ठरवितो, नाहीं का ? हुंडा ठरवील त्याची व तिची आज धरून बांधून मोट बांधली जाणार !–पण ह्या शौनकेश्वराजवळ हुंडा द्यायलाच पैसा नाहीं, तर माझ्या वल्लरीच्या लग्नाची मोट तरी आज कोण बांधणार ? ‘ वल्लरीचें लगिन ’ ‘ वल्लरीचें लगिन ’–करीत घरांतलीनें प्राण टाकला !–त्यावर हीं चार वर्षे गेलीं ! आतां तर पोरीला रजोदर्शनही झालेलें ! ब्राह्मणाच्या घरांत ऋतुमति मुलगी अविवाहित राहाणें, म्हणजे केवढें पाप !–ह्यामुळें हा ब्रह्मवृंद आता मजवर ग्रामण्य करून बहिष्कार घालणार आज उद्यां !–देवाधिदेवा, आतां तूंच सोडव ह्या प्रसंगांतून मला !

( कल्याणपंत, धराधर, बांधव व डोकीवर सामानाचे बोजे घेतलेले चाकर प्रवेश करतात. )

**कल्याणपंत**—( मोठ्यानें ) शास्त्रीबुवा ! अहो शास्त्रीबुवा !

**शौनकेश्वर**—( उठून पुढें होऊन ) कोण, कारभारी साहेब !–यावें–यावें

वर ! ह्या अवघ्या संस्थानचे आपण कारभारी ! आपल्या पदरजानें ह्या गरीबाचें घर पुनीत होऊं द्या !

कल्याणपंत—( ओसरीवर चढत ) तुमचें घर पुनीत करण्याकरितां तर आलों आहें मीं ! पण माझ्या पदरजानें नव्हे, तर आईसरकारच्या कृपा-कटाक्षानें !

शौनकेश्वर—म्हणजे !–बसावें खालीं आधीं !

कल्याणपंत—( बसून ) शास्त्रीबोवा, आईसरकार तुम्हांवर फार कृपाळ झाल्या आहेत !

शौनकेश्वर—आईसरकारच्या कृपेवर तर आजवर जीवनधारणा झाली शौनकेश्वराची ! त्या आणखी कृपाळु काय व्हावयाच्या ?

कल्याणपंत—तुमची मुलगी ऋतुमति होऊनही अविवाहित आहे, त्या-मुळें तुम्हांवर ग्रामण्य होणार असल्याचें कळलें हें आतां आईसरकारना ! म्हणून, सामानसुमान माझ्याबरोबर देऊन, आजच्या गोरज मुहूर्तावर तिचें मंगल करून टाकण्याविषयीं तुम्हांला सांगितलें आहे त्यांनीं ! तर, धराधर आणि बांधव. तुम्हीं दोघे आधीं जाऊन, मुलीला योग्य असा मुलगा घेऊन या आत्तांच्या आत्तां ! ( धराधर व बांधव जातात. ) शौनकेश्वर, पडेल तो हुंडा देऊन तुमच्या मुलीचें जन्मसाफल्य करण्याचें योजलें आहे आई-सरकारनीं !–आणि हें कशाकरितां ? तर तुमच्यासारख्या सत्त्वस्थ शास्त्र्यावर ग्रामंण्य होऊं नये म्हणून !–( चाकराना ) ठेवारे सामानसुमान खालीं –! आणि शास्त्रीबोवा, मुलीला आणा इकडे ! ( नोकर जातात. )

शौनकेश्वर—बाळ वल्लरी, इकडे ये !

[ वल्लरी प्रवेश करते ]

कल्याणपंत—ये पुढें अशी ! आणि ही अष्टपुत्रिनि चोळी घालून, आणि हे दागदागिने चढवून, हो सिद्ध लग्नाला. वेळ भरत आली. आटोप लौकर ! हें गांठोडें आंत घेऊन जा—आणि शास्त्रीबोवा, आप-णही हा पितांबर आणि ही शालजोडी लेवून सिद्ध व्हा कन्यादानाला, उठा! जा आंत ! आणि व्हा दोघेंही सज्ज !

शौनकेश्वर—( स्वगत ) जगच्चालका ! ऐकलेंस माझें गाऱ्हाणें बाबा !

( शौनकेश्वर व वल्लरी आंत जातात. )

कल्याणपंत—आतां एक नवरदेवाचीच उणीव !– म्हणजे मोठीच उणीव !

( धराधर व बांधव पुरुषवेषधारी सुंदरीस धरून आणतात. )

सुंदर—हें काय !–सोडा–जाऊ द्या मला ! ( स्वगत ) मला पकडण्याकरितां मुंबईहून बाबांनीं तर नाहीं ना पाठविलें ह्यांना ?

कल्याणपंत—आणा ! आणा त्याला इकडे !

सुंदर—कां आणविलं मला धरून ? मी काय अपराध केला आहे तुमचा ?

कल्याणपंत—अपराध ?–अरे, अद्याप तर कोणताही नाहीं केलास ! पण आतां मात्र समजुतीनें घेतलें नाहींस, तर महदपराध केलासें होईल, बरें !

सुंदर—म्हणजे ?

कल्याणपंत:—पोशाख नवरदेवाला साजेसा आहे तुझा ! हा जरीचा रुमाल, रेशमी अंगरखा, सगळें ठीक आहे असावें तसें ! पण काय रे, तूं एखाद्या नाटकमंडळींतल्या नायिकेची भूमिका घेणारा दिसतोस ! होय ना ? एरव्हीं हे लांबसडक केंस कां वाढविले असतेस तूं ? बरें तें असो ! कांहीं हरकत नाहीं त्याला ! ह्या वेळीं मात्र नायकाचें काम करायचें आहे हो तुला ? तेव्हां एवढा मोत्याचा तुरा खोव रुमालांत ! आणि हा कंठी—पवची चढव गळ्यांत—हातांत ! म्हणजे सजलास नवरदेव ! हं ! आटोप ! गोरज मुहूर्त साधला पाहिजे हा आतांचा !

सुंदर—नवरदेव ! ( स्वगत ) बाई मला हे नवरदेव बनविणार वाटतं ? बाबांनीं मला ह्या आतांच्याच मुहूर्तावर मुकुंदराव चाळीवाल्याला सवतीवर द्यायचं योजलं होतं ! म्हणून पुरुषवेष घेऊन ज्यांच्यावर माझं प्रेम त्या ह्या श्रीमंत हरिहररावांच्या आसऱ्याला आल्यें मी ! तों ह्यांनीं काय आणलं मजवर हा प्रसंग ! आई ग आई ! ( डोळे भरून येतात. )

कल्याणपंत—अहारे रडतराव! अरे, तूं बाप्या ना?—मग रडतोस काय पोरीसारखा? घाल ही कंठी गळ्यांत, नि पवची हातांत! आणि खोंव हा तुरा रुमालांत!—बांधवा, ठोक धूम, नि भटाला घेऊन ये आधीं! आतां अंतर्पट धरून अक्षता टाकायचा आवकाश!—आणि धराधर, तुम्हीं चार शिष्ट भिक्षुकांना लग्नाचें आमंत्रण देऊन घेऊन या त्यांना लागलेच बरोबर!—निघा!

[ बांधव व धराधर जातात. ]

सुंदर—पण अर्थ काय ह्या सगळ्याचा?

कल्याणपंत—भोळेराव रडवे, अजून अर्थ नाहीं कळला तुला!—अरे, तुला चांगली बायको करून देतों, बायको!—कळलं आतां?

सुंदर—जाणाऱ्या येणाऱ्यांना धरून बांधून बायका करून देण्याची चाल आहे वाटतं इथं?

कल्याणपंत—वेडारे वेडा!—अरे अडीअडचणीच्या प्रसंगीं करावं लागतं असं!

सुंदर—पण मी नाहीं कबूल ह्या गोष्टीला!

कल्याणपंत—नाहीं कबूल?—तुझं लग्न झालं आहे वाटतं? पण एक लग्न झालं असलं, म्हणून काय दुसरं करूं नये?—अरे, आपले प्रतापशाली पूर्वज दोनच नाहीं, तर दोन दोनशें बायका करीत असत! ठाऊक आहे ना तुला?—आणि तुम्हीं त्याचे वंशज, दोन बायका करायलाही भितां?—धिःकार असो ह्या भ्याडपणाला!

सुंदर—नाहीं! प्राण गेला तरी नाहीं कबूल होणार मी!

कल्याणपंत—असें काय करावें बेटा! माझें ऐक!—कल्याण आहे तुझें त्यांत! एक तर ही मुलगी उपवर-ऋतुस्नात झालेली आहे! दुसरें, हिच्याबरोबर तुला हुंडाही रगड मिळेल! ऋतुस्नांत वधू आणि मनमुराद हुंडा—आणखी काय पाहिजे तुला? अरे, शिवाय श्रीमंत हरिहररावही तिला वरतील, इतकी सुंदर आहे ती, समजलास?

सुंदर—काय? मीं तिला वरिली नाहीं, तर संस्थानाधिपति हरिहरराव वरतील तिला!—इतकी सुंदर आहे ती?

कल्याणपंत—अरे वा, त्यास वरतील ते तिला, तूं कबूल नाहीं झालास तिला वरायला तर !

सुंदर—तर मग कबूल आहे मी ! चला कुठं आहे ती ? आटपा ! टाका अक्षता ! नि म्हणा शिवमंगल सावधन !

कल्याणपंत—शाबास ! शेवटी समजुतीवर आलास !–पण धीरानें घ्या थोडे नवरदेव !–उतावळे होऊं नका ! चला आंत, आणि बघा आपली बायको कशी नक्षत्रासारखी आहे ती ! ( जातात. )

---

## प्रवेश दुसरा

स्थळ—राजरस्ता अंगण.

[ हरिहर प्रवेश करतो ]

हरिहर—( स्वगत ) अ ?–इथें आईसरकारची गोपाची गाडी ? आई-सरकार इथें ह्या घरीं आलेल्या दिसतात ! ( घरांतून ' शिवमंगल सावधान ' ऐकू येतें. ) शिवमंगल सावधान ?–इथें लग्नसोहाळा दिसतो आहे कोणाचा तरी !–हाय हाय ! आज ह्याच वेळीं तिकडे मुंबईस सुंदरचा लग्नसोहाळा चालला असेल !–चाळीवाल्याचे भाड्याने चार हजार रुपये देणें होतें; त्याची फेड करण्याकरितां तिच्या बापानें तिला दोन सवतींवर त्या चाळी-वाल्याला देऊन बिचारीच्या जन्माचें मातेरें केलें !–सुंदर ! आतां तूं दुस-ऱ्याची झालीस ! आतां तुझें स्मरण करणें म्हणजेही पातक !–पण तूं माझ्या दृष्टीपुढून हलतच नाहींस, त्याला मी काय करूं ? कॉलेजांतल्या वर्गांत, ह्या उन्हाळ्याच्या सुट्टीपूर्वी जशी तूं दिसत होतीस, तशीच ह्या सुट्टींत रोज दिसते आहेस ! तरी पण तुझ्या लग्नाची ही मोट बांधल्याचं काल एका सहाध्यायाकडून कळलं, तेव्हांपासून तर तूं सारखी मजसमोर दिसते आहेस ! बळेंच मन घट्ट धरून, डोळे मिटून तुला दूर सारूं ?– अंधःकार ! घोर अंधःकार !–आणि त्यांत मी खोल–खोल–खोल जातों आहें, असें होऊन जातें !–

अगण्य नयनें निशेस तीं !
एक नयन दिवसास !

एकचि, परि मिटितां लोटी
निबिड तमीं जगतास !
अगण्य नयनें मनास तीं !
एक नयन हृदयास !
एकचि, परि मिटितां लोटी
निबिड तमीं जीवास !–

ह्या उक्तीचा अनुभव पूर्ण येतो आहे मला !

[ आईसरकार व कल्याणपंत प्रवेश करतात. ]

कल्याणपंत—श्रीमंत !– श्रीमंतांची स्वारीही आली इकडे !

आईसरकार—वा ! बाळ, बरा आलास लग्नाला ! शास्त्रीबोवांच्या वल्लरीचं लग्न झालं हें आतां ! जोडा चांगला जमला हा वल्लरीचा आणि !– नांव काय नवऱ्या मुलाचं, कल्याणपंत ?

कल्याणपंत—नांव !–नांव काय बरें त्याचें ?–खरेंच ! नांव काय तें विसरलों मी !

आईसरकार—बरं पण गोत्र, प्रवर, शाखा वगैरे पाहिलं आहेत ना नीट ?

कल्याणपंत—हो हो ! तें कसें विसरेन मी ?–( स्वगत ) ह्या अवल्या लग्नाच्या गर्दींत ह्या गोष्टींचें कोणाला स्मरण राहाणार ?

[ शौनकेश्वर, वल्लरी व सुंदर प्रवेश करतात. ]

शौनकेश्वर—कोटी जन्मांची पुण्याई फळाला आली आज, आईसरकारांनीं आणि श्रीमंतांनीं इथें येऊन कन्यादान केल्यानें ! कर मुली, नमस्कार आईसरकारांना आणि श्रीमंतांना ! मी तुला जन्म दिला, पण श्रीमंतद्वयांनीं तुझें जन्मसाफल्य केलें आहे आज !–जांवई, करा नमस्कार श्रीमंतद्वयांना !

[ दोघी नमस्कार करतात. ]

हरिहर—नांव काय जांवयाचें ?

शौनकेश्वर—नांव घे मुली पति–देवाचं !

आईसरकार—सांग मुली, नांव आपल्या नवऱ्याचं !

वल्लरी—धुंडाळले गिरिकंदर, तेव्हां लाभले राव सुंदर !

आईसरकार—सुंदर ! सुंदर नांव घेतलं मुलीनं !

हरिहर—सुंदर ! काय ? नांव सुंदर ? ( सुंदरकडे निरखून पाहात ) कुठें तरी पाहिलेला वाटतो हा तोंडवळा !

सुंदर—( स्वगत ) देवा ! यांनीं मला ओळखलीच खास !

हरिहर—( आश्चर्य ) सुंदर ! खास सुदर !

आईसरकार—वा ! ओळख दिसते शास्त्रीबोवा तुमच्या जांवयाची नि आमच्या बाळासाहेबांची ! बरं, चलावं आतां, बाळ ! वल्लरी-सुंदरराव सुखानं नांदा आणि शतायु व्हा ! ( जातात. सुंदरकडे टवकारून पाहात हरिहर जातो. अंकाचा पडदा पडतो. )

---

## अंक दुसरा.

### प्रवेश पहिला

[ स्थळ—माजघर; सुंदर पाटावर बसलेली असून,
जवळच वल्लरी उभी आहे, असा प्रवेश. ]

वल्लरी—( स्वगत ) बाई ! हा लग्नसोहाळा ना ? माझ्या स्वतःच्या लग्नाचा सोहाळा ना ?–पण उल्हास कसा तो काडीभरही वाटत नाहीं मला ह्यांत ! लहानपणीं शेजारच्या गंगू, यमू नि मोरभटजींचा वामन, अशीं आम्हीं सगळीं बाहुलाबाहुलींचीं लग्नं लावीत असूं, त्यांत जी मजा, जो आनंद वाटत असे, त्याचा लक्षांश तरी आजच्या लग्नांत मला वाटतो आहे का ?–त्या लटुपटुच्या लग्नांत जें सुख वाटे, त्याचा अंश तरी ह्या खऱ्या लग्नांत वाटतो आहे का ?—इकडे स्वारी पाहावी, तर तीही खिन्न-कष्टी दिसते आहे.

सुंदर—( स्वगत ) मी कोण आहे, हें हिला सांगावं, नि मग घ्यावा हिचा निरोप !–हिच्याशीं मीं आपलं मन मोकळं केलं, नि माझ्या दुर्दैवाची कहाणी हिला सांगितली, तर ही मला सहाय्यही करणार नाहीं म्हणून कशावरून ? पण–पण बापडीला मीं आपली गुप्त गोष्ट सांगितली, तर तिच्यावर

आकाशच कोसळेल नाहीं का?–छे–हिला सांगूच नये कांहीं—रागावल्याचा आव आणून, भांडण उकरून काढावं हिच्याशीं नि मग आकांडतांडव करून जावं निघून झालं!—असंच! असं करण्यावांचून गत्यंतर नाहीं! ( उघड ) तूं चालती कां नाहीं होत एकदाची इथून?

वल्लरी—अगबाई!–म्हणजे?

सुंदर—नीघ इथून माझ्या पुढून!

वल्लरी—आई ग आई!–का तें?

सुंदर—रागावलों आहें मी तुझ्यावर!–दिसत नाहीं तुला हे?

वल्लरी—पण कां तें? काय केलं मीं असं?

सुंदर—काय केलं?—श्रीमंताकडे पाहात नव्हतीस तूं मघाशीं?—बोल!–नव्हतीस पाहात?

वल्लरी—होय! मग त्यांत काय बिघडलं!

सुंदर—त्यांत काय बिघडलं?–परपुरुषाकडे पाहून सवरून, पुनः त्यांत काय बिघडलं, म्हणून विचारतेस?

वल्लरी—चुकी झाली मजकडून! पुनः नाहीं पाहणार कुणाकडेही!–मग तर झालं?

सुंदर—( स्वगत ) काय करणार! भांडतच नाहीं ही! ( उघड ) बघ, मी आपला राग आवरतों आहें!–पण आवरतच नाहीं तो! मला तो अगदीं वेडा करणार. मी आतां काय करीन आणि काय नाहीं याचा नेम नाहीं! तेव्हां बऱ्या बोलानं तूं आतां माझ्यासमोरून निघून जा! हो!–हो चालती!--कर तोंड काळं!

वल्लरी—आई ग आई! बाबा!

[ हरिहर प्रवेश करतो. ]

सुंदर—( स्वगत ) अगबाई! त्यांचीच स्वारी!

हरिहर—( स्वगत ) खास!--सुंदरच ही!--पण शंका घ्यावीच फेडून! ( उघड ) वल्लरी, घाबरलेली कां दिसतेस! पतिदेव रागावले आहेत कीं, काय तुझे!—रागावूं दे!--मी घालवतों राग त्यांचा!--जरा थोडी आंत जा कशी!--म्हणजे गेलाच राग त्यांचा!

सुंदर—आा तूं आत !--गेला माझा राग !

( वल्लरी जाते. )

हरिहर—सुंदर ! ( सुंदर उठून उभी राहाते. ) माझी कॉलेजांतली सहाध्यायिनी सुंदर, तीच का तूं !

सुंदर—तीच अभागिनी ही ! ( मूर्छित पडूं पाहाते. )

हरिहर—( तिला सावरून ) हाय हाय ! माझ्याकरितां तूं हे किती कष्ट सोसलेस !

सुंदर—इथून चलावं कसं आपल्या घरीं आधीं !—सगळं सांगत्यें मीं काय झालं तें !

हरिहर—सगळं कळलं आहे मला कालच ! तेंव्हांपासून रात्रीच्या काळोख्यांतही तुझी चंद्रप्रभा दिसते आहे माझ्या दृगीपुढें उभी ! दिवसाच्या प्रकाशांतही तुझीच प्रभा दिसते आहे त्रिभुवनात मला सर्वत्र !—आईसरकारांना सांगूं हें आतां सगळं !--म्हणजे घडतील गोष्टी सगळ्या आपल्या मनासारख्या ! ( जातात. )

## प्रवेश दुसरा

[ स्थळ—ओसरी. शौनकेश्वर व वल्लरी प्रवेश करतात. ]

शौनकेश्वर—रुसूं दे रुसले तर अग तो त्याचा अधिकारच आहे ! जांवयांनीं रुसायचें, आणि आंगठी, घड्याळ, सायकल,-.कांहीं तरी घ्यायचें, हा मानच आहे जांवयांचा !

वल्लरी—पण श्रीमंत आल्याबरोबर गेला सारा रुसवा कसा क्षणांत अगदीं !

शौनकेश्वर—श्रीमंतांचा आणि त्यांचा स्नेह दिसतो तसाच !—आईसरकार म्हणाल्याच तसं मघाशीं !

वल्लरी—त्यांच्याबरोबर गेली आहे स्वारी ! राजावाड्यांतच गेली असेल !

शौनकेश्वर—हा उघडच ! पण ते बघ आलेच श्रीमंत ! आईसरकारही बरोबर आहेतच ! आणि त्या एक कुणी बाई दिसताहेत ! जांवई कुठें आहेत ? ते नाहीं दिसत बरोबर !

[ आईसरकार, हरिहर व सुंदर प्रवेश करतात. ]

आईसरकार—बाळ सुंदर, शास्त्रीबोवांना कर नमस्कार ! ( सुंदर

नमस्कार करते. ) शास्त्रीबोवा, ही आमची बाळासाहेबांची नियोजित वधू !

शौनकेश्वर—जांवई कुठें आहेत पण? श्रीमंतांबरोबर इथून गेले. वाड्यांतच ठेऊन घेतले कीं काय ?

आईसरकार—विधिलीलेनं नि आमच्या कारभाऱ्याच्या गोंधळ्या कारभारानं ही सुंदरच घटकेपूर्वी तुमचे जांवई सुंदरराव झाली होती !

शौनकेश्वर—म्हणजे !

आईसरकार—तुमचे जांवई ते हीच माझी सून !—शास्त्रीबोवा, झाल्यागेल्या गोष्टीला उपाय नाहीं ! वल्लरीला योग्य असा वर पाहून देईन, आणि बाळासाहेबांच्या लग्नसोहळ्याबरोबरच तिचा लग्नसोहळा करीन मी !

शौनकेश्वर—पण आईसरकार, तिला आतां कोण वरणार ? एकदां जिचा विवाह झालेला, तिला पुनः वरायला कोण तयार होणार ?

[ कॅप्टन वामनराव व कल्याणपंत प्रवेश करतात. ]

वामनराव—वल्लरीला वरायला हा तिचा बालपणचा खेळगडी वामन तयार आहे, शास्त्रीबोवा !

शौनकेश्वर—कोण ? वामन ? मोरभटजींचा वामन ? डॉक्टर होऊन इंग्रज सरकारच्या सेनेबरोबर युद्धाला गेलेला वामन, तोच तूं ?

वामनराव—होय शास्त्रीबोवा ! तोच मी !

शौनकेश्वर—वा वामन ! तुझ्या बालपणीं मोरभटजीनें मला शब्द दिलेला, वामनास वल्लरी करीन ! तो शब्द पुरा करायलाच धाडला तुला ऐनवेळीं जगदीशानें !

हरिहर—आमची सोडवणूक करायला कॅप्टन वामनराव धांवून आले, हें त्यांनीं आमच्यावर केवढें तरी ऋण करून ठेवलें आहे !—असो. ह्याप्रमाणें—प्रभुकृपेनें शेवट गोड झाला !—धरून बांधून होणारीं हीं दोन्ही लग्नें—वल्लरीचें हिच्याशीं, व हिचें त्या मुकुंदरावाशीं—ह्याप्रमाणें टळून आम्ही आज धन्य-धन्य झालों आहों !—ह्याहून दुसरं काय म्हणायचं ?

वामनराव—हुंडा, जो हीं धरून बांधून लग्नें लावतो, त्याचा संहार झाला पाहिजे ! धरून बांधून नेलेल्या शिपायांकडून रणांगणांवर अपयशच मिळणार ! त्याप्रमाणें हीं हुंड्यामुळें धरून बांधून होत असलेलीं लग्नें संसारसंगरांत

अपयशच देणार ! ही गोष्ट लक्षांत आणून आमच्या श्रीमंतांनीं आपल्या [illegible] संस्थानांत हुंड्याचें बंड मोडून टाकण्याचें कंकण बांधायला हवें !

इतर सर्व—तथास्तु !

( शेवटचा पडदा पडतो. )

---

[ ७ ]

# बायकोचें भूत !

## अंक पहिला

### प्रवेश पहिला

[ स्थळ—सदूभाऊचें घर. माजघरांत सदूभाऊ संध्येस बसले आहेत, व गिरिजाबाई भिंतीस टेकून उभ्या आहेत, असा प्रवेश. ]

सदूभाऊ—( आचमन घेऊन ) केशवायनमः, नारायणायनमः, माधवायनमः,—आपली मैना किनई भाग्यवान् खरी ! बुवासाहेब येणार आहेत उद्यां पहायला तिला—

गिरिजा—बुवासाहेब ! बुवासाहेब कोण ?

सदूभाऊ—आपले बुवासाहेब धनेश्वर ! बुवासाहेबांसारखा नवरा मिळाल्यावर आणखी काय पाहिजे पोरीला ?

गिरिजा—( साश्चर्य ) बुवासाहेब धनेश्वर ! त्या थेरड्याला का देणार माझ्या मैनेला ?

सदूभाऊ—काय, बोलतेस तरी काय हें ! अशीं स्थळें ठेविलीं आहेत कुठें ! मुबलक धनदौलत, हाताशीं हवी तितकीं चाकरमाणसें, खाण्यापिण्याची ददात नाहीं ! पहिल्या कुटुंबाची–त्रिवेणीबाईंचीं मुलें जगत नाहींत म्हणून लग्न करताहेत, नि म्हणून तर आपल्याला लाभताहेत हे ! हें आपलें भाग्य समज ! आतां, थोडें वय झालें आहे–पण त्याचें काय ? पोरीचें नशीब धड असलें, तर पोरें होतील, बाळें होतील–सगळें कांहीं होईल—

गिरिजा—सगळं कांहीं होईल ! सगळे होतील सोहाळे ! पण मी नाहीं होऊं द्यायची ! तरच नांवाची गिरिजा ! त्यांचीं पोरं जगत नाहींत म्हणून

मी आपली पोरं बुडवूं होय ? नि आपल्या बुद्धीला तरी हें कसं दिसतं बरं ! त्या दौलतीकडे पाहून का पोरीच्या जन्माचा खेळखंडोबा करायचा ? त्यापरती तिला विहिरींत, नाहीं तर नदींत कां नाहीं लोटून देत ? सोन्यासारखा भाचा —नजरेखालीं वाढलेला—चांगली माटल्किुशन पास झाला आहे—त्याला टाकून हा थेरडा कसा मनांत भरला ? रघुनाथासारखा हुशार नि सालस मुलगा भारंभार हुंडा ओतून तरी का मिळायचा आहे ? तें टाकलं, नि म्हणे— म्हणतात ना—

सदूभाऊ—पुरे कर तुझें पुराण आतां ! माझी संध्या भासकळली ! ( पुनः आचमन घेऊन ) केशवायनमः, नारायणायनमः, माधवायनमः—

गिरिजा—नि वर हुंडा किती देणार ? हो—चांगला आजोबासा जांवई लाभला, तेव्हां हुंडाहि रगड देणार असाल !

सदूभाऊ—गोविंदायनमः, विष्णवेनमः, मधुसूदनायनमः, जनार्दनायनमः, पुरुषोत्तमायनमः, प्रद्युम्नायनमः, अनिरुद्धायनमः—

गिरिजा—कीं उलटे पैसे घेणार पोरीचे ?

सदूभाऊ—पैशाच्या गोष्टी आहेत ह्या ! बायकांना कोणीं सांगितल्या आहेत ? पुरुषाच्या जन्माला जावें, तेव्हां ह्या गोष्टी बोलाव्यात !—आमचीं दुःखें आम्हांला ठाऊक ! ( स्वगत ) पांच हजार रुपये देणार आहेत, तें हिला नाहींच सांगतां कामा !—हृषीकेशायनमः, पद्मनाभायनमः, दामोदरायनमः—

गिरिजा—अगबाई ! जसं कांहीं मला कांहींच कळत नाहीं ! मी बोळ्यानंच दूध पित्यें किनई ! पोरीला तुम्ही विकणार कीं काय ?

सदूभाऊ— हो हो विकणार ! ह्यावर कांहीं बोलणें उरलें आहे तुझें ? संकर्षणायनमः, अधोक्षजायनमः— उद्यां पहायला येणार आहेत, म्हणजे काय— केवळ नांवाला ! निश्चित करून टाकलें सगळें कांहीं संध्याकाळीं ! नि तें कांहीं हा सदूभाऊ—प्राण गेला तरी फिरवायचा नाहीं !—वामनायनमः, त्रिविक्रमायनमः.—

गिरिजा—दुर्दैव पोरीचं ! नका फिरवूं ! ( स्वगत ) आतां असं नाहीं

करून उपयोग ! त्यांचा निश्चय कांहीं केल्या पालटायचा नाहीं, ही ठर-लेली गोष्ट ! तेव्हां, त्रिवेणीबाईना चेतवून त्यांच्याकडून त्यांच्या नवऱ्याचाच विचार पालटेल, असं करविलं पाहिजे कांहींतरी ! हो असंच ! ( उघड ) बायकांचा जन्म ! ज्यांच्या गळ्यांत बांधाल–त्यांना देवतुल्य समजलं पाहिजे ! आपल्यालाच हें ठीक दिसतं, तर माझं बोलणंच सरलं ! पण बाई रहाववेना–जें मला ठीक दिसलं तें सांगितलं. एकदां लग्न लागलं, कीं येणार आहे बोलता ?

सदूभाऊ—हरयेनमः–संध्या भासकळलीच सगळी !

गिरिजा—पोरीचं हिताहित कळतंच आहे आपल्याला ! पण माझ्या अक्कलेला जें दिसलं तें सांगितलं—

सदूभाऊ—तुझी अक्कल नको मला ! बायकांची अक्कल काय–चुलीपुरती ! जा–आतां पानें वाढायच्या तयारीला लागा ! ( नाक मुठींत धरून ) ओऽम् ! भूर्भुवर–उद्यां जेवायलाच बोलाविलें आहे हो त्यांना इकडे ! म्हटलें, जेवायला बोलाविलेंसेंहि होईल, नि पोरीलाहि बघतील नीट !

गिरिजा—मग त्रिवेणीबाईनाहि सांगायला हवं जेवायला.

सदूभाऊ— हो—खरेंच ! तूं आतां जेवण आटोपून आधीं जाऊन सांगून ये ! ( कशीबशी संध्या आटपून ) आटोप आतां, वाढ पानें !

[ जातात.

गिरिजा—( स्वगत ) युक्ती पण कशी खाशी सुचली आहे बाई ! जात्यें नि त्रिवेणीबाईनाच करत्यें तयार ! ( उघड ) मैने, बाळ इकडे ये ! ( मैना येते. ) रघु कुठं आहे ? त्याला धाड इकडे ! ( मैना जाते. ) आतां आधीं जेवणं उरकून घ्यावींत. ( रघुनाथ येतो त्यास ) म्हटलं, पिऱ्या कांहीं आज इथं नाहीं. पहांटेस येईल तो ! नि मला तर त्रिवेणीबाईकडे जाऊन आतां कुंकूं लावून यायला हवं उद्यांच्या जेवणाचं ! तेव्हां, तुला माझ्या बरोबर आलं पाहिजे बरं का आतां जेवणं आटोपल्यावर ! जेवणं झाल्यावर कुठं बाहेर जाऊं नको !

रघुनाथ— हो ! [ जातो.

गिरिजा—( स्वगत ) जेवणाचं कुंकूं लावायला जाण्याची ही संधि बाई देवानंच आणून दिली! आतां त्रिवेणीबाईंचे कान फुंकून सांगत्यें त्यांना: माझ्या पोरीच्या जन्माचं मातेरं व्हावं असं त्यांच्या मनांत नसेल, तर खाच करतील त्या माझ्या सांगीप्रमाणं! बायकांची अक्कल चुलीपुरती काय! बघत्यें आतां—बायकांनां पुरुषी अकलेचे किल्लेहि ढांसळून पाडतां येत'त कीं नाहीं तें! जाऊंद्या, आधीं पाटताटें मांडून जेवणं उरकून घेऊं द्या! [ जातात.

## प्रवेश दुसरा

[ स्थळ—नदीचा घाट. त्रिवेणीबाई प्रवेश करितात. ]

त्रिवेणी—( स्वगत ) बारांचे ठोके कानीं पडले मात्र तो गिरिजाबाईच्या मंत्राप्रमाणें स्वारीला गदगद हलविलें, नि—'लग्नाचा विचार कायमच करा, मी आपली जाऊन जीवच देत्यें नदींत!' असं ओरडून इकडे धूम ठोकली! तर्काप्रमाणं स्वारी नडक उठून काठी टेकीत टेकीत ह्या काळोखांतून मागोमाग येते आहे! येईत तोंवर ओचे खोंचून तयारी करून ठेवावी! काळोख तरी कोण बाई पडला आहे हा! डोळ्यांत बोट घातलं तरी दिसायचं नाहीं! ( ओचे खोंवीत चाहूल ऐकून ) स्वारी आलीच! ( बुवासाहेब प्रवेश करतात, त्यांस ) हें पहा. माझ्या निश्चया आड कांहीं आपण येऊं नये! मी येत्यें आहे आपल्या बेता आड?

बुवासाहेब—पण काय—त्याचें नांव तरी काय! म्हणावें काय ह्या साहसाला ( त्रिवेणीबाईस अडवितात. )

त्रिवेणी—नाहीं, मी नाहीं ऐकायची! मी आपली जीवच देणार! ह्या वयांत हें लग्नाचं वेड शिरलं तरी कसं डोक्यांत? केंस पिकले, त्यांना काहीं काळोखी लावतां! नि मी ती ह्या डोळ्यांनीं पाहूं? त्यापरती नदींत उडीच घेतलेली काय वाईट?

बुवासाहेब—काळोखी ती कसली! मुलासाठीं लग्न केलें तर त्यांत जनाविपरीत तें काय घडणार? तुझ्या एखाद्याला प्रभूनें आयुष्य दिलें असतें, तर मी कशाला केला असता हा विचार?—माझें ऐक! असा वेडेपणा करूं नको! ऐक—तुझीं मुलें जगलीं नाहींत, तरी हिचीं जगतील, रांगूं खेळूं लागतील,

मोठीं होतील तीं पाहून तुझ्या डोळ्यांचें पारणें नाहीं का फिटणार? मग मीं लग्न केलें तर काय बिघडलें ?

त्रिवेणी—लग्न केलं तर काय बिघडलं ! आपल्याला मुलं नाहीत, म्हणून दुसऱ्याच्या पोरीला बुडवायची ?—नांव सांगायला मूल हवं तर दत्तक नाहीं का घेतां येत ! तें राहिलंच, नि म्हणे लग्न करणार !—मी नाहीं ऐकायची ! मी जीव देणार ! खुशाल लग्न करा ! मी जीव देईन—जलीण होईन—नि तुमच्या मुलांनीं भरलेलं घर पहायला येईल ! कध्धीं चुकायची नाहीं ही त्रिवेणी बरं !

बुवासाहेब—हरे राम ! असें करूं नको, माझें ऐक, थोडा विचार कर—

त्रिवेणी—कसला विचार ! सोडा मला ! घेऊं द्या बुडी ह्या डोहांत—

बुवासाहेब—ए—हं—हं काय हें वेडें साहस ? ( पत्नीचा हात धरतात. )

त्रिवेणी—साहस म्हणा—वेड म्हणा—वाटेल तें म्हणा ! मी आतां शेवटचं एकदाच विचारत्यें !—आपल हा लग्नाचा हेका आपण पुरविणारच का ? तर मग मी पण आपला हेका पुरवित्येंच ! नि भूत होऊन आपल्या लग्न-सोहाळ्याला येत्यें ! हं शेवटचे शब्द ऐकून ठेवा ! ही त्रिवेणी भूत होणार नि पहायला येणार आपल्याला बांशिंग बांधलेलें ! पण इतकं लांब कशाला ! उद्यांच येत्यें आपल्याला भेटायला ! येतें तर आता ! येत्येंच !

[ हाताला हिसडा देऊन उडी घेतल्याचा आव आणतात व नदी उतरून जातात. बुवासाहेब हिसड्यामुळें पाण्यांत पडतात. ]

बुवासाहेब—हरे राम ! गेलीच—जीव दिलाच ! हरे भगवान् ! हरे राम ! राम—राम—राम—राम ! मला एकट्याला इथें टाकून गेलीच का ! हरे राम ! राम—राम—राम—

[ पिऱ्या प्रवेश करितो. ]

पिऱ्या—( स्वगत ) आं ! ह्या वख्ती कोण आलें इथें राम म्हणायला ! ह्या काळवख्तीं इथें जीव द्यायला कोण आलें ? ( निरखून पाहून ) खरेंच ! हा बुवा इथें खराच जीव देतोय पाण्यांत ! हा पिऱ्या इथें जिवंत असतां कसा मरूं देईल याला ? ( दोन्ही हातांनीं वळसा घालून बुवासाहेबांस उभा करतो व धरून घाटावर आणतो. )

बुवासाहेब—हरे राम ! अरे सोड–सोड मला !

पिऱ्या—नाहीं ! तें नाहीं व्हायचें ! सोडायची बात नका बोलूं ! शिः शिः ! भारी बंगाळ काम ! भारी मोठें पाप ! ह्या असल्या पापांत कां बरें पडावें ?

बुवासाहेब—हरे राम ! ( स्वगत ) स्त्रीहत्येचें पातक घडलें आहे खरें मजकडून ! ह्यानें हा प्रकार पाहिला खास ! नि मींच तिला पाण्यांत लोटली, असा समज झालेला दिसतो ह्याचा ! आतां ह्याला सांगणार काय, नि सवरणार काय ! ( उघड ) हरे राम ! सोड, जाऊं दे मला—

पिऱ्या—नाहीं राव ! पकडलें आहे, तें का जाऊं द्यायला ! ( स्वगत ) ह्याला जाऊं दिलें, तर हा पुनः जीव द्यायला येईल इथें !

बुवासाहेब—हरे राम ! ( स्वगत ) हा मला आतां पोलीस चौकीवर नेणार–नि मग–हरे राम ! ( उघड ) सोड–जाऊं दे मला ! मी तुला ( बोटांतील आंगठी काढून ) ही आंगठी देतों ! कर मेहेरबानी, नि जाऊं दे मला ! हरे राम !

पिऱ्या—( आंगठी घेऊन ) पण पहा ! फिरून नाहीं करतां कामा असें बंगाळ काम !

बुवासाहेब—नाहीं रे ! फिरून जीव गेला तरी असें करणार नाहीं ! तुझ्या गळ्याची शपथ ! पण जाऊं दे मला घरीं !

पिऱ्या—हं–मग ठीक ! खुशाल जा घरीं ! ( सोडतो, तों गस्तवाल्या पोलीसची गस्त ऐकूं येते. )

बुवासाहेब—( स्वगत ) हरे राम ! पोलीस इकडेच येतो आहे ! आतां कसें करणार ! ह्या चोरानें–दगा नाहीं दिला म्हणजे बरें ! नाहीं तर–हरे राम ! ( उघड ) हें बघ गड्या, कसें हि कर, नि मला ह्या प्रसंगांतून पार पाड ! हें सलकडें तुला देतों ! ( हातांतील एक सलकडें काढून देऊन ) पण अवाक्षरहि कांढूं नको बरें कुणाशींहि–काय पाहिलेंस त्यासंबंधीं ! हरे राम !

पिऱ्या—( सलकडें घेऊन ) नको फिकीर त्याची तुम्हांला ! ह्या पिऱ्याचें इमान तर पहा !

( गस्तवाला पोलीस येतो. )

गस्तवाला—अल्बेल!

पिन्या—अलबेल! किती वाजले हवालदारदादा?

गस्तवाला—एक!—अलबेल!

पिन्या—अलबेल! ( गस्तवाला जातो ) चला, मी तुम्हाला घरींच पोंचवितों!

बुवासाहेब—नको-नको! जा तूं आतां! मी जाईन घरीं! पण हें बघ, चकार शब्दहि बोलूं नको बरें कुणाशीं! हरे राम!

पिन्या—त्याची नको फिकीर! पण घरीं जाल ना?

बुवासाहेब—तुला नको काळजी! जा तूं! हरे राम!

पिन्या—फिरून असें बंगाळ काम करायचें नाहीं, बरें? राम राम.

( दोघे दोहींकडून जातात )

---

## अंक दुसरा

### प्रवेश पहिला

( स्थळ—सदूभाऊचें घर. माजघरांत गिरिजाबाई व त्रिवेणीबाई बोलत बसल्या आहेत, असा प्रवेश. )

गिरिजा—मग पुढं कसं केलंत बाई?

त्रिवेणी—पुढें काय करायचं? नदी उतरल्यें नि पलीकडे गेल्यें! तिथं आमचा कोंडी गडी बसलेला होताच जाऊन आधीं! सान्या नदींत गुडध्या-ध्यावर पाणी कुठंच नाहीं हें स्वारीला मुळींच ठाऊक नव्हतं! आजन्मांत कधीं नदीवर गेले असतील तर ना कळायचं! मी नदींत उतरलें असेन नसेन इतक्यांत कोणसं नदींतून घाटाकडे गेल्सं वाटलं; म्हटलं, न जाणो, कोण असेल नि कोण नाहीं! म्हणून पलीकडे वाळवंटांतच बराच वेळ काढला! नि मग चंद्रोदय झाल्यावर—असं दोहोंच्या सुमारास कोंडीबरोबर पुनः नदी उतरून घरीं आल्यें! येऊन निजल्यें, नि सकाळीं उठल्यावरहि

खोलीबाहेर फिरकल्यें नाहीं ! घरांतल्या चाकरमाणसांना हा सारा बेत आधींच सांगून ठेविलेला असल्यामुळं, मी आहे कीं नाहीं, मेल्यें कीं जिवंत आहे, याबद्दल अवाक्षरहि त्यांनीं काढलं नाहीं ! जसं कांहीं विशेषसं कांहींच घडलं नाहीं, असा रोजचा व्यवहार त्यांनीं चालविला ! नि तिकडची स्वारी तर काय—चापाचिप ! बोलते काय ! बोलून सांगणार काय नि सवरणार काय ? बायकोनं अशा अशाकरितां जीव दिला, असं सांगणार ? तें कांहीं शक्य नव्हतें ! मिळून एकंदर आतांपर्यंतचा भाग तर मनासारखा बेठला. पुढला भाग कसा काय पार पडतो. तें पहायचं आतां !

गिरिजा—सगळं पार पडेल नीट ! देव करील तर सगळं कांहीं मनाजोगं होईल, नि माझ्या पोरीला दुसरा जन्म दिल्याचं श्रेय तुम्हांला मिळेल, त्रिवेणीबाई ! तुम्हीं तो कोणसा म्हटलात किनई, तो बाई आमचा गडी पिऱ्या ! काल आमच्या खोती गावीं गेला होता तो पहांटेस परत आला. तो सकाळीं म्हणत होता, रात्रीं एक म्हाताराबुवा जीव द्यायला गेला होता घाटावर, नि आपण त्याला परत घरीं धाडलं म्हणून ! त्याला कांहीं ठाऊक नाहीं बुवासाहेबच ते हें !

त्रिवेणी—बाई, हा योगायोग विलक्षणच जमला म्हणायचा ! आतां स्वारी इथं आली कीं ओळखील त्यांना हा तुमचा गडी ! नि मग घटकाभर गंमतच उडेल ! बाई सांगूनच ठेवावं त्याला आधीं सगळं कांहीं, नाहीं ?

गिरिजा—खरं-खरंच, मी सांगत्यें त्याला सारं ! म्हणजे आपल्या कार्यालाहि सहाय्य होईल त्याचं चांगलं !

( रघुनाथ प्रवेश करतो. )

रघुनाथ—इकडे यायला निघाले आहेत बुवासाहेब ! त्यांचें स्नानवीन आटपायला बराच वेळ लागेल, मला दोनतीन तरी खेपा घालाव्या लागतील, असें मामा म्हणाले होते; पण स्वारी तर वाटच पहात होती बोलाविण्याची ! मी गेल्याबरोबर उठली नि निघाली !

त्रिवेणी—बाशिंग बांधायला उतावळेच झालेले आहेत किनई, मग कां नाहीं उठणार ?

गिरिजा—आटपू द्या आतां. तिकडचं स्नानहि व्हायचं आहे अजून. रघु तुझं झालं स्नान ?

रघुनाथ—हो, मी स्नान केल्यानंतर बोलवायाला गेलों ! ( जातो.

गिरिजा—बरं, उठावं आतां, नि लागावंच पुढल्या तयारीला !

त्रिवेणी—किती बाई गोड मुलगा आहे हा तुमचा भाचा ! अशा मुलाला दत्तक घ्यावं, नि स्वतःला भाग्यवान् समजावं; पण तें राहिलं निं म्हणे लग्न-आतां साठींत ! म्हणतात ना, साठी नि बुद्धि नाठी !

गिरिजा—खरंच बाई ! बरं उठावं आतां ! बाई, तुम्हीं ह्या आंतल्या खोलींत बसावं म्हणजे बरं, नाहीं ?

त्रिवेणी—हो ! बरी आडशी आहे ! चला ! ( जातात. )

---

## प्रवेश दुसरा

( स्थळः—बैठकीची जागा. सदूभाऊ बसलेले आहेत.
बुवासाहेब प्रवेश करितात. )

सदूभाऊ—( उठून ) यावें-यावें ! बुवासाहेब ! बसावें ! ( बुवासाहेब लोडाशीं बसतात व सदूभाऊ बैठकीच्या टोंकाशीं बसतात. )

बुवासाहेब—हरे राम !

सदूभाऊ—अं ! आज आपण असें कष्टी कां बरें दिसतां ? आपली चर्या फिरलेली दिसते ! कांहीं विशेष तर नाहींना झालें ?

बुवासाहेब—विशेष ! विशेष काय झालें आहे ? कांहीं कळलें आहे की काय तुम्हांला ?

सदूभाऊ—नाहीं, मला कांहीं नाहीं कळलें !

बुवासाहेब—मग कुणाला कळलें आहे.

सदूभाऊ—काय ?

बुवासाहेब—विशेष कांहीं झाल्याचें !

सदूभाऊ—कुणाला नाहीं ! आज आपली तब्येत ठीक नाहीं दिसत ! झोंप लागली होती ना रात्रीं ?

बुवासाहेब—रात्रीं ! हरे राम ! रात्रीं झोंप न लागायला काय झालें ? कांहीं नाहीं–तुमच्या गळ्याची शपथ हो, कांहींच झालं नाहीं !

सदूभाऊ—( स्वगत ) आज स्वारी अशी वायचळल्यासारखी काय करते आहे ! चिलमीची संवय आहे स्वारीला दमाचेम तर जास्त नाहीं ना मारिला ? कीं ओढलीच नाहीं बऱ्याच वेळांत, म्हणून करताहेत असें भ्रमिष्टासारखें ? ( उघड मोठ्यानें ) पिऱ्या, अरे पिऱ्या !

पिऱ्या—( आंतून ) जी–अ !

सदूभाऊ—अरे चिलीम भरून आण चिलीम–बुवासाहेबांकरितां !

पिऱ्या—( आंतून ) जी होय !

सदूभाऊ—नि दूधहि घ्यावें आपण थोडें, पानें वाढीतोंपर्यंत ! ( मोठ्यानें ) रघु ! अरे दूध आण दूध–बुवासाहेबांना कढतच !

रघुनाथ—( आंतून ) हो.

सदूभाऊ—कपडे काढावेत बुवासाहेब आतां ! ( बुवासाहेब कपडे काढून खुंटीवर ठेवितात; रघुनाथ दुधाचा पेला आणून ठेवितो त्यास ) अरे–नी माझें स्नान व्हायचें आहे ! पिऱ्याला पाणी काढायला सांग.

रघुनाथ—ठीक. ( जातो.

सदूभाऊ—दूध घ्यावें बुवासाहेब. तोंवर मी स्नानसंध्या उरकून घेतों. संकोच वाटूं देऊं नये, आपलेंच घर आहे ! सांगायला नकोच !

बुवासाहेब—नाहीं, जा तुम्ही स्नानाला !

सदूभाऊ—ठीक ! ( जातात.

बुवासाहेब—( दूध घेत स्वगत ) हरे राम ! यांना कांहीं कळलें तर नाहीं ?

( चिलीम घेऊन पिऱ्या प्रवेश करितो. )

पिऱ्या—ही घ्यावी चिलीम साहेब !

बुवासाहेब—ऑं ! ( पिऱ्यास पाहून दचकतात; दुधाचा पेला हातांतून खालीं धोतरावर पडतो; दूध कढत असल्यामुळें मांडीस चटका बसून ' ओय ओय ' करीत उठून उभे रहातात ) तूं–तूं–तूं इथें का म्हणून ?

पिऱ्या—( हंसून ) चिलीम भरून आणली आहे, नव्हे का आपल्याला ?

( स्वगत ) रात्रीं आंगठी अन् एक सलकडें काढलें स्वारीपासून ! आतां हें दुसरें सलकडें अन् अंगावरचे दुसरे सारे डागिणे काढतों धनिणीच्या मागीबरहुकूम !

बुवासाहेब—जा-जा तूं इथून-जा आधीं !

पिऱ्या—मी तसा कसा जाईन इथून ?

बुवासाहेब—हरे राम ! म्हणजे तुला आणखी बक्षिसी पाहिजे होय ? ( हातांतील दुसरे सलकडें काढून ) हें घे, नि नीघ इथून एकदांचा ! फिरकूं नको इथं पुनः;

पिऱ्या—( सलकडें घेऊन सदऱ्याच्या खिशांत टाकून ) हें घेतोंच ! पण फिरकल्या विगर कसें चालेल इथें ?

बुवासाहेब—हरे राम ! बरें फिरक ! पण बोलूं तरी नको इथें रात्रीचें—

पिऱ्या—आतां दिवस नव्हे का साहेब ?

बुवासाहेब—अरे हो, पण रात्रींची गोष्ट इथं काढूं नको अगदीं !

पिऱ्या—रात्रीची गोष्ट—

बुवासाहेब—नको-नको बोलूं अधिक ! इथें तरी बोलूं नको ! नि गांवांतहि वाच्यता करूं नको तिची !

पिऱ्या—गांवांत ? गांवांत बोलून मला काय मिळणार !

बुवासाहेब—तुला होय, हे घे सल्ले ! ( सल्ले काढून देतात. )

पिऱ्या—( सल्ले खिशांत टाकून ) हे तर मिळालेच, पण आणखी काय मिळणार ?

बुवासाहेब—आणखी ? ( कंठी काढून ) ही घे कंठी ! हेर राम !

पिऱ्या—( कंठी खिशांत टाकून ) इतकेंच ?

बुवासाहेब— ही पोवची घे, नि कर तोंड काळें एकदाचे नि बंदहि ! ( पोवची देतात. )

पिऱ्या—( पोवची खिशांत टाकून ) बंद करतों, पण काळें कसें करूं ? ते नाहीं व्हायचें साहेब !

बुवासाहेब—हरे राम ! पुनः तेंच ! आतां तुला आणखी काय द्यायचें राहिलें आहे ?

पिऱ्या---( निरखून पाहून ) कांहीं नाहीं राहिलें आणखी ? पण असें वंगाळ काम--शि: शिः ! भारी वंगाळ काम ! लग्न करून तरी नका करूं साहेब असें वंगाळ काम ! नाहीं तर लगीन करायचें नि दुसऱ्यांच्या पोरींना बुडवायच्या. शिः शिः--फिरून नाहीं करतां कामा; बघा असें वंगाळ काम !

बुवासाहेब---नाहींरे तुझ्या गळ्याची शपथ ! मी असें पुनः नाहीं करायचा तूं एकदाचा जा इथून ! ( स्वगत ) दुसऱ्यांच्या पोरींना बायका करून मी नदींत बुडवीत असतों, असें समजतो कीं काय हा चोर ! नि मीं अशा किती पोरी बुडविल्या म्हणून समजतो हा !

पिऱ्या---( स्वगत ) आतां आटपावें हें नाटक ! धनी आतां येतील ! ( उघड ) पहा, फिरून नाहीं करतां कामा असें !

बुवासाहेब---नाहीं रे, खास नाहीं करायचा ! पण कर एकदां काळें तोंड इथून !

पिऱ्या---पण ही चिलीम आपण घ्याल तेव्हांना ! चिलीम घेतल्याविगर मी कसें काळें तोंड करूं आपलें ?

बुवासाहेब---चिलीम ! बरें दे, नि जा एकदांचा इथून ! ( चिलीम घेऊन खालीं बसून ओढूं पहातात, तों सदुभाऊ एकदम प्रवेश करतात; त्यांना पहातांच दचकून हातांतून चिलीम गळून मांडीवर पडते; मांडीला निखाऱ्यांचा चटका बसून " ओय ओय " करीत ताडकन् उभे रहातात. ) हरे राम !

सदूभाऊ---काय, चिलीम पडली वाटतें ? नि दूधहि सांडलेलें दिसतें धोतरावर ! पिऱ्या, जा आंतून एक धोतर घेऊन ये धुपकें ! हा पण---जेवणाचीं पानेंच मांडलीं आहेत, नाहींत का ? मग सोंवळ्याचा पितांबरच आणायला सांग !

[ चिलीम घेऊन जातो.

पिऱ्या---जी होय !

बुवासाहेब---हरे राम ! ( स्वगत ) केवढें दुर्दैव, कीं, ह्या ह्यांचा समोर

असावा, नि ह्यानेंच रात्रींचा प्रकार पाहिलेला असावा ? ह्यानें जर सर्व कांहीं यांना सांगितलें असलें–किंवा सांगितलें तर–हरे राम ! कसलें लग्न नि कसलें काय !

सदूभाऊ—आपली तब्यत आज ठीक दिसत नाहीं बुवासाहेब ! जेवण झाल्यावर थोडी झोंप घ्या इथेंच ! नि मग झोंपेनंतर मोकळी हवा घेऊं थोडी—अशी नदीच्या घाटावर !

बुवासाहेब—नदीच्या घाटावर ? हरे राम !

सदूभाऊ—म्हणजे नदीच्या घाटावर जाणें आपल्याला बरें नाहीं वाटत वाटतें ?

बुवासाहेब—बरें नाहीं वाटत ? बरें न वाटण्यासारखें नदीच्या घाटावर कांहीं आहे कीं काय ?

सदूभाऊ—छे, काय असायचें ? ( स्वगत ) स्वारीला खास बुद्धिभ्रंश झाला आहे, नि ह्या असल्या भ्रमिष्टाला का मी आपली सोन्यासारखी पोर देणार ! शिव शिव ! पण पांच हजार रुपये–ते कसे एरव्हीं मिळणार ! ( रघुनाथ सोंवळें आणून देतो ) सोंवळें व्हावें आतां !

बुवासाहेब—( सोंवळें घेऊन ) होय–हरे राम ! ( सोंवळें होतांना स्वगत ) तिच्याप्रमाणें मीहि नदीच्या डोहांत उडी घेतली असती तर किती बरें झालें असतें ! हरे राम !

सदूभाऊ—नाहीं तर ह्या आमच्या केळीच्या राईतच हवा घ्यायला बसूं संध्याकाळीं, म्हणजे बरें वाटेल आपल्याला !

बुवासाहेब—हो–तिथें बरें !

सदूभाऊ—चलावें आतां आंत.

बुवासाहेब—चला. हरे राम !

( जातात. )

## प्रवेश तिसरा

[ स्थळ—सदूभाऊंच्या घरामागील केळीची राई. गिरिजाबाई व त्रिवेणीबाई प्रवेश करितात. ]

गिरिजा—हं आटपा आतां! स्वाऱ्या इतक्यांत येतील इकडे! तोंवर मळवट भरून नि केंस मोकळे सोडून सजवा आपलं सोंग!

त्रिवेणी—जखणीचं सोंग! खरंच बाई, हें सोंग तर चांगलं सजलं पाहिजे—तिकडच्या तोंडचं पाणी पळविण्याजोगं! ( केश मोकळे सोडून ) बायकोचं भूत पाहून जर पांचावर धारण बसली नाहीं, तर कसली बायको, अन् कसलं भूत!

गिरिजा—( कुंकवाचा करंडा उघडून त्रिवेणीस मळवट भरीत ) खरंच हो बाई, पिन्यानं डागिणे देऊन ठेविले आहेत बरं का मजजवळ! आज मिळविलेले पोवची, कंठी, सल्ल नि एक सलकडें, नि रात्रीची आंगठी नि दुसरं सलकडं!

त्रिवेणी—तुमच्याजवळच असूंद्या ते! नि योग्य वेळ येईल तेव्हां आणा पुढं—स्वारीला घाबरावायला! तुमचा हा पिन्या बाई भारी इमानी दिसतो! त्याला कांहीं देऊं बक्षिस चांगलंसं सगळं मनासारखं झाल्यावर! त्यानं कामगिरीच तशी केली आहे बहारीची!

गिरिजा—हं, आतां ठीक समजलांत बाई! येतील इतक्यांत स्वाऱ्या;—त्या पहा आल्याच इकडे; मी जात्यें आतां आत; तुम्ही ह्या केळीच्या बेटांत दडून असा! थोडा वेळ त्यांनीं इथं हवा खाल्ली नाहीं, तोंच मी आमच्या स्वारींना बोलवित्यें घरांत पिन्याकडून, नि तितक्यांत मागल्या दारांत डागिणे घेऊन येऊन तुमच्या स्वारीपुढं ठेवून उरकून घेत्यें ह्या भुतांच्या नाटकाची नांदी! अन् मग आंत जाऊन ठेवित्यें गुंतवून आमच्या स्वारींना लग्नाच्या तयारीच्या गोष्टी काढून बराच वेळ, नि मग इकडे तुम्ही नि तुमचे यजमान होऊं द्या तुमचं नाटक पोटभर!

त्रिवेणी—हो, हें बाई ठीक जमलं! आतां नको काळजी! जा तुम्ही आंत.

गिरिजा—जात्येंच!

[ गिरिजाबाई आतांत व त्रिवेणीबाई केळींच्या एका बेटांत लपतात, तों सदूभाऊ व बुवासाहेब प्रवेश करितात. ]

सदूभाऊ-ही पाहिली आमची केळाची राई ! इथें हवा चांगली असते. ही राई आम्ही ह्या विहिरीच्या पाण्यावर केली बरें बुवासाहेब ! तुमच्या-सारखी घराजवळ नदी असती--

बुवासाहेब--नदी !

सदूभाऊ--हो नदीचा घाट जरी तुमच्या घरापासून थोडा दूर असला तरी नदी तुम्हांला अगदीं घरामागेंच--

बुवासाहेब—नदीचा घाट ! ( स्वगत ) हरे राम ! इथेंहि नदी अन् नदीचा घाट आलेंच ! ( पिऱ्या प्रवेश करितो. ) हरे राम ! हृहि पुनः इथें आहेच !

पिऱ्या—( सदूभाऊंस ) धनीण बोलावताहेत आतस्याला आत !

[ जातो.

सदूभाऊ—जाऊन येतों मी थोडा आंतून ! बसावें आपण ह्या बांकावर!

[ जातात.

बुवासाहेब—( बसून ) हरे राम !

[ गिरिजाबाई मागच्या दारानें प्रवेश करितात. ]

गिरिजा—( दागिणे पुढें टेवून ) हे आपले डागिणे घालावे अंगावर !

बुवासाहेब—हरे राम ! हे तुमच्याजवळ कसे आले !

गिरिजा—पिऱ्याला दिले होते ना आपण हे-त्यानं तोंडाला कुलूप घालावं म्हणून ! पण त्यानं सगळं सांगितलं मला !

बुवासाहेब—काय-हरे राम ! पण मी-नाहीं हो ! खरेंच-

गिरिजा—मला नाहीं वेळ उभं रहायला इथं ! ( जातात.

बुवासाहेब—थांबा हो थोड्या गिरिजाकाकू !-काय गेल्याच ! हरे राम! कळ-लेंच ह्या माणसांना सगळे कांहीं ! आतां कसलें लग्न नि कसलें काय ! हरे राम! ( केस मोकळे सोडून मळवट भरलेल्या त्रिवेणाबाई केळींच्या बेटांतुन मंद-गतीनें बाहेर येतात व-बुवासाहेबांकडे डोळे गरगर फिरवीत पहातात, त्यास

पाहून ) हरे राम ! हरे भगवान् ! हरे रा–म ! रा–म–रा–रा–म–म—
( बोबडी वळते. )

त्रिवेणी—( गंभीर आवाजानें ) मी—जन्वीण आहे–

बुवासाहेब—रा रा-रा-म-म-म-भू-भू-भू-त—( किंकाळी फोडून पाटावरून खालीं पडतात. )

त्रिवेणी—मी तुमच्या बायकोचें भूत आहे !

बुवासाहेब—भु-भु-भु-त ( डोळे मिटतात. )

त्रिवेणी—मी तुम्हाला खायला—

बुवासाहेब—हरे राम रा-म रा-म रा-रा-म-म-—

त्रिवेणी—आल्यें नाहीं ! भिऊं नका ! लग्न करूं नका !

बुवासाहेब—नाहीं करीन ! रा-रा-रा-म-म-म—

त्रिवेणी—त्या रघुनाथला दत्तक घ्या—

बुवासाहेब—घेतों ! राम-राम-राम राम—

त्रिवेणी—त्याचं नि मैनेचं लग्न करा—

बुवासाहेब—करतों ! राम-राम—

त्रिवेणी—नि फिरून लग्नाचं म्हणून नांव काढूं नका स्वतःच्या—

बुवासाहेब—नाहीं काढीत ! राम-राम-हरे राम—

त्रिवेणी—नाही तर पहा, तुमच्या बोकांडीस बसेन ! रोज येईन ! समोर उभी राहिलेली असेन !–घरातच राहीन ! नि सतावून सोडीन !

बुवासाहेब—लग्न करीत नाहीं. त्या रघुनाथाला दत्तक घेतों. मैनेचें नि त्याचें लग्न करितों–नि माझ्या लग्नाचें म्हणून पुनः नांव काढीत नाहीं––

त्रिवेणी––तर मग कळवा हें असं ह्या घरातल्या माणसांना–आत्तांच्या आत्तां !

बुवासाहेब––कळवितों–! हरे राम–

त्रिवेणी—नि त्या बबूमाऊंना देऊं केलेले पांच हजार ठेऊं नका ! देऊन टाका !

बुवासाहेब––देऊन टाकतों. सगळें कांहीं करितों ! हरे राम !–

त्रिवेणी—पहा बरं ! नाहीं तर—

बुवासाहेब—नाहीं-नाहीं-सगळें कांहीं करतों तुझ्या इच्छेप्रमाणें ! हरे राम.

त्रिवेणी—येऊं तर मी !

बुवासाहेब—ये-ये ! हरे राम ! ( डोळे उघडितात. )

[ त्रिवेणीबाई केळीच्या बेटांत शिरून मागल्या बाजूनें निघून जातात. सद्-भाऊ प्रवेश करितात. ]

सदूभाऊ—काय आपण बांकाखालीसे ?

बुवासाहेब—नाहीं, हरे राम ! ( उठून बांकावर बसून ) घरांतल्या सार्‍यांना बोलवा इकडे ! गिरिजाकाकू मैना-रघुनाथ सगळ्यांना !

सदूभाऊ—कां बरें ! बोलावितों ! अग मैने ! ( मैना येते, तीस ) घरांतून घेऊन ये तिला इकडे नि रघुला हि !

[ मैना जाते ].

बुवासाहेब—बसा इथें नीट बांकावर !

सदूभाऊ—हा बसलों ! ( बसतात. )

[ गिरिजाबाई, मैना, रघुनाथ व चिंन्या प्रवेश करितात. ]

बुवासाहेब—या, माझें बोलणें नीट ऐका ! प्रभूची इच्छा अशी दिसते, कीं, आतां ह्या वयांत मीं लग्नाच्या फंदांत पडूं नये—

सदूभाऊ—अँ ! पण आपला पूर्वीचा मनोदय—

बुवासाहेब—पूर्वीचा मनोदय सोडून देऊन मी आतां प्रभूच्या इच्छेपुढें मान वांकविली आहे !

चिंन्या—( स्वगत ) मानच्च काय—कंबरहि वांकविली नाहीं का ?

बुवासाहेब—नि इतःपर स्वतःच्या लग्नाचें नांव म्हणून काढायचें नाहीं, असें ठरविलें आहे—

सदूभाऊ—पण—पूर्वी—ठरलेलें—

बुवासाहेब—तुम्हांला देऊं केलेले वधूदक्षिणेचे पांच हजार रुपये—

गिरिजा—( स्वगत ) अगबाई—मला हें वाटलंच होतं—असं कांहीं तरी !

बुवासाहेब—तुम्हांला बिनबोभाट मिळतील—

सदूभाऊ—वा ! वा ! मग ठीक ! ( स्वगत ) मला तरी आणखी काय पाहिजे होतें !

बुवासाहेब—आणि ज्या हेतूनें मी हा लग्नाचा घाट घातला होता, त्या हेतूच्या सिद्ध्यर्थ मीं असें योजिलें आहे, कीं,—हा तुमचा रघुनाथ--

सदूभाऊ—हं, काय त्याचें !

बुवासाहेब—याला दत्तक घेऊन—

सदूभाऊ--वा ! वा ! वा !

बुवासाहेब---आपल्या सर्व दौलतीचा वारस करितों !

सदूभाऊ---वाहवा—महद्भाग्य ! योग्य निवड ! त्याला तरी दुसरें कोण आहे ? ना आईबाप ना भाऊबहीण, ना काका, मामा आहेच ! तरी पण आपण सगळ्यांच्या ठिकाणीं आहांत आतां !

बुवासाहेब---आणि त्यानें तुमच्या मैनेशीं लग्न करितों !

गिरिजा—देव तुम्हांला उदंड आयुष्य देवो !

बुवासाहेब--आहेना तुम्हांला हें सगळें पसंत ?—काकू—सदूभाऊ !

सदूभाऊ---हो—हो ! हें काय विचारणें ! पोरच्या जन्मास आल्याचें सार्थक झालें !

गिरिजा--नि तिला रघूसारखा पति मिळाला !

सदूभाऊ—नि बुवासाहेब धनेश्वरांसारखे श्वशुर मिळाले !

बुवासाहेब--आतां मुलांत दुःख इतकेंच कीं, हा सगळा आनंदाचा प्रसंग पहायला—ती—इथें नाहीं !

गिरिजा—कोण—त्रिवेणीबाई ! त्या तर इथेंच आहेत !

बुवासाहेब--हरे राम ! पुनः आली कीं काय ?

गिरिजा—नाहीं ! जेवायला आज इकडे आल्या त्या इथेंच आहेत ! घरीं गेल्याच नाहींत !

बुवासाहेब—कोण ?

गिरिजा—आपलें कुटुंब-त्रिवेणीबाई !—जा बाळ मैने ! घेऊन ये त्यांना इकडे. म्हणावं, तुमचे यजमान बोलावित आहेत, नको पण मीच घेऊन येतें त्यांना ! ( जातात.

बुवासाहेब—म्हणजे !—ती जेवायला इकडे आली आहे ! ( स्वगत ) मी स्वप्नांत तर नव्हतों इतका वेळ !

सदूभाऊ--हो ! आपल्याबरोबर त्यांनाहि बोलाविलें होतें इकडेच.

( केस बांधून नीट कुंकू लाविलेल्या त्रिवेणाबाई गिरिजाबाईसह प्रवेश करितात. )

बुवासाहेब--काय-खरंच-

त्रिवेणी--खरंच, मी जेवायला आल्ये हो-ये !

बुवासाहेब--( स्वगत ) तर मग मी स्वप्नांत तर नव्हतों इतका वेळ !

त्रिवेणी--स्वारींनं आपला पूर्वीचा विचार सोडून देऊन मैनेला आपली सून करण्याचं नि रघूला दत्तक घेण्याचं योजल्याचं गिरिजाबाईंनीं हें आतां मला सांगितलं, तें ऐकून किती बाई आनंद झाला म्हणून सांगूं !-हा मैना रघूचा-जोडा बाई फार छान जमला. बाळ रघु, ये इकडे. मैनाबाई, तूंहि ये जवळ ! ( दोघेंहि जवळ येतात, त्यांच्या तोंडावरून हात फिरवून ) शतायु व्हा ! देव तुम्हांला सुख, समृद्धि नि संतति देवो !

इतर सर्व--तथास्तु !

[ त्रिवेणीबाई आपल्या गळ्यांतील चंद्रहार मैनेच्या गळ्यांत घालून बोकांवरील दागिन्यांतील कंठी रघुनाथाच्या गळ्यांत आणि सलकडीं पिन्याच्या हातांत घालतात, तों शेवटचा पडदा पडतो. ]

---

[ ८ ]

# सवाई राव !

## अंक पहिला

### प्रवेश पहिला

स्थळ--कस्तुरी नायकिणीच्या घरपुढील रस्ता.

( गजी लगबगीनें घरांतून बाहेर येते, समोर पहून थबकून उभी रहाते, व मागें वळून घरांतील तान्यास टाळी वाजवून खुण विते. )

गजी--तान्या ! अरे तान्या ! ( तान्या प्रवेश करिता. ) ती बघ, अच्चुतरावांची स्वारी इकडेच येते आहे ! बाईसाहेब बाहेर गेल्या आहेत, म्हणून लागून, बाहेरल्या बाहेर रवानगी करावयाची त्यांची ! नि कालच्यासारखी

आंत घुसलीच स्वारी, तर म्हणावं, दोन उंदीर पडले रात्रीं. नाहीं तर गांठ आली आहे मांजराला! समजलास?

तान्या—( हंसत ) हा! हा! हा! गजाई, अग असून वि लांडी बात करायला नाहीं शिकलों मी, ह्या कस्तुरीबाई नायकिणीकडे चाकरीला राहून? मग शिकलों तरी काय इथं? ती बघ, आलीच स्वारी इथं! जा. जा आंत बेगुमान! ( गजी जाते; अच्युतराव प्रवेश करितो; त्याच्या-पुढें छाती काढून जाऊन ) बाईसाहेब कुठं बाहेर गेल्या आहेत, साहेब!

अच्युतराव—अस्सं! अस्स! पण कायरे, बक्षिसी काय मिळणार आहे तुला?— ही थाप ठोकण्याबद्दल?

तान्या—थाप! साहेब!

अच्युतराव—थाप नाहीं तर? बावळा कुठला! मीं येऊन चवकशी केल्यावर नीट सावकाशीनं तरी ही थाप ठोकायची? पण तुला धीर कुठला? धनिणीच्या शिकवणीची थाप ठोकून केव्हां एकदा मोकळा होईनसं झालेलं तुला? नाहीं तर, असा छाती काढून चालून येऊन धनिणीला ऐकूं जाईल इतक्या मोठ्यानें ' बाई बाहेर गेल्या आहेत '—म्हणून ओरडतास?

तान्या—वा जी साहेब! इथं रस्त्यावर किती घसा फोडून ओरडलों मी, तरी मागल्या माडींत बाईना कसं ऐकूं जाईल? बाईचे कान का इतके लंबे आहेत इथं पोंचयाला?

अच्युतराव—( त्याचा कान पकडून ) अस्सं! बोल, कोण गृहस्थ बसला आहे कस्तुरीशीं ह्या वेळीं मागल्या माडीत?—नाहीं तर, बघ कान चांगलेच लंबे करतों तुझे?

तान्या—अरेच्या मन! पण बाई मागल्या माडींत दिवाणखान्यांत आहेत, म्हणून कुणा लेकानं म्हटलं?

अच्युतराव—( दोन्ही कान धरून ) मला ओळखतोस पोरट्या? बोल, कोण गृहस्थ आहे तिच्याजवळ मागल्या माडींतल्या दिवाणखान्यांत?

तान्या—गृहस्थ कुणी–कुणी बि नाहीं साहेब! तो त्या सखाईरावचा लांब डगल्याचा पोऱ्या आला आहे चिठ्ठी घेऊन तेवढाच! ( अच्युतराव कान सोडतो ) कान बचावले, पण चाकरी गमावलीच, साहेब!

अच्युतराव—सवाईराव !—बघ पोऱ्या ! माझं काम करशील, तर नाहीं येत ह्या वेळीं मी आंत ! नि मग खरं फोडलंस, म्हणून तुझ्या धनिणी-लाही कांहीं कळणार नाहीं; नि तुझी चाकरीही जाणार नाहीं !—बघ, कर-तोस माझं काम ?

तान्या—बोला—बोला की साहेब ! काय सांगाल, तें करतों बघा !—पण ह्या भाकरीला नका मुकवूं तान्याला !

अच्युतराव—काय करायचं तें सांगतों तुला ! पण आधीं इतकं सांग —हा गृहस्थ—सवाईराव,—रोज येतो का तुझ्या धनिणीकडे ?

तान्या—जी साहेब ! अगदीं रोज ! एक दिवस चुकला, कीं बाई वेड्यावाणी होते कीं !

अच्युतराव—असं ! मग तो कुणाचा कोण, कुठेसा राहतो, ठाऊक असेलच तुला ?

तान्या—नाहीं साहेब ! तेवढं नाहीं ठाऊक मला ! इथं कोण माणसं कुठून येतात, कुठं जातात, माझ्या बाच्यानि तरी सांगवल ? आभाळांत पाखरं कुठून येतात, कुठं जातात, देवाच्या बाला तरी सांगवल ? पंढरीला वारकरी कुठून येतात, पंढरीनाथाला तरी सांगवल ?

अच्युतराव—बरं—बरं ! मग असं कर, तो पुन: इथं आला, कीं येऊन कळीव मला ! करशील इतकं ?

तान्या—नाहीं साहेब ! तेवढं बरीक नका सांगूं मला ! आपली नि त्याची गांठ पडली, तर त्या गोंधळांत, लाथा मिळतील मला सुकाळ !

अच्युतराव—बघ ! नाहीं तर, हा असा कान धरून नेतों तुला आंत कस्तुरीकडे ! ( कान धरूं पहातो, तों तो मुरकांड्या देतो ).

तान्या—कबूल ! कबूल साहेब !—पण कुठंसं कळवूं आपल्याला येऊन ?

अच्युतराव—ठीक !—गृहस्थाश्रमांत कळीव येऊन ! ( पैसे देतो ) हे घे तुला बक्षिस ! नि इमानाला जागलास, तर आणखीही तुला दसपट देईन, समजलास ?

तान्या—पहा तर खरं साहेब, ह्या तान्याचं इमान !—बरं, रामराम. ( घरांत जातो. )

अच्युतराव—( स्वगत ) निमकहराम कमबीणींची जात ! कसबिणी, नायकिणी, सामान्य वेश्या,—सगळ्या एका माळेच्या मणि ! सर्पाला नाग म्हटलं काय, फणि म्हटलं काय, किंवा भुजंग म्हटलं काय,—कांहींही म्हटलं, तरी तो आपला जातिस्वभाव टाकीत नाहीं ! विषाला गरल, जहर किंवा हलाहल वगैरे कांहींही नांवें दिलीं, तरी तें विषच ! ह्या वेश्यांना कलावंतिणी म्हणा, वारांगना म्हणा, अथवा नर्तकी म्हणा, त्या आपला स्वभावधर्म कालत्रयीं विसरणें शक्य नाहीं ! ' रंग फिरुनि भुलविता जणू दात फेकुनी !'—हाच अनुभव आला !—ह्या कस्तुरानं माझा शोक चांगलाच जिरविला एकूण ! हिच्या मोहजालांत सांपडून सर्वस्वाला गमावून बसलों आज ! नि तें सर्वस्व माझं स्वतःचं ,—वडिलार्जित तरी असतं, तर असो ! स्त्रीधन,—पवित्र स्त्रीधन,—पत्नीला आंदण मिळालेली शेतवाडी—त्या लक्ष्मीला—ह्या बाजार-बसवीला बक्षिस देऊन बसलों मी ! आतां ह्या सटवाईला, नि तिच्या त्या बगईरावाला गाठून, सूड—सूड—खासा सूड उगविल्यावांचून समाधान नाहीं वाटणार जीवाला ! ( जातो )

## प्रवेश दुसरा

स्थळः—लक्ष्मीच्या दिवाणखान्यांतील एक दालन.

[ लक्ष्मी पत्र वाचीत उभी आहे, असा प्रवेश ]

लक्ष्मी—( स्वगत ) प्रारब्ध नीट असलं, तरच संसारांत सुख लागत असतं;—ह्या गोष्टीचा माझ्यासारख्या पुष्कळ जणींनाच अनुभव आला असेल ! —पण आपण ' प्रारब्ध ' ' प्रारब्ध ' म्हणून म्हणतों, तें आपल्या अनेक जीवनांत आपण पूर्वी केलेल्या प्रयत्नच नव्हे का ? पूर्वीचा प्रयत्न, तें सध्याचें प्रारब्ध ! सध्याचा प्रयत्न, तें पुढील प्रारब्ध !—अशा रीतीनं हे प्रयत्न-प्रारब्धाचें कोडं मी आपल्यापरीनं सोडवून, माझं पुढील प्रारब्ध तरी नीट व्हावं म्हणून ह्या धाडसाच्या प्रयत्नाला लागलें आहे ! माझ्या पतीचें चित्त आणि वित्त हरण करणाऱ्या, आमच्या सुखाची राखरांगोळी करणाऱ्या त्या कस्तुरी नायकिणीला मी पुरुषवेषांत, बगाईराव बनून, आपल्या नादीं लावलं आहे !—ह्या प्रयत्नांत मला यश येणार असं ह्या तिच्या आजच्या पत्रावरून मला कां नये वाटूं !

[ ठुशी प्रवेश करिते. ]

ठुशी—काही तरी आनंदाची बातमी दिसते आहे त्या पत्रांत ! होय ना बाईसाहेब ? तिकडून अच्युतरावसाहेबांकडून तर नाही आलेलं पत्र ?

लक्ष्मी—नाही ग ! स्वारीच्या अंगवस्त्राकडून–कस्तुरीकडून–ह्या सवाईरावांना आलं आहे हं !–वाचून दाखवितेंच तुला ! ऐक !–(वाचते) " हृदयेश्वर सवाईराव, माझ्या प्रेमाचा मोबदला अद्यापही आपणांकडून होऊ नये इतके निष्ठुर आपण खरोखरच व्हावं ना ? त्यांतल्यात्यांत आपण मला दर्शनसुख तरी देत होतां, हें मी आपलं भाग्य समजत होतें ! पण काल तेंही लाभलं नाहीं ! आज तरी येऊन दृष्टिमुख व्हाल का ? मग त्याहून श्रेष्ठ सुखाचा लाभ होणें, केव्हां घडेल तो सुदिन ! आपणासाठीं अहर्निश झुरणारी, आपल्या चरणांची दासी, कस्तुरी."

ठुशी—या जी सवाईराव ! आपण तिला अगदीं वेडीकरून टाकली आहात, बाईसाहेब ! इतकी कशी बाई तिच्यावर मोहनी टाकली आपण ?

लक्ष्मी—मोहनीच नाहीं तर काय ही !–अग ठुशे, आपण बायका किनई अगदीं भोळ्या ! कुणी आपल्या रूपागुणांची नांवाजणी केली, की आपण त्याच्याकरितां काय वाटेल तें करूं ! स्त्रीस्वभावांतलें हें व्यंग पुरुषांना पुरं कळलं; नि त्याचा ते उपयोग करून घेतात ! आपणावर त्यांची जी सत्ता चालते, नि त्यांच्याकरितां आपण ज्या प्राण द्यायला तयार होतों, त्या ह्याच त्यांच्या ज्ञानावर ! हेंच ज्ञान म्हणजे मोहनी ! हिचाच प्रयोग मी सवाईराव बनून कस्तुरीवर केला, दुसरं काय ?

ठुशी—पण बाईसाहेब, एक कस्तुरीचं मन अच्युतरावांवरून उडविलंत, नि आपल्यावर बसवून घेतलंत खरं ! पण ह्या शहरांत दुसऱ्या नायकिणी–कसबिणी का थोड्या आहेत ? कस्तुरी नाहीं, तिची बहीण ! स्वारी आपला छंद असाच चालू ठेवील ! मग काय–सगळ्या वेश्यांची घरं धुंडाळायची आपण ?–नि त्यांच्यावर आपली मोहनी चालवायची ?

लक्ष्मी—तें का शक्य तरी आहे ठुशे ? हल्लीं मी करत्यें आहे, तेंच थोडं नव्हे ? घरांतल्या बायकांना चुकवून, रात्रीं बेरात्रीं पुरुषाचं सोंग घेऊन, एका बाजारबसवीकडे जात्यें, नि तिला आपल्यासाठीं वेडी करित्यें, हेंच अधिक नव्हे ? हें माझं करणं जगाला कळलं, आपल्या गांवीं ह्याची वार्ता

गेली, तर मला केवढीं दूषणें सोसावीं लागतील ! तीं सोसांयलाही मी तयार झाल्यें ! आणखी जास्त तें मी काय करणार ? ह्याउप्पर दुसऱ्या कलविणीकडे जाऊन स्वारीनं आपला छंद पुरविला, तर निरुपाय माझा !—पण ह्या कस्तुरीला मी आपल्यासाठीं वेडी बनवून, तिच्याकडून तेवढी ती शेतवाडी,—माझं स्त्रीधन,—स्वारीनं तिला बहाल करून टाकली आहे ती, काढून घेतली,—इतकं साधलं; तरी माझ्या धीटपणाचं चीज झालं !—असं नाहीं का होणार ?

ठुशी—खरंच बाईसाहेब ! इतकं साधलं, तरी पुष्कळ !

लक्ष्मी—मुदैवानें आणखीही साधणार नाहीं म्हणून कुणी सांगावं ? आपण जिला आपलं चित्तवित्त वाहिलं, तिनं बेइमान होऊन दुसऱ्यावर,—म्हणजे ह्या सवाईरावावर आसक्त व्हावं,—हें स्वारीला दिसलं, नि हा वेश्यांची जात कशी निमकहराम असते, ह्याचा अनुभव आला, कीं स्वारीचीं पावलें घराकडे—आपल्या गावाकडे वळून, मला पुन: त्यांची प्राप्ति होणार नाहीं म्हणून कशावरून ?

ठुशी—देव करील, तर तसंच होईल, बाईसाहेब !

[ राघव प्रवेश करितो ]

राघव—मोठा प्रसंग टळला आज बाईसाहेब !

लक्ष्मी—काय, झालं तरी काय, राघव ?

राघव—आपला—सवाईरावचा हुजऱ्या बनून त्या कस्तुरीकडे गेलों, नि तिचं पत्र आपल्याला हें आतांच आणून दिलं; आणि मग माझा नित्याचा पंचा बारावंदी चढवून बेला शेटकडे तूप आणायला गेलों ! तों काय ?—बेलाशेटच्या दुकानासमोरच्या त्या 'गृहस्थाश्रमा'तून धन्यांची स्वारी,—अच्युतरावसाहेबांची स्वारी,—मजकडे पहात, मला न्याहाळीत माझ्या पुढ्यांत येऊन ठेपली ! 'राघव !—अरे तूं कसा इथं ?'—स्वारीनीं मला हटकलं ! काय करावं, घाबरून गेलों ! ओळख दिली, कीं आपण इथं आल्याचं कळणार, नि मग बेंड फुटणार !—पण नामी कल्पना सुचली एक !

लक्ष्मी—काय, काय केलंस ?

राघव—चंद्रू ! यंद्रू ! इल्ला!—करून कानडी अप्पाची बतावणी केली !

लक्ष्मी—( हंसत ) शाबास राघव !

राघव—पुन: स्वारी मजकडे न्याहाळून पाहूं लागली ! ' अरे काय, तूं आमचा राघवभट नव्हेस ?'—स्वारींनीं विचारलं ! पुन: मी 'अप्पा ! हुक्का ! गंडू यंडू !'—करुन हातवारे केले ! त्यावर स्वारींनीं हंसत पाठ फिरवली !—आणि मी उभ्या पावलीं हा परत आलों !

लक्ष्मी—संकटच टळलं हें एक ! तूं आहेसच तसा नकल्या !—म्हणूनच निभावली वेळ !—अशीच एक नक्कल करशील, राघवा, मी सांगतें ती ?

राघव—कोणाची ?

लक्ष्मी—माझ्या मामांना पाहिलें आहेस, नाहीं तूं ?

राघव—मामासाहेबांना ! वा, पाहिले आहेत म्हणजे ? त्या वर्षी नव्हते का आपल्या घरीं आले ते ? त्या स्वारीला एकदा पाहिल्यावर कोण त्यांना विसरेल ? कंबरेची कमान झाली असूनही त्यांचा तो ताठ जवानासारखं चालण्याचा आटोकाट प्रयत्न; तोंडांत खोट्या दातांची बत्तिशी असूनही ती खऱ्या दातांची भासविण्याकरितां केलेलें दाढ टणकण्याचें मिष; त्या टप्पूऱ्या कल्लेदार मिशा, नि त्यांचा तो कल्प; तारुण्याचे सगळे ढंग ह्या वार्धक्यापर्यंत आणून पोंचविण्याची त्यांची बहाद्दरी; हीं सगळीं—सगळीं ठाऊक आहेत मला !

लक्ष्मी—बाई--बाई ! तुला तर त्यांची पुरी माहिती दिसते !—त्याशी नक्कल करशील त्यांची ! घेशील का त्यांचं सोंग घटकाभर ?

राघव—वा ! न घ्यायला काय झालं ! आपला कार्यभाग होत असेल, तर एकदां सोडून एक सहस्रदां सोंग आणीन त्यांचं !

लक्ष्मी—ठीक ! सांगत्येंच तुला आतां काय करायचं तें ! एवढं सोंग नीट आणलंस, तर कस्तुरीच्या हातून ती सगळी शेतवाडी, नि तिकडची स्वारी, माझी मला पुन्हां लाभलीच म्हणून समज ? ( जातात. )

## प्रवेश तिसरा.

स्थळ, कस्तुरी नायकिणीच्या घरांतील दिवाणखाना.

( कस्तुरी व गजी प्रवेश करितात. )

कस्तुरी—एकूण, स्वत: सवाईराव नाहींच दृष्टीस पडले तुम्हा ?

गजी—छे बाई ! ते वाटतं, आंत कुठं बसले होते ! त्यांच्या कुणाबिणीनं

निरोप आणला आंतून, कीं साहेब आतां इतक्यांत येतील तिकडे !–म्हणून कळीव आपल्या बाईसाहेबांना !

कस्तुरी—बरं जा, नि खालीं बैस !

गजी--जी होय ! ( जाते )

कस्तुरी—( स्वगत ) चमत्कार नाहीं बाई ! ज्या पत्रांत मी आपलं सारं अंतःकरणच ओतून पाठविलं, त्याचं उत्तर हें असं तोंडच्या निरोपावर यावं !–पण चमत्कार तरी कसला ? सवाईरावांचं हें नेहमीं असंच ! आपलं प्रेम मी इतकं उघड करून दाखविल्यें आहे, पण त्याचा मोबदला त्यांच्या कडून काडीभर तरी झाला आहे कां आजपर्यंत ? नाहीं म्हणावं, तर मज-वर मोहित झाल्यासारखं दाखवितात ! पण माझ्या हातची पट्टी घेण्या-पलीकडे किंवा एखादी चीज ऐकण्यापलीकडे मजला गेली आहे कधीं त्याची ! —हें मनांत आलं, कीं अंगाची अशी लाही होते; नि वाटतं नांवच टाकावं त्यांचं !

लक्ष्मी—( माडीखालून ) काय—घर—मागल्या दिवाणखान्यांत आहे !

कस्तुरी—बाई, आलेच ते ! त्यांचा नुसता आवाज ऐकला, कीं हृदय मोहून जातं ! (आरशांत पाहून) फुलांची वेणी घालून येत्यें आतून ! (जाते)

[ गजी व तिच्या मागून पुरुषवेश घेतलेली लक्ष्मी प्रवेश करितात. ]

गजी—अं ! इथं नाहींत बाईसाहेब !–बसावं आपण साहेब ! आंतल्या खोलींत गेल्या असतील त्या ! मी कळवित्यें त्यांना आपण आल्याचं !(जाते)

लक्ष्मी—( स्वगत ) आतां तिकडच्या स्वारीच्या ह्या प्रेमपात्राच्या प्रिय-कराची बतावणी करायची ! स्वारीच चित्त–वित्त हरण करून मला सर्व-स्वाला मुकविणाऱ्या ह्या कलाविणीशीं प्रेमालाप करून तिला आपल्या मुठींत आणायची ! नि पतीनं तिला बक्षिस दिलेली ती शेतवाडी,–माझं पवित्र स्त्रीधन–परत मिळवायचं !–बाई, याहून दुर्घट काम जगांत दुसरं असेल का ?–पण देवाची कृपा नि माझं पतिव्रतेचं सामर्थ्य ह्यांच्या जोरावर ही लक्ष्मी तेंही करूं शकेल !–असं माझं मन मला सांगत आहे !—कसंही करून ह्या नटवीपासून तेवढं तें बक्षिसपत्र हस्तगत करून घेतल, कीं अर्धं-अधिक काम झालं !—मग बाकीचं !—पण ही आलीच !–आतां नाटकी

बतावणीला आरंभ ! ( कस्तुरी प्रवेश करते, तिला आलिंगन देऊन ) ओ हो हो ! म्हटलं, किती राग झाला असेल, नि किती नाहीं—आमच्या मनोहरणीचा आमच्यावर !

कस्तुरी—मनोहरणी—मनोहरणी— तोंडानं म्हणायचं इतकंच ! पण त्या मनाचं खरं हरण झालं आहे कुठं मजकडून अद्याप ? तसं असतं, तर काय —इथं येऊन, पायधूळ झाडायला ही अशी मनधरणी करावी लागली असती का इकडची ?

लक्ष्मी—वा ! तूं आपला दासानुदास तर करून टाकला आहेस, ह्या सवाईरावाला ! आणखी तें कसं माझं मन हरण करायचं ! आतां, माझं प्रेम मला तुझ्याप्रमाणें बोलून दाखवितां येत नाहीं, हें मात्र खरं ! तेवढं येतं, तर बस्स ! तुझ्या प्रेमावांचून बातच बोलता ना हा सवाईराव दुसरी कसली !

कस्तुरी—हो ! प्रेमाचीं हीं नुस्तीं मानभावी बोलणीं ! करणीच्या नांवानं आवळ्या एवढं पूज्य ! बाई, माझंच मन वेडं ! कोणच्या जादूनं तें मारून घेतलं आहे आपण, आपणच जाणें ! पुरुषांची जातच अशी मायावी नि मतलबी ! दुसऱ्याचं तेवढं घ्यायची ! आपलं रतीभर नाहीं द्यायची !

लक्ष्मी—काय ! माझ्याविषयीं हे शब्द ! मलाही ह्या सगळ्या पुरुषां-पैकींच लेखतेस तूं ?

कस्तुरी—पुरुष होऊन सगळे सारखे ! सोंगाडे नि बेइमान ! नि त्यांत, आपण तर काय, धंद्यानंच नाटकी !

लक्ष्मी—पण स्त्रीनट आहे मी ! पुरुषनट नव्हे कांहीं !

कस्तुरी—म्हणजे एकूण नटवेच किनई ?

लक्ष्मी—कस्तुरी, तुझा हा असा विक्षिप्तपणा पाहिला कीं माझं मलाच आश्चर्य वाटतं, माझं तुझ्यावरचं प्रेम इतके दिवस टिकलं तरी कसं ! ह्या असल्या विक्षिप्तपणानंच त्या अच्युतरावांच्या डोळ्यांत अंजन भरलंस, नि त्यांचा शोक जिरविलास, नाहीं का ?

कस्तुरी—बाई, कुणी सांगितलं आपल्याला हें ? अच्युतरावांचा शोक असा जिरणारा नव्हे हो ? त्यांची सर कुणाला येणार आहे ?

लक्ष्मी—काय—अच्युतरावांचा शोक जिरला नाहीं म्हणतेस ? अगदीं पूर्ववत आहे त्यांचं तुझ्यावर प्रेम ?

कस्तुरी—म्हणजे ! बाई तें कशानं कमी होणार ?

लक्ष्मी—अस्सं ! एकूण, होतं तसंच आहे तुझ्यावर तें !

कस्तुरी—( स्वगत ) मत्सर वाटूं लागला स्वारीला ! आहे अजून जागा आहे आशेला ! ( उघड ) प्रेम करावं अच्युतरावांनींच ! माझ्या-साठीं त्यांनीं आपल्या रूपवान नायकोलाही सोडली ! हें गेलं सारं वर्ष त्यांनीं आपलं गांव सोडून, इथं ह्या शहरांत माझ्याकरितांच काढलं नाहीं का ?

लक्ष्मी—किती–किती निंद्य हें !

कस्तुरी—पण बाई, माझं कुठं आहे त्यांच्यावर प्रेम ? असल्या गबा-ळ्यावर कुणाचं प्रेम बसेल ?

लक्ष्मी—काय !–अच्युतराव गबाळ ?–मीं पाहिले आहेत त्यांना ! त्यांना पाहून कुणीही मोहीत व्हावं, असं रूप आहे त्यांचं !

कस्तुरी—बाई, आतां आपण स्तुतिस्तोत्रं गाऊं लागलां त्यांचीं ! क्षणा-पूर्वींचा मत्सर गेला कुठें आपला ?

लक्ष्मी—तें असं आहे बघ, कस्तुरी ! प्रेमातिशयामुळें जसे आपल्याला प्रेमविषयांत नसतेच गुण दिसतात, तसंच किनई मत्सरातिशयामुळेंही होत असतं ! मला त्या अच्युतरावांचा किती मत्सर वाटतो आहे, त्याची तुला कशी कल्पना येणार ? ह्या मत्सराग्नीमुळें माझ्या अंगाचा जो भडका उडाला आहे, तो शमन करणें एका तुझ्या हातीं आहे ! त्या अच्युतरावांचं पुनः नांवही घेणार नाहीं, त्यांना आपल्या दृष्टिसमोरही उभे राहूं देणार नाहीं,–अशी शपथ घेऊन माझा हा दाह शांत करशील का ? ( स्वगत ) थोडक्यांतच बचावलें ! नाहीं तर फसल्यें होतें !

कस्तुरी—ही वहात्यें तशी शपथ ! त्या अच्युतरावांचं इतःपर नांवही घेणार नाहीं ! नि त्याला आपल्या घराची पायरीही चढूं देणार नाहीं ! मग

तर झालं ?–इतकं झाल्यावर, मग तरी ह्या दासीला आपलीशी करायची ना ? नि गडे, आपण इथून जाऊंच कशी ! कधींचा करायचा निघण्याचा बेत !

लक्ष्मी—हें बघ, मीं तुला सांगितलंच आहे कीं, मी काहीं लक्ष्मीपुत्र नव्हे ! माझी सारी धनदौलत म्हणजे माझ्या मालकीची ही लक्ष्मी प्रासादिक नाटक मंडळी ! ती सुस्थितींत असावी, म्हणून मजजवळ होतं नव्हतं तें सगळं मी खर्चून बसलों आहे ! नि पडलों आहें सध्यां पेंचांत पैशाच्या ! तेव्हा, तेवढी ती,—अच्युतरावांकडून तुला बहाल झालेली शेतवाडा,–काय असेल नसेल ती एकदा विकून टाकून रोकड रक्कम उभी करीत असशील, तर मी तरी एकदां ह्या पैशाच्या पेंचांतून सुटेन कायमचा ! नि मग आपण चाललोंच वऱ्हाडांत,–मंडळी आहे तिकडे,–रहायला !

कस्तुरी—बाई, ती शेतवाडी फुंकून टाकायची तजवीज मी केव्हांच करून ठेवली आहे ! नि त्याचं खरेदीखतही उद्यां परवांच करून टाकीन म्हणत्यें मी !

लक्ष्मी—( स्वगत ) अग सटवाई ! एकूण राघवाकडून मामांचें सोंग आणविल्यावांचून तुझा घाट ढासळून पाडायला आतां मार्गच नाहीं दुसरा ! ( उघड ) पण ती जिनगी दिली आहे तुला अच्युतरावांनीं, ती त्यांची स्वतःचीच आहे ना ?

कस्तुरी—पण ही शंका तरी कां आली आपल्याला ?

लक्ष्मी— मीं काल ऐकलं, म्हणून विचारतों तुला ! म्हणतात कीं, खुद्द अच्युतरावांच्या मालकीच असं आतां कांहींच उरलेलं नाहीं !

कस्तुरी—म्हणजे ! त्यांच्या बायकोला आंदण म्हणून कांहीं शेतवाडी मिळालेली नाहीं, तिच्या मामांकडून. मामासाहेब कमानवाल्यांकडून ?

लक्ष्मी—छे ! मुळींच नाहीं, असं म्हणत होते एके ठिकाणीं !

कस्तुरी—मग मात्र आकाशची कुऱ्हाडच कोसळली !

लक्ष्मी—पण ह्या शंकेचें निरसन करून घ्यायला लाव नको जायला ! स्वतः मामासाहेब कमानवालेच इथं आले आहेत हल्लीं !—कालच भेटले होते मला ते ! त्यांना ओळखतेस ना तूं ?

कस्तुरी—बाई, होय तर !

लक्ष्मी—तुझ्या अ इकडे त्याचं येणं जाणं असे, म्हणून म्हणत होते ते !

कस्तुरी—बाई बाई ! भारी लोभ असे माझ्यावर त्यांचा ! अगदीं लेकीसारखा !—पण कुठं-कुठंसे उतरले आहेत ते ? त्यांना चिठ्ठीच लिहित्यें, यावं म्हणून ! नि पोऱ्याबरोबर देत्यें पाठवून !

लक्ष्मी—अग, मीच देईन चिठ्ठी त्यांना !

कस्तुरी—ठीक ! कध्धीं रहायचे नाहींत ते यायचे माझी चिठी वाचल्यावर !—तर गडे, लिहित्येंच त्यांना चिठ्ठी !—नि हें पहा, एक नामी कल्पना सुचली आहे मला, ही आतांच !

लक्ष्मी— काय ती ?

कस्तुरी—हे मामासाहेब म्हणजे प्रती राजे आहेत ! त्यांच्यावर मोहिनी टाकत्यें मी आपली—आहे नाहीं ती सगळी !—म्हणजे गडे, पैशाची वाणच नाहीं पडणार आपल्याला कधी ती ! कधीं न आटणारी गंगाजळीच लाभेल आपल्याला ही !—लिहित्येंच त्यांना चिठ्ठी !—अगदीं वाखर पेरुन लिहित्यें ! ( जातें ).

लक्ष्मी—( स्वगत ) अग कसबिणी ! हीं अशीं कसबं करून तूं पुरुषांना मुठींत आणत्येंस, नाहीं का ? तुझीं हीं कसबं पाहिली, कीं तुझ्यावर मी जो हा कपटप्रयोग करणार आहें, त्याबद्दल मला लवमात्रही वाईट वाटत नाहीं !—उलट आनंदच वाटतो ! कोणती गृहिणी—कोणती विवाहित स्त्री त्याबद्दल मला दूषण देईल ?

( अंकाचा पडदा पडतो. )

## अंक दुसरा

### प्रवेश पहिला

स्थळ, गृहस्थाश्रमांतील अच्युतरावांचें बिऱ्हाड.

[ अच्युतराव पत्र फाडून टाकीत आहेत. ]

अच्युतराव—( स्वगत ) फुकट-फुकट होय हें असलं पत्र मीं लक्ष्मीला लिहिणं ! मीं कितीही लिहिलं तरी तिला आंदण मिळालेली शेतवाडी मीं ह्या वेश्येला देऊन टाकली, ह्याबद्दल तिच्या अंत:करणांत जी आग पेटली

असेल, ती यत्किञ्चित् तरी कमी होईल का ? माझ्या दुष्कृत्याबद्दल मला पश्चाताप होत आहे, हें पाहून ती मला क्षमा करील कदाचित् !–पण तिला मीं सफाई बुडविलं, जीवन–धारणेपुरतंही अन्न ठेविलं नाहीं, ह्याची काय वाट ?–अरेरे ! ह्या वेश्येच्या सैतानी पाशांत सांपडून ह्या साध्वीशीं, माझ्या धर्मपत्नीशीं मीं जो हा अधमाधमपणा केला, त्याबद्दल मला शासन करायला कुणी नाहीं का ? माझ्यासारख्या धर्म–भ्रष्ट पातक्याला समाजानं कां नये देहान्त शासनही करूं ?

[ तान्या प्रवेश करितो. ]

तान्या—साहेब–साहेब !

अच्युतराव—कायरे–काय पोऱ्या ?

तान्या—साहेब, ते सवाईराव आतांच भेटले बघा रस्त्यांत ! कस्तुरीबाई घरांतच आहे ना, म्हणून विचारलं मला त्यांनीं ! स्वारी तिकडे–आमच्या तिकडंच जाणारसं दिसतं ह्यावरून ! नि म्हणून आलों बघा तडक आपल्याला कळवायला !

अच्युतराव—शाबास तान्या ! बरं कळविलंस मला !

तान्या—इमानाला जागायला हवंच ! नको का ? आपल्यासारख्या इनामदाराशीं माझ्यासारख्याला इमानदारीनं वागायला हवंच ! नाहीं तर, कसलं माझं इमान !–नि कसलं मिळणार मला इनाम आपल्याकडून !

अच्युतराव—खरंच–खरंच !–हे घे तुझं इनाम ! ( कांहीं पैसे देऊन ) नि जाऊन तिथं दारावर माझी वाट पहात बस !

तान्या—जी हो !–बसलोंच जाऊन समजा ना !–रामराम !–( जातो )

अच्युतराव—( स्वगत ) निदान सूड तरी खासा उगवितां येईल हा ! त्या निमकहराम कसबिणीला, नि तिच्या ह्या नव्या आपकाला एकत्र गांठून करतोंच त्यांचा कपाळमोक्ष !–आधीं त्याचा, नि मग तिचा !–पुढें कांहीं का होईना माझं ?– सूड घेतल्याचं तरी सुख खासें मिळतें, तें कां गमवा ?

( जातो )

## प्रवेश दुसरा

स्थळ, कस्तुरीच्या घरांतील दिवाणखाना.

[ कस्तुरी व पुरुषवेषधारी लक्ष्मी प्रवेश करितात. ]

लक्ष्मी—तो पहा मामासाहेब कमानवाल्यांचीच गाडी !

कस्तुरी—आले बाई ! माझी चिठ्ठी कांहीं फुकट नाहीं गेली !

लक्ष्मी—खरंच ! नि म्हणून ह्या वेळेचा शक्य तितका उपयोग करून घेतला पाहिजे, समजलीस ?–पण मी नाहीं बसत इथं ! मामासाहेबांशीं तूं आतां ज्या शृंगारचेष्टा करणार त्या ह्या सवाईरावाला कांहीं पहावणार नाहींत, त्या मायावीच आहेत हें मला ठाऊक असूनही !—तेव्हां, ह्या पलीकडल्या खोलींत बसतों जाऊन मी ! ( स्वगत ) राघवा, आतां तुझ्या वर्तावणीवर ह्या लक्ष्मीचं भावी सुख–दुःख अवलंबून आहे सगळं ! ( जाते )

कस्तुरी—( स्वगत ) हा प्रणयमत्सर किती सुखाचा वाटतो आहे मला ! ( लक्ष्मीस मोठ्यानें ) त्या खोलींतच बसलेलं असावं गडे ! ( समोर पाहून ) ही आलीच स्वारी मामासाहेबांची !

[ मामासाहेब कमानवाल्यांच्या वेशांत राघव व एक खिजमतगार प्रवेश करितात. ]

राघव—( खिजमतगारास ) हं !–आधीं ने गाडी परत बिऱ्हाडीं, नि नीट गिर्द्या घालून घेऊन ये !–अंग दुःखूं लागलं कसं अगदीं !–गडे, गिर्द्याच घ्यायला विसरले ! ( खिजमतगार जातो )

कस्तुरी—यावं मामासाहेब !

राघव—पोरी, अग नीट भेटूं दे तुला अशी ! ( तिला कवटाळून ) अहाहा ! केवढा आनंद झाला मला, पोरी तूं भेटल्यानं ! ( कस्तुरी त्यास हातीं धरून लोडाशीं बसविते ) ठीक ! किती वर्षांनीं भेट होत आहे तुझी आज ही !

कस्तुरी—बारा वर्षं झालीं, मामासाहेब !

राघव—हो ! उणींपुरीं बारा वर्षं झालीं ! तेव्हां तूं किती लहान !—अगदींच लहान !–मोठी तुझी आई ! ( निश्वास सोडून ): ताराबाईच्या मागें आतां तूंच [illegible] आम्हांला, तिच्या ठिकाणीं झालं !–अरे–पण ती मोहन-

माळ-( खिसे चांचपून )-काय करणार ! विसरलोंच शेवटीं बरोबर घ्यायला ! तुझ्याकरितां काढून ठेवली होती बाहेर ! म्हटलं, बरोबर घेईन !-पण हें असं होतं पोरी अलीकडे !-शेवटीं बिऱ्हाडींच राहिली ती !

कस्तुरी—त्याचं काय मोठंसं मामासाहेब ! मी ही-गजीला पाठवित्यें आपल्या बिऱ्हाडीं, नि आणवित्यें ती ! ( हांक मारून ) गजाऊ !

राघव—नको-राहूं दे ! आतां नको ! उद्यां येईन घेऊनच झालं, !

कस्तुरी—( लडिवाळपणें ) मग उद्यां मात्र विसरायची नाहीं हं मामासाहेब !

राघव—नाहीं विसरत ! खास आणतों ! ( तोंड वेडेंवाकडें करीत ) आ ! दाढ ठणकूं लागली आहे आज !

कस्तुरी—बरे पण बाई, दांत जसेच्या तसे आहेत अझून आपले !

राघव—अगदीं जसेच्यातसे !-नसायला ग काय झालं ?

कस्तुरी—तरी पण प्रकृति खराबच झाली आपली-ह्या बारा वर्षांत !

राघव—चाललंच आहे ! तुझी आई गेली-ते दिवस गेले !-त्या रात्री गेल्या !-त्या बैठकी !-तीं अलोचन जाग्रणं ! ते नाचरंग !-गेलें सारें !-भूतमात्राचा निद्राकाळ, तो आमचा जागृतिकाळ; नि त्यांचा जागृतिकाळ, तो आमचा निद्राकाळ ! असे योगीच आम्हीं !-गेला तो काळ !-तरी पण पोरी, तसा म्हणण्याजोगा फरक नाहीं झाला माझ्यांत हो अझून ! हल्लींच्या भर उमेदींतल्या पोरांना काहीं आम्हीं हटायचे नाहीं अझूनही !

कस्तुरी—( हसून ) खरंच मामासाहेब ! आपली गोष्ट कशाला हवी ? आपली सर का कुणाला येणार आहे,-कुणी झालं तरी ?

राघव—तो अच्युतराव-आमच्या भाचीचा नवरा !-तो येत असतो म्हणतात तुझ्याकडे ?-हो, असं ऐकलं काल ! नि असं कांहीं वाटलं म्हणत्येस !

कस्तुरी—पण आपल्याला तसं वाटून घ्यायला कारणच नाहीं ठेवलं मीं, मामासाहेब ! त्यांना मीं आपली पायरीच बंद करून टाकली आहे अलीकडे ! अशा गृहस्थाला आपली भाची कशीं दिलीत, नवलं वाटतं मोठं ! नि वर, आंदणही रगड,-चांगली शेतवाडी दिलीत म्हणे !

राघव—छे ! आंदणबिंदण कांहीं नाहीं दिलेलं मीं !

कस्तुरी—म्हणजे बाई ! साताऱ्याकडची सगळी शेतवाडी नाहीं का दिली आपण त्यांना ?

राघव—कधीं ती ? अच्युतराव म्हणाला कीं काय तुजजवळ तसं ?

कस्तुरी—नुस्ते म्हणालेच नाहींत, लेख आहे मजपाशीं त्यांचा तसा ! ती सगळी जिनगी त्यांनीं मला बक्षिस दिली आहे !

राघव—बक्षिस दिली ! काय, म्हणतयेस तरी काय पोरी !–अग, अगदीं साफ फसवलं त्यानं तुला !–बघूं–आहे कुठं तें बक्षिसपत्र त्याचं ? ( कस्तुरी कपाट उघडते ) पक्कीच ठकवेगिरी केली त्यानं !

कस्तुरी—हें पहा ! हेंच तें बक्षिसपत्र ! ह्यांत त्यांनीं ती सगळी जिनगी मला वहाल केली आहे ! ह्या कागदाला मी जिवापलीकडे जपत्यें आहें ! नि म्हणून हा कुणाच्याही हातीं दिला नाहीं आजवर मीं ! हें पहा,–वाचाव्या ह्या जमिनीच्या चतुःसीमा ! ( बक्षिसपत्र राघवापुढें धरते. )

राघव—आरशी लावूं दे ! ( आरशी लावून वाचतो )—“ दक्षिणेस कृष्णानदी, उत्तरेस यवतेश्वराचा डोंगर, पूर्वेस महाबळेश्वर अरण्य—” नकोच वाचायला पुढं ! ठकवलंच तुला त्यानं !

कस्तुरी—म्हणजे !

राघव—म्हणजे काय ? अग हीच माझी सातारा प्रांतांतली जमीन ! ही माझी मजकडेच आहे आजतागायत ! ही मीं कुणाला आंदणही दिली नाहीं, कीं खरेदीही दिली नाहीं !–काय !–काय म्हणावं ह्या ठकबाजीला ? माझी शेतवाडी वहाल करतो हा ठक ? हलवायाच्या घरावर तुळशीपत्र, ह्यांतलाच हा प्रकार !–आ ! दाढ ठणकते भारीच आज !

कस्तुरी—( स्वगत ) सत्यनाश होईल त्याचा ! मी मनांत मांडे खात्यें मीं ठकवलं त्याला म्हणून ! पण त्यानंच ठकवलं कसं मला !

राघव—त्या अच्युतरावाला हा असला सोन्याचा तुकडा,—ही साताऱ्याकडची शेतवाडी–मी आंदण देणार ? वेडबिड नाहीं लागलं मला ? –तें द्राक्ष अंजिराचे मळे, तीं, गव्हा–बाजरीचीं शेतं, ती आंबराई,—ही

सगळीं मी एका निराळ्याच माणसाला देणार म्हणतों आहें ! ठाऊक आहे पोरी, तुला तें माणूस ?

कस्तुरी—कोण–कोण बाई तें ! ( स्वगत ) निराशेंत हा आशेचा किरणच चमकूं लागला म्हणायचा !

राघव—सांगूं !–पण नाहीं ! तूं एक गोडसा देशील पाप्पा तेव्हां सांगेन पोरी ! ( कस्तुरी चुंबन देते ) हं ! आतां सांगतों तुला ! अग ही सगळी शेतीवाडी, नि सातारचा तो वाडा हीं तुझ्यावांचून दुसऱ्या कुणाला देणार मी ?—सांगायला हवं तुला !–अग, तूं माझीच पोरटी ना ! पण तुला कसें ठाऊक असणार म्हणा ! एक–आई असती तुझी, तर सांगती तुला !

कस्तुरी—पण खरंच का मला देणार ही आपली जिनगी ?

राघव—वेडी नाहीं तर ! खरंच तुलाच देणार आहें मी ! पाहिजे तर उद्यांच्या उद्यांच करून टाकूं ह्याचं बक्षिसपत्र !–मग तर झालं ?–अग त्या अच्युतरावाच्या ठिकाणीं मीच, असं समजायचं, दुसरं काय ?

कस्तुरी—अहाहा ! मामासाहेब, आपण मला खरोखरच जन्म दिलात, ह्यांत शंका नाहीं !–तर मग त्या अच्युतरावांच्या ह्या बक्षिसपत्राची मला आतां काय किंमत ? कवडीमोल चिटोरं मी हीं अशी फाडून टाकत्यें ! ( फाडते ) नि ह्या चिटोऱ्याच्या तुकड्याइतकीच इतःपर ह्या अच्युतरावाचीही किंमत लेखत्यें !

[ सवाईरावाच्या वेशात लक्ष्मी प्रवेश करिते. ]

लक्ष्मी—( स्वगत ) देवा ! खरोखर तुझीच कृपा ही !

कस्तुरी—( जवळ जाऊन, हलक्या स्वरांत ) खरंच, सवाईराव, म्हटलंत तसंच झालं ! अच्युतरावांनीं खरंच ठकविलं मला !–पण आपली मुद्रा ही अशी कां बरं झाली ?–मी आतां सर्वस्वी बुडाल्यें, आतां माझा त्याग करणार आपण ?–खास, असंच ! आपलं तोंड तिकडे फिरविलंत, ह्यावरून दिसतंच तसं !–खरंच ना मी म्हणत्यें तसं ?

लक्ष्मी—कस्तुरी, तुझी किनई मला कींव येत्ये !–भारी कींव येत्ये !

कस्तुरी—असं-असं ! प्रेमबीम सगळं मावळलं एकूण ? नि त्याचं रूपांतर आतां ह्या दयेंत झालं वाटतं !—बेइमान पुरुषाची जात !

अच्युतराव—( आंतून ) सोड वाट !-सूड ! सूड घेतल्यावांचून मी थोडाच रहाणार आज ? ( प्रवेश करून ) कुठं आहे—कुठं आहे तो सवाईराव ?—सटवाई, ज्याच्याकरितां माझ्याशीं तूं निमकहराम झालीस, तो हाच !—हाच नव्हे का ? कपाळमोक्षच करतों त्याचा ! ( लक्ष्मीच्या डोक्यांत खोडगें घालण्यास धांवतो, कस्तुरी त्यांस धरते, इतक्यांत लक्ष्मी आपल्या डोक्यांतील रुमाल व अंगांतील पायघोळ अंगरखा काढून त्याचे पाय धरते. )

लक्ष्मी—महाराज ! महाराज ! ह्या आपल्या लक्ष्मीचा खुशाल करा कपाळमोक्ष ! खराखुरा मोक्षच लाभेल मला त्यांत ! पतीच्या हातून मरण येणं, ह्या परतं मोक्षप्राप्तीचं दुसरं कोणतं साधन पत्नीला लाभणार ? लग्न-मंत्रांतल्या शपथा निष्फळ करून, जिचा जन्म आपण हा असा निर्माल्यवत् केला आहांत, त्या मला तरी निदान आपल्या हातून मृत्यु येणं, हाच मोक्ष !—हीच परमेशप्राप्ति !—हेंच परमेष्ट नव्हे का ?

अच्युतराव—( मटकन बसून ) अरेरे !

लक्ष्मी—( त्यास उठवून ) क्षमा व्हावी इकडून ! आपला हृदयभेद करणारे शब्द बोलल्यें, ह्याची क्षमा व्हावी ! आजवर आपण ह्या दासीला कशीही वागविलीत, तरी माझं आराध्यदैवत आपणच !—हेच पाय ह्या हृदयांत मी पुजल्यें आहे !—हें त्या सर्वसाक्षी परमेश्वरालाच ठाऊक !

अच्युतराव—पण ह्या अधमानें त्याची कशी फेड केली?—अन्नालाही मोताद करून ठेवलं आहे मीं तुला !

लक्ष्मी—नाहीं महाराज ! आपलं कांहींही गेलं नाहीं ! सर्व कांहीं होतं तसं आहे ! आपली सगळी शेतवाडी आपलीच आहे ! ज्या बक्षिसपत्रानं ती आपण देऊन टाकली होती, त्याचे ते पहा तुकडे ! ह्या राघवान मामांचं सोंग आणून, कस्तुरीच्याच हातानं त्या बक्षिसपत्राचे तुकडे केले !

अच्युतराव—काय !—ह्या सटवाईनं मला ठकवून लिहून घेतलेल्या बक्षिसपत्राचे हे तुकडे ?

लक्ष्मी—होय महाराज !—पण विला बोल लावण्यांत काय अर्थ ?

( कस्तुरीस ) याई माझं हें कपटनाटक तुला निंद्यच वाटणार ! पण गृहिणी म्हणून माझं कर्तव्य काय होतं, इकडची अर्धांगी, सहधर्मचारिणी म्हणून मी काय करणं अवश्य होतं, त्याचा नीट शांत चित्तानं विचार करशील, तर मला तूं क्षमाच करशील !—अशी माझी खात्री आहे !—नि आतां पुढं, आपलं कसं होईल, अशी तुला काळजी पडली असली, तर ही लक्ष्मी वचन देऊन सांगते, कीं हिनं जरी आज तुला फसविली असली, तरी पुढं तुम्हांही कधींही अंतर देणार नाहीं !

कस्तुरी—काय—खरंच—मी जागीच का आहे ?

लक्ष्मी—कस्तुरी, खरंच तूं जागी होशील, तुझं खरं स्त्रीत्व, तुझ्यांतला दैवी अंश, हीं खरंच जागीं होतील, तर किती बरं होईल ? खरं म्हटलं, तर तुझ्या रूप, माधुर्य, बुद्धि आदि निसर्गदत्त गुणांनीं तूं स्त्रीजातीला भूषण व्हावीस ! पण त्या गुणांचा अनीतिपोषणाच्या कामीं उपयोग केल्यानं स्त्रीत्वाला तूं कलंकभूत झाली आहेस ! कस्तुरी, जागी हो ! शुद्धाचरण हेंच आपलं स्त्रियांचं सर्वस्व ! त्याच्या पूजनाला लाग ! नि आजवर त्याला विसरलीस, म्हणून अश्रु ढाळ !

कस्तुरी—हें ब्रह्मज्ञान सांगून आपल्या ठकबाजीवर पांघरूण घालूं पहातां होय ? पण थांबा, कस्तुरी कशी आहे, तें दाखवित्येंच तुम्हांला ! हें इंग्रजी राज्य कायद्याचं राज्य आहे, हें विसरलांत वाटतं ? ह्या ठकबेगिरीबद्दल तुमच्यावर खटलाच करवित्यें, नि दाखवत्यें तुम्हांला ह्या कसबिणीचा इंगा ! ( जाते. )

राघव—जा ! खुशाल कर खटला ! हें राज्य कायद्याचं राज्य आहे, न्यायाचं आहे, म्हणूनच आम्हांला भिण्याचं कारण नाहीं ! शठाशीं शाठ्य केलं ह्यांत काय अन्याय केला !

अच्युतराव—केवढं तरी हें अचाट नाटक करावं लागलं तुला ! लक्ष्मी, मी तुला अजाण, बावळी समजत होतों ! पण तुझ्या ह्या कल्पकतेनं नि धाडसानं, मोठ्या कारस्थानी शहाण्यासुर्त्या पुरुषानांही तूं लाजविलं आहेस ! सवाईराव बनून, तुझं पवित्र स्त्रीधन परत मिळवून स्त्रीत्वाचा तूं राऊत

झालीस ! आणि मला पशूहून नीच अशा स्थितींतून वर उचलून, माझा उद्धार केलास !—ह्याची फेड मजकडून ह्या जन्मीं होईल का ?

लक्ष्मी—बाई ह्यांत विशेष तें काय केलं मीं ? माझं कर्तव्य तेंच मीं केलं ना ?—पण ह्या सगळ्या नाटकाचा सूत्रधार हा राघव !—ह्याचे मात्र उपकार खरे आहेत ! ह्यानें मामांची नक्कल इतकी हुबेहूब नसती केली, तर मुळींच साधता ना आपला कार्यभाग !

राघव—नक्कल तर माझ्याही मनाजोगी उतरली आजची, लक्ष्मी बाईसाहेब !—ह्यांत कांहीं शंका नाहीं ! पण त्यांत उपकार कसचे, नि काय कसचे ह्या दासाचे ?

लक्ष्मी—मला काय कळत नाहीं राघवा ? —पण चलावं गडे आतां इथून !

राघव—ह्या पहा बाहेर सहस्र सहस्र चांदण्या तुम्हांवर आशीर्वादद्दष्टि करायला सज्ज झाल्या आहेत आकाशांत ! त्यांचे आशिर्वाद घेत घेत चलावं आतां आपल्या बिऱ्हाडाकडेच !

अच्युतराव—अहाहा ! आज आमचा खराखुरा प्रेमविवाहच झालासा वाटतो आहे मला ! जन्मोजन्मीं ह्याच गृहदेवतेचा सहवास लाभेल काय मला ?

राघव—तस्यास्तु ! ( बक्षिसपत्राचे तुकडे गोळा करीत ) देवता, ह्यांत काय शंका ! ह्या अशा उद्धारक देवता जगांत आहेत, म्हणून तर आम्हां पुरुषांना शिंगें नाहीं फुटलीं ! नाहीं तर काय—जिकडे तिकडे शिंगेंच शिंगें ! शिंगांचें रानच माजलें असतें !—नाहीं का ? ( जातात ).

[ शेवटाला पडदा पडतो ]

---

[ १ ]

# माभळभट

## अंक पहिला

### प्रवेश पहिला

स्थळ—बाबुलनाथाच्या घरची ओसरी.

[ बाबुलनाथ व ओंकारेश्वर बोलत प्रवेश करितात. ]

बाबुलनाथ—तें असो. आज मीं तुला दुसऱ्याच कामाकरितां बोलाविलें आहे. ती बाब म्हणजे माझ्या एकट्याच्याच हिताची आहे, आणि तुझ्या हिताची नाहीं, असें कांहीं नाहीं हो ओंकारेश्वरा ! दोघांचाहि तिच्यांत सारखाच हितसंबंध आहे.

ओंकारेश्वर—बोला बाबुलनाथजी ! ( दोघेहि बसतात ) कोणती बाब, ती कळूं द्या आधीं. बाकी आपले दोघांचे हितसंबंध जन्माचेच आहेत. जन्माचे कां ? मृत्यूचेच ! या नगरीच्या महाराजांचे आपण वैद्यराज ! आणि मी त्यांचा अशुभोपाध्याय !

मृत्युपूर्व संस्कार होतसे देहावरि वैद्यकरीं !
मृत्योत्तर संस्कार तयावरि अशुभोपाध्याय करी !
दोन्ही मृत्यूचे । असती संबंधी साचे !

आपण मात्रागुटिकाचूर्णादि औषधी द्याल, तेव्हांच मला कामें मिळून माझा योगक्षेम चालणार. बरं, बोला आतां, कोणत्या गोष्टीकरितां मला इतक्या सकाळीं बोलावून आणलंत तें.

बाबुलनाथ—ती गोष्ट इतकीच कीं, महाराज सध्या कोणत्या काळजींत आहेत, ठाऊक आहे तुला ? एकुलती एक कन्या निर्मला उपवर झाली असून, तिचं प्रेम सेनापतिपुत्र धैर्यधर यांच्यावर अढळ बसलेलं, आणि त्यांना तर महाराजांनीं गेल्या वर्षी वनवासाला धाडलेलं.

ओंकारेश्वर—आहे ठाऊक, पुढं बोला.

बाबुलनाथ—धैर्यधराला वनवास घडल्यापासून राजकन्येनं तर दुखणं घेतलं आहे. धैर्यधरावांचून इतर कुणाशीं मी लग्न करणार नाहीं असं ती

म्हणते आहे. त्यामुळें महाराज केवढ्या चिंतेंत पडले आहेत ! हो, राजकन्येचं लग्न नाहीं, म्हणजे राजवंशच खुंटला ! आणि मग कांहीं राज्याची घडगत नाहीं.

ओंकारेश्वर—शिवाय, इथल्या या विलक्षण दांपत्यनीतीमुळें असल्या आजारी राजकन्येशीं लग्न तरी कोण करतो ? नवरा मेला, बायकोनं सती गेलं पाहिजे; बायको मेली, नवऱ्यानं सहगमन केलं पाहिजे; असली जिथं विलक्षण नीति, तिथं मृत्युपंथास लागलेल्या या निर्मलेचं पाणिग्रहण करतो कोण ? आणि तिच्याबरोबर यमलोकीं जातो कोण ?

बाबुलनाथ—तिचं प्रकृतिमान रात्रीपासून तर फारच बिघडलं आहे.

ओंकारेश्वर—आपलं औषध पोचलं असेलच आधीं ?

बाबुलनाथ—अर्थात्; पण आतां आज जें एक चूर्ण मीं घडविलं आहे तें जर लागूं पडलं, तर आपलं दोघांचंहि दैव उघडलंच म्हणून समज !

ओंकारेश्वर—दोघांचं ! तें कसं ?

बाबुलनाथ—असं बघ, तें चूर्ण तिला एकदम द्यायचं, म्हणजे धोक्याचं ! एक करतां एक झालं, तर हा बाबूलनाथ भस्मीभूत होईल. तेव्हां आधीं दुसऱ्या कुणावर तरी प्रयोग करायला नको ?

ओंकारेश्वर—कुणावर ?

बाबुलनाथ—मी आणि माझी बायको, याच्याखेरीज कुणीहि चालेल. मला मुलंबाळं नाहींत, तुला ठाऊक आहे.

ओंकारेश्वर—मग कुणा रोग्यावर प्रयोग करून पहाणार तुम्ही ?

बाबुलनाथ—नाहीं रे ! इथल्या या दांपत्यनितीमुळें इथं बायका नवरे परस्परांच्या प्रकृतीला इतकीं कांहीं जपतात, कीं आजारी म्हणून कुणी पडतच नाहीं. बरं, बायकानवऱ्यांच्या प्रकृति सुस्थितींत असल्यामुळें मुलेंहि प्रकृतीनं असावीं तशीं असतात. तेव्हां आतां प्रयोग करावयाचा कुणावर तूंच सांग ?

ओंकारेश्वर—मोठीच अडचण !

बाबुलनाथ—मोठीच म्हणजे ! केवढी मोठी ! तरी पण राजहितेच्छेनें प्रेरित होऊन कुणी पुढें आला तर केव्हांही अडचण उरत नाहीं.

असा कुणी पुढं आला, तर माझंच दैव उघडेल, त्याचं नाहीं, असं नाहीं ओंकारेश्वरा !

ओंकारेश्वर—त्याचं दैव तें केव्हां उघडणार ? परलोकीं गेल्यावर?

बाबुलनाथ— अर्थात्; या पुण्यसंचितानं त्याचं दैव परलोकीं तर उघडलंच पाहिजे, पण इहलोकींहि कीर्तिरूपानें तें अखंड उघडलें राहणार.

ओंकारेश्वर— मेल्यावर कीर्ति ! मृत्यूनंतर कीर्ति काय होय ?

मृत्यूनंतर ती कीर्ति कःपदार्थ जगतीं ॥ ध्रु० ॥
चिरंधाम सुख भोक्ता आत्मा
असतां दिव्यरती ॥
देहासम नाशवंत मानी मारी ऐहिक तीं ।
कीर्ति कःपदार्थ जगतीं ॥ १ ॥

बाबुलनाथ—वा ! वेडाच आहेस ! तसं असतं तर कीर्तिकरितां कुणीं प्राण खर्ची पाडले असते ? तें कांहीं नाहीं. अंसं कर, तुझ्या प्रकृतीला बासुंदी कांहीं मानवत नाहीं, पण आवडते मात्र तुला ती फार. तेव्हां रात्रीं घरांत बासुंदी केली होती, ती बरीच उरली आहे. घेतोस कां थोडी तरी ? म्हणजे माझंहि काम झालं, आणि—

ओंकारेश्वर—माझंहि काम झालंच ! अरे असुरासुरा !

बाबुलनाथ—काय, राजाकरितां इतकंहि नाहीं करवत तुला ? बासुंदीहि नाहीं खाववत तुला ?

ओंकारेश्वर—बासुंदी खाऊं आणि मरूं ? बासुंदी खाऊन आजारी पडूं, आणि तुझ्या चूर्णाचा प्रयोग करायला तुला संधी देऊं ? त्यापरता तूंच मरेनास ! राजसेवेंत घाल प्राण खर्ची ! हो पुढल्या जन्मीं कीर्तिकुबेर ! राक्षसेश्वर, बासुंदी खायला घालतो आहे या ओंकारेश्वराला !

बाबुलनाथ—ओरडूं नको. ती बघ राजकन्येची दासी पर्वति येते आहे इकडे.

ओंकारेश्वर—मरूं दे तुझी राजकन्या आणि पर्वति ! बासुंदी त्यापक्षां हा ओंकारेश्वर !

बाबुलनाथ—नको मरूं बापडा. अमर हो. पण बोलूं नको आतां ती बात.

( पर्वति प्रवेश करिते )

पर्वति—चला उठा वैद्यराज. ताईसाहेबांची प्रकृति बिघडायला गेली. उठा !

बाबुलनाथ—अं ! झालं तरी काय असं प्रकृति बिघडायला ?

पर्वति—महाराज गेले होते उजडत महामायेला कळ लावायला. ताईसाहेबांचं मंगल तर झालंच पाहिजे, नाहींतर राज्यावर अमंगळ ओढव-णार, असा पडला कळा.

ओंकारेश्वर—आणि निर्मला ताईसाहेब तर.

पर्वति—दुसरं कुणाशीं मंगलच करीत नाहींत. एका धैर्यधरावांचून इतर पुरुष आपल्याला भावासारखे असा हेका धरून बसल्या आहेत त्या.

प्रीतिची असे ही अशी सदाची रीती !
प्रिय विषयाविण ती विषय अन्य ना गणिती !
प्रीतिचा एक पति परिणियला जो स्वमतीं,
त्यापुढति तुच्छ गणि परमेशहि प्रीति सती !
प्रीतिची असे ही अशी सदाची रीती !

तेवढं त्या धैर्यधरांना वनवासाला नसतं धाडलं, तर बाई कशाला होता इतका हा घोळ !

ओंकारेश्वर—त्यांनीं अपराध तरी काय केला होता बुवा मोठा ?

पर्वति—इयल्या या दांपत्यनीतिविरुद्ध राजसभेंत ते बोलले, इतकाच ना ? बाकी, मला तर वाटतं, आपल्या या दुर्गानगरीबाहेर, इतर ठिकाणीं जी बायकांनींच तेवढं सती जायची सक्ति आहे, त्याहून आमची ही सध्याची चाल शतपट चांगली. बायकांनींच तेवढं काय पाप केलं आहे नवरे मरतांच सहगमन करायला ? नवरदेव आपले सदा मोकळे ! त्यापेक्षां ही आमची रीति कितीतरी न्यायाची. नवरा मेला बायकोनं सहगमन करावं; बायको मेली, नवऱ्यानं सहगमन करावं. हा न्याय ठीक नाहीं ? पण धैर्यधरांचें

म्हणणें, कुणीच कुणाकरितां सहगमन करायला नको ! निदान, तशी सक्ति नसावी. आपखुशीनें झाल तर ठीक.

बाबुलनाथ—पण शेवटीं महाराजांनीं काय ठरविलं ? ताईसाहेबांच्या लग्नाविषयीं त्यांच्या इच्छेप्रमाणं त्यांना तशाच राहूं देणार कीं महामायेच्या इच्छेप्रमाणं त्यांचं मंगल लावणार ?

पर्वति—लावणार म्हणजे ! द्वाहीदेखील फिरली ही आतां उभ्या नगरींत, कीं ताईसाहेबांना वर मिळवून देणाराला एक लक्ष सुवर्णमुद्रा मिळतील म्हणून. आणि म्हणून तर त्यांची प्रकृति विकोपाला गेली आहे ती ! हें हवं का सांगायला ? चला उठा तर आतां.

ओंकारेश्वर—आपणहि उठावें आतां. वर मिळवून देणाराला एक लक्ष सुवर्णमुद्रा ! उठावेंच आतां.

बाबुलनाथ—तुला चालायला वेळ लागणार ओंकारेश्वरा, आम्हीं होतों पुढं.

ओंकारेश्वर—व्हा, व्हाच पुढं. तुमचं आणि आमचं कसं जमणार ?

( बाबुलनाथ व पर्वति जातात. )

ओंकारेश्वर—( स्वगत ) एक लाख सुवर्णमुद्रा ! नुसत्या उच्चारानेंच तोंडाला पाणी सुटूं लागलं. पण नुसतं पाणी सुटून काय उपयोग ? वर कोण शहाणा बसला आहे मिळायला? बाकी, आमच्या काशीचाच एखादा नरवर, एखादा गंगापुत्र, माझ्या सुदैवानं आज इथं येईल, तर मात्र जुळेल. जावेंच, नगरीच्या महावेशींत जेठा मारून बसावेंच ! या निर्मळेला वर मिळवून देण्याचं पुण्य, आणि हें एक लक्ष सुवर्णमुद्रांचें पारितोषिक सुदैवानं माझ्या पदरांत पडलं, तर या अशुभोपाध्यायाचं दर्शनहि जगाला शुभ वाटायला लागेल. आणि मग, काय माय व्यायली आहे या बाबुलनाथादि धुंगुड्यांची मला ‘ बासुंदी खा ’ म्हणून म्हणण्याची ! [ जातो. ]

---

## प्रवेश दुसरा

स्थळ—महावेस.

[ हातीं चौपदी व काखेंत पोथ्या घेतलेला माभळभट प्रवेश करतो. ]

माभळभट—( स्वगत ) शेवटीं ही दुर्गानगरी तर गांठली, दीड महिना

तंगड्या तोडून, नद्या डोंगर, दऱ्याखोरीं पालथीं घालून, हिंस्र पशूंच्या तोंडीं किंवा दस्यूंच्या हातीं न पडतां, शेवटीं या नगरीच्या वेशींत तर शिरलों. आतां आंत नगरींत जाऊन वरणी लावण्यापूर्वी इथंच थोडा दम टाकावा!

( खालीं बसतो, तों ओंकारेश्वर प्रवेश करितो. )

ओंकारेश्वर—( स्वगत ) वाहवा! हा कुणी काशीकर भटजीच दिसतो. ( पुढें होऊन ) कुठून काशीहून आलास काय ?

मामळभट—होय हो! भिक्षुकीकरितां आलों आहे इथें.

ओंकारेश्वर—अं! आवाज तर ओळखीचा दिसतो.

मामळभट—मी मामळभट नाहीं कां दर्भाळींतला ?

ओंकारेश्वर—कोण! अरे मामळभटा तूं! गड्या, मला ओळखलें नाहींस, या ओंकारेश्वराला !

मामळभट—कोण ? ओंकारेश्वर ? मी नाहीं ओळखलें. [ स्वगत ] ओळखलें नाहीं, म्हणून उगाच म्हटलें. कदाचित् याची माझी ओळख अज्ञा-वयाचीही मी विसरून गेलों असेन.

ओंकारेश्वर—[ स्वगत ] तूं मला कोठून ओळखणार! उभ्या जन्मांत तरीं आपण पाहिलं आहे काय परस्परांना ? ( उघड ) अरे तुझ्या बापाच्या लंगोटी मित्राला, या ओंकारेश्वराला तूं विसरलास ? पोरा, तुला मामळ-भटाला नाहीं विसरलों हो, इथं दूर आहे मी तरी! बरा आलास अगदीं ऐन वेळीं! आज येतानास मामळभटा, तर हें अवघं राज्य गेलं होतं तुझ्या हातचें !

मामळभट—म्हणजे ?

ओंकारेश्वर—पण आधीं महाराजांना कळवूं तूं आल्याचं ?

मामळभट—म्हणजे ? म्हणतोस काय तूं ?

ओंकारेश्वर—( दूरवर दिसणाऱ्या एका राजसेवकास ) अरे ताडदेव! अरे इकडे ये आधीं! ( तो प्रवेश करितो, त्यास ) असं कर, ( त्याच्या कानांत कांहीं सांगून ) जा! ठोक धूम! आणि लवकर धाडून दे महा-राजांना याच्या स्वागताला! ( ताडदेव जातो. )

मामळभट—पण अर्थ काय याचा ?

ओंकारेश्वर—अर्थ इतकाच कीं, तुला राजजामात करतों इथला. सौभाग्यराज महाराजांची एकुलती एक कन्या निर्मला, इच्याकडून तुला माळ घालवितों आज.

माभळभट—थट्टा तर नाहीं करीत तूं ?

ओंकारेश्वर—वेड्या, थट्टा कसली ! खरोखरच तुला इथल्या राजाचा जांवई करतो बघ !

माभळभट—काय ! खरंच ! एकुण ज्योतिषानं सांगितलं, मला राजयोग आहे म्हणून, तें खरं तर !

ओंकारेश्वर—खरं म्हणजे ? या सौभाग्यराज महाराजांच्या मागें तूंच इथचा राजा.

माभळभट—पण, देवाशपथ खरं हें ?

ओंकारेश्वर—देवाशपथ, तुझ्या गळ्याशपथ खरं हें ? बघशीलच आतां.

माभळभट—एकुण पुरुषाचा भाग्योदय कुठं आणि कसा होईल, हें सांगतां यायचें नाहीं, म्हणून म्हणतात, तें खरं तर !

ओंकारेश्वर—अगदी खरं. हा तुझाच अनुभव बघ !—बरं, आतां महाराज येतील इतक्यांत. असं छाती खुलावून उभं रहायचं. डरायचं नाहीं मुळीं. आणि नांव काय सांगायचं ?

माभळभट—काय म्हणजे ? माभळभट.

ओंकारेश्वर—अरे बेटया, माभळभट नांव सांगून कसं चालेल ? महाराजांचा जांवई, आणि म्हणे माभळभट !

माभळभट—मग काय सांगायाचें तर ?

ओंकारेश्वर—पाहूं ? माभळभट, महाबळभट, महाबळराज, महाबळेश्वरराज ! महाबळेश्वरराज ! म्हणून सांग.

माभळभट—ठीक. महाबळेश्वरराज !

ओंकारेश्वर—आणि कुठला राजकुमार म्हणून सांगशील ?

माभळभट—कुठला ?

ओंकारेश्वर—चोपद्रीराजाचा.

माभळभट—चौपद्रीराजाचा ज्येष्ठ कुमार खरा मी! ( दूरवर वाद्यें वाजतात. )

ओंकारेश्वर—आलेच महाराज. ते बघ, हत्ती थांबवून, खालीं उतरून पायीं येताहेत तुझ्या सन्मानार्थ! बरं, महाराज कांहींहि बोलले, तरी त्यावर तूं काय म्हणायचं?

माभळभट—काय म्हणायचं?

ओंकारेश्वर—खरं आहे महाराज. असंच खरं महाराज. असं धोरण ठेवायचं. तसंच, राजरंग पाहून जिव्हाहि सैल सोडायची!

जरी जातिक्षात्रिय न असशि पाही,
तरी जिव्हा क्षत्रियचि साच होई!
सुवर्णासम मग सर्व सुगुण राही,
समुच्चितता घेत्रोनि तुझ्या ठायीं!

माभळभट—समजलों हे आलेच ते.

( सौभाग्यराज महाराज सहपरिवार वाजत गाजत प्रवेश करितो. )

सौभाग्यराज—सुस्वागत असो.

परिवार—सुस्वागत असो.

सौभाग्यराज—या सौभाग्यराजाचं भाग्य थोर, कीं आपले पाय या नगरीला लागले!

माभळभट—असंच खरं महाराज. माझंहि भाग्य थोर, म्हणून माझे पाय या नगरीला लागले.

सौभाग्यराज—आणि माझ्या निर्मलेला असा अकल्पित वरलाभ झाला.

माभळभट—अगदीं खरं महाराज. नाहीं तर मला तरी असा अकाल्पित वधूलाभ कसा होता?

सौभाग्यराज—( ओंकारेश्वरास ) पण आमच्या नगरींतली दांपत्यनीति ठाऊक आहे ना यांना?

ओंकारेश्वर—हो हो तर! छद्मवेशांत पर्यटन करणाऱ्या या राजकुमारांना ठाऊक नाहीं, असें त्रिभुवनांत कांहीं नाहीं महाराज.

माभळभट—सगळें कांहीं जाणतों मी.

सौभाग्यराज—तर मग ओंकारेश्वर, तुम्हांला एक लक्ष सुवर्णमुद्रांचें पारितोषिक देण्यांत आलें आहे. तें भांडारांतून घेऊन जावें तुम्हीं.

ओंकारेश्वर—महाराजांचा कृपाप्रसादच हा.

सौभाग्यराज—आणि राजकुमार, आपण आतां हा छद्मवेष टाकून, आपल्या पदवीला अनुरूप अशीं हीं पंचवस्त्रें परिधान करावींत.

ओंकारेश्वर—आणि या पंचावर पायजमा चढवून, पंचांग वगैरेच्या पोथ्या मजजवळ द्याव्यात.

( राजसेवक वस्त्रें माभळभटाच्या अंगावर चढवितात. )

सौभाग्यराज—कोणत्या राजेश्वरानं आपल्याला जन्म दिला बरं कुमार ?

माभळभट—चौपद्रीराजाचा ज्येष्ठ कुमार महाबळेश्वरराज तो मी.

सौभाग्यराज—चौपद्रीराजाचं, आणि आपलंहि नांव आम्हीं कुठून ऐकणार ? आम्हीं पडलों आर्यावर्ताच्या या कोंपऱ्यांत; बहुतेक अज्ञात अशा प्रदेशांत. महामायेची कृपा, म्हणून आपल्यासारखे वीरश्रेष्ठ जामात आम्हांला आज लाभताहेत. श्रीखंडपुरीच्या राजाची आम्हांला भीति वाटत होती. आतां त्याला कोण भितो म्हणा !

माभळभट—श्रीखंडपुरीचा राजा माझ्यापुढें गमजा करील ? बघा कसा फडशा उडवितो त्या श्रीखंडपुरीचा ! पण त्याचें आपल्याशीं वैर तरी काय म्हणून ?

सौभाग्यराज—श्रीखंडपुरी राजाचं लक्ष आहे आमच्या भोजनपात्रांवर.

माभळभट—कां बरें ? तें कां ?

सौभाग्यराज—त्यांचीं भोजनपात्रें पडलीं क्षुद्र सुवर्णाचीं ! आणि आमचीं आहेत बहुमोल हीरकाचीं; त्याकरितां तो पांचदा चालून आला आम्हांवर. आणखी पुनः तो चालून येतो आहे म्हणतात आम्हांवर.

माभळभट—येऊं द्या त्याला, मी घेतों त्याचा समाचार.

स्फुरण मम पावति बाहु आतांच हे
फस्त करण्यास श्रीखंडपुरि ती !
पुढति ती जरि तिची सर्व सेनाहि ये,
खाउनि टाकतों खास पुरती !

उडवितों येथल्या येथ फन्ना जवें
करित, घेतां समाचार, तृप्ती !

सौभाग्यराज—महाबळेश्वरराज आम्हांला लाभले, ही आमची पूर्वपुण्याईच फळाला आली म्हणायची, बरं असो. आतां चढावें अंबारींत. आणि चलावें प्रासादाला. विवाहमुहूर्त आतां इतक्यांतच असून सर्व सिद्धताहि झाली आहे.

माभळभट—चलावंच तर.

सौभाग्यराज—राजजामात महाबळेश्वरराज यांचा जयजयकार !

परिवार—जयजयकार !

माभळभट—( स्वगत ) मला या वैभवांत पहायला बाबा आणि आई आज असती, तर या माभळभटाला जन्म दिल्याबद्दल त्यांना केवढं कृतकृत्य वाटलें तरी !

उलटी अंबारी ॥ धरिली आजवरी स्वकरीं ॥ ध्रु.
तोच रंक आरुढे सुवर्णांबरीं, छत्र वरी ।
लोटांगणि राजलक्ष्मि, तैशी सुंदर ये नवरी ।
दैवाचीच खरी लीला ही विस्मयकारी ।

( जातात )

## अंक दुसरा

### प्रवेश पहिला

स्थळ—राजप्रासादाजवळील उद्यान.

[ यतिवेष घेतलेला धैर्यधर प्रवेश करतो. ]

धैर्यधर—( स्वगत ) एकूण हा धैर्यधर अभागीच का ? नगरींत पाऊल ठेवतांच निर्मलेच्या शुभमंगलाची अशुभ वार्ता कानीं पडली. खरा प्रकार काय आहे, तो तरी पहावा, म्हणून या राजप्रसादाकडे आलों. तों प्रासादांत लग्नसमारंभाची एकच गर्दी उडालेली ! निर्मले ! निर्मले ! या धैर्यधराचं हृदय शेवटीं असं विदीर्णच केलंस ना ? कीं, प्रेमाचा धर्मच हा असा,

न कळे प्रेमा । स्वरूप तुझें तें मला ॥ ध्रु० ॥
भाससि जीवनकर अमृतसें पूर्वी जे विमला,
होउनि आज कसें लाजविशीं मृत्युकर गरला
भाससि मोदकरा कंठीं पूर्वी सुममाला.
होशी आज कशा कंठांतरिं मृत्यूशर रुतला !

यापेक्षां कुणावर प्रेम न जडणं हेंच भाग्याचं नव्हे ?—या उद्यानांत निर्मलेच्या सहवासांत माझा काळ किती सुखाचा गेला !

उद्याना पाहुनिया हृदय खळबळे !
आठवुनी ते दिन, ये नयनिं जल बळें ! ध्रु०
सौख्यद प्रियदर्शनवत् दुःखद विरहानलवत्
सुख–दुःखद ते दिन गत आठविति बळें ! १
प्रिय सखि–अधरामृतवत्, अप्रिय निष्फलश्रमवत्
प्रिय–अप्रिय ते दिन गत आठविति बळें ! २
निर्मल नवप्रणयावत् निष्ठुर दुर्दैवावत्
निर्मल–निष्ठुर दिन गत आठविति बळे ! ३
मधु कोकिल कूजितवत् कटुतम नैराश्यावत्
मधुकटुतम ती स्मृतिगत परतलीं बळें ! ४
भुक्त सुखें आठवुनि नैराश्यीं मन बुडुनी
हृदयकुंभ हा फुटुनी दुःखमधु गळे ! ५

किंवा-किंवा--असं तर नसेल, कीं, तिचं माझ्यावरील प्रेम पूर्वीप्रमाणें अढळ असून महाराजांच्या दुराग्रहापुढें तिला मान वांकवावी लागली ? असंहि नसेल म्हणून कुणीं म्हणावं ? पण ही कोण इकडे येते ? ही निर्मलेच्या विश्वासांतली दासी पर्वति नव्हे का ? हो, तीच. तिजजवळून खरें काय तें काढून घ्यायला काय हरकत आहे ? ( पर्वति प्रवेश करिते ) पर्वति, ( कृत्रिम दाढी काढून ) मला ओळखलंस ?

पर्वति—अगबाई ! कोण ? कुमार धैर्यधर !

धैर्यधर—होय पर्वति ! तोच हतभागी प्राणी मी. ( कृत्रिम दाढी पूर्ववत लावून ) मला इथं पाहून, आश्चर्य वाटेल तुला नाहीं ?

पर्वति—कां नाहीं वाटूं कुमार ? आपण प्रवासांत गेलेले.

धैर्यधर—पण या नगरींतल्या कर्तव्यानें खेंचून आणिलं मला इथं. म्हटलं, महाराजांची क्षमा मागून, निर्मलेचा लाभ करून घ्यावा; आणि तिनं व मी, दोघांनीं मिळून, इतउत्तर या राक्षसी दांपत्यनीतीचा उच्छेद करण्यांत जन्मसाफल्य करावं !—पण इथं येऊन पाहतों, तों तिनं तर मला केव्हांच विसरून जाऊन दुसऱ्याच कुणाला माळ घातलेली !

पर्वति—आपल्याला बोलवत तरी कसं असं ? ताईसाहेब आपल्याला कधीं तरी विसरतील ? आपल्या वनवासामुळंच त्यांनीं दुखणं घेतलं नाहीं का ? अशा स्थितींत धरून बांधून त्यांचं मंगल करून टाकलं तर त्यांनीं काय बरं करावं, कुमार ?

धैर्यधर—खरं का असं पर्वति ?

पर्वति—खरंच म्हणजे ? सारखा आपला ध्यास करताहेत त्या. आपणावांचून इतर पुरुष मला भावासारखे; मी कधीं दुसऱ्या कुणाला वरणार नाहीं असं दिलाल निक्षून सांगितलं त्यांनीं महाराजांना. पण महाराजांनीं करायचं तें केलंच.

धैर्यधर—दुखणं का घेतलं आहे माझ्यासाठीं तिनं ?

पर्वति—किती पण ! अंतर्पट धरला, तेव्हां त्यांना कशाबशा धरून उभ्या कराव्या लागल्या कुमार !

> तें का शिवमंगल बाई ॥ अशिवचि जें होई ? धृ०
> पाध्ये ' सावधान ' ते वदतां, लोपे नवरीची सावधता !
> मंगलाक्षता मस्तकिं पडतां विद्युत्पातचि शिरिं होई ! १
> धरुनी नवरीचे हात बळां घालिति माळ नवरदेव गळां !
> ऐशा दीना आम्हीं अबला ! चिरती गळा असा काई ? २

झालं बाकीचं सारं, लाजाहोम सप्तपदी राहिलं आहे. तें त्यांना बरं वाटल्यावांचून कसं करणार ? हो उभं राहून सात पावलं तर टाकतां यायला हवींत ना ?

धैर्यधर—काय ? लाजाहोम आणि सप्तपदि राहिलीं आहेत म्हणतेस ? तर मग विवाहविधि अद्याप धशास्त्र पुरा नाहींच झाला.

पर्वति—पण लौकिक दृष्टीनं झाला आहे ना पुरा ?

धैर्यधर—होऊं दे. मला अजून आशा आहे पर्वति !

पर्वति—पण ती पुरी कशी व्हायची ?

धैर्यधर—कशी तें सांगतों तुला जराशानं. आधीं भेट करून दे मला निर्मलेची. म्हणावं, कुणी यति आला आहे, आपण अजारी असल्याचं कळल्यावरून. तो म्हणतो, 'मी बरी करीन तुला' म्हणून ! 'जा. ये विचारून, मी येऊं कां,' म्हणून ! पण, यतीच आला आहे, असं सांग हो ! मी आलों आहे म्हणून नको सांगूं.

पर्वति—नाहीं सांगत. चालावं माझ्याबरोबर नि बसावं महालाबाहेर, ताईसाहेबांची आज्ञा होईपर्यंत.

धैर्यधर—तूं सांगशील तसं करायला हवं तिच्याकरितां. चल तर तुझ्या ताईसाहेबांच्या महालाकडे.

पर्वति—चलावं यतिवर्य भाग्येनंच धाडलं आपल्याला. [ जातात ]

---

## प्रवेश २ रा.

स्थळः—राजप्रसादांतील एक महाल [ मखमालीच्या टोलेजंग गादी लोडावर हातपाय पसरून माभळभट पडलेला आहे, असा प्रवेश. ]

माभळभट—( स्वगत )

भाग्योदय म्हणती याला ! दुर्भाग्याचे ने विलयाला ! धृ०
काळ याच वेळीं बाभळिवर्नि, काटयांवरि पंचा आंथरुनी,
पडला होता हा कसावसा ! परि आज पहा पडला कैसा !
मखमालीच्या टोलेजंगी गादी लोडावरि बहुरंगीं
पसरुनी हातपाय पडला ! माभळभट कोण म्हणे ह्याला ? १
कालचि कैसा हा माध्यान्हीं क्षुधा जठरिं पेटवितां वन्हीं,
मूग गिळुनिया स्वस्थाचि पडला ! परि आज पहा काय जेवला !
श्रीखंड पुरी, बासुंदी ती मांडे, जिलब्या, लाडू अमिती,
मिष्टानें आकंठचि भरला ! अस्वस्थ जरा होउनि पडला ! २

काल पहा वरखालीं झाला जीव ! हिंस्रपशु ये खायांला,
किंवा दस्यू गळ्छंतीला ! परि आज कथा राजा पडला !
दृष्टिक्षेलीं येई त्याला चळचळ कांपविता हा झाला !
सौभाग्याचा जामात भला माभळभट कोण म्हणे ह्याला ? ३

पण इथें यायचें साहस केलं, म्हणून घडलं हें सगळं नाहींतर, त्या काशीच्या घाटावर बसतों माशा मारीत तर चढतों मी या इंद्रतुल्य पदाला ? हा कोण येतो आहे आमच्याकडे, पोटावर हात फिरवीत? ओंकारभट अशुभोपाध्याय! भिक्षु–भोजनें आटपलिशीं दिसतात यावरून.

( ओंकारेश्वर प्रवेश करितो )

ओंकारेश्वर—कसं काय राजजामात ! ( गादीच्या टोंकावर बसत ) वामकुक्षी झाली ?

माभळभट—हो दूर भिक्षुका ! कृपाळु होऊन आम्हीं तुला या मंगल-प्रसंगीं आपला खासगी मंत्रि नेमिला; म्हणून काय आमच्या गादीवर येऊन बसशील वाटतं ? रहा दूर उभा असा ! बोलून चालून अशुभाचा कारटा तूं !

ओंकारेश्वर—( दूर उभें राहून स्वगत ) अरे कृतघ्ना ! अन्नदात्यावर उलटतोस ! अन्नदात्यावर का, राज्यदात्यावर ! तुला दाखवूंच का आतां या मऊमखमाली बिछान्यांचं सुख ( उघड ) महाबळेश्वरराज मी हो कशाला त्या गादीवर येऊन बसूं? आणि इथं उभा तरी राहूं कशाला आपल्यापुढें ? तो श्रीखंडपुरीचा राजा म्हणे चाल करून आला आहे प्रचंड सेनेनिशीं ! हें आपल्याला कळवावं, म्हणून आलों इकडे. महाराजांनीं या मंगलप्रसंगीं आपल्याला आपले चतुरंग बळाधिपति नेमिले आहेत; म्हणूनच आपल्याला हें कळवायला आलों मी. आपल्याला कळविलं आहे. आतां जातो मी बापडा. ( जाऊं लागतो. )

माभळभट—( हातपाय आवरून ) अरे म्हणजे ! थांब, जाऊं नको. ये इकडे. फीर मागें. तुला आमची आज्ञा आहे. फीर मागें.

ओंकारेश्वर—( थांबून ) काय आज्ञा आहे युवराज !

माभळभट—अरे, आजच त्या श्रीखंडपुरी राजाला कोणी सांगितलं चाल करून यायला ? आम्हीं जेऊन कसे आडारलों आहोंत, पाहतोंच

आहेस. तशांत, ही घरांतली,—आमची युवराज्ञी,—अशी आजारी ! मग आम्हांला आज सवड होणार कशी ?

ओंकारेश्वर—या ! म्हणजे ? सवड करायला सगळया राज्यांवर जिथं प्रसंग, तिथं असल्या घरगुती अडचणी काढून कसं चालेल ? आणि महाराज तरी त्या कशा ऐकणार, चतुरंगबळाधिपते !

माभळभट—तें तर खरेंच रे ? हें लचांडच झालं मोठं !—पण—बघ, या युद्धाच्या भानगडीच नकोत बुवा आपल्याकडे. मला नाहीं रुचत त्या ! तूं आपल्याकडेच त्या घेतल्यास तर नाहीं चालणार ? तूं आमचा खासगी मंत्रि आहेसच. तुला आम्हीं आपला खासगी चतुरंगबळाधिपतीहि नेमतों या घटकेपासून. पण आम्हांला नकोत बुवा हे युद्धाचे उपद्व्याप.

ओंकारेश्वर—खासगी चतुरंगबळाधिपति होऊं मी ! छे छे छे छे छे ! नको तें आपलं पद मला ! आपलं आपल्याला तें लखलाभ असो !

( जाऊं लागतो. )

माभळभट—( उठून बसून ) अरे ! असं काय करतोस ओंकारेश्वरा ! थांब जरा ! तूं आमच्या वडिलांचा लंगोटिमित्र ना ? बस खालीं, इथं असा गादीवर !

ओंकारेश्वर—मला कुठं आहे वेळ बसायला, आणि उभं रहायला तरी ! त्या लक्ष्मीपतीची पत्नी ही आतांच आटोपली. तिकडे गेलं पाहिजे या अशुभाच्या कारट्याला ! तिचं और्ध्वदेहिक आणि तिच्या नवऱ्याचं सहगमन, दोन्हीं व्हायचीं ! फार वेळ लागणार. तेव्हां आतां जातोंच मी.

माभळभट—नवऱ्याचं सहगमन ! म्हणजे ?

ओंकारेश्वर—म्हणजे काय ? बायको मेली, नवऱ्यानं सहगमन नको करायला ?

माभळभट—म्हणजे !

ओंकारेश्वर—नवरा मेला, कीं बायकोला सती जावं लागतं ना ?

माभळभट—हो लागतं. जनरूढीच आहे तशी.

ओंकारेश्वर—तशीच इथं दुसरीहि एक जनरूढी आहे. ती ही कीं,

बायको मेली कीं नवऱ्यानं सहगमन केलेंच पाहिजे. –कळलं आतां ?

माभळभट—( घाबरून ) म्हणजे ! कसं म्हणतोस ?

ओंकारेश्वर—म्हणजे पत्नीनं आपल्या मृतपतीबरोबर सती गेलंच पाहिजे, ही जशी एक सार्वत्रिक जनरूढी आहे, तशीच इथं पतीनेंहि आपल्या पत्नीच्या निधनानंतर सतीचं वाण घेतलं पाहिजे, अशी दुसरी एक विशेष जनरूढी आहे, समजलं आतां ?

माभळभट—म्हणजे कसं !-ही–आमची–घरांतली–युवराज्ञी–आजारी आहे. ती–जर का–आटोपली,–तर–मला—

ओंकारेश्वर—सती गेलंच पाहिजे.

माभळभट—म्हणजे म्हणतोस काय ?

ओंकारेश्वर—असं म्हणतों, आपल्या युवराज्ञी आटोपल्या, तर आपल्यालाहि आपली ऐहिक यात्रा आटोपून, त्यांच्या सोबतीला निजधामीं गेलं पाहिजे. तें कांहीं चुकायचं नाहीं.

माभळभट—( उभें राहून ) म्हणजे ? ती जर आज मेली, तर मलाहि तिच्याबरोबर मरायला हवं ?

ओंकारेश्वर—हवं म्हणजे ! हवंच हवं ! नको म्हणून कसं चालणार ? नको म्हटलें, तरी इथलें राजशासन भाग पाडणार.

माभळभट—आग लाव तुझ्या शासनाला, आणि तुलाहि, कर्मचांडाळ ! तूं ! तूं मला या कुलंगड्यांत अडकविलंस ! आधीं कां नाहीं सांगितलंस मला हें ?–राक्षसा !

ओंकारेश्वर—पण राजजामात महाबळेश्वरराज—

माभळभट—चुलींत टाक तुझा राजजामात आणि महाबळेश्वरराजहि ! मी आपला माभळभट काशीचा, मला कशाला या खोड्यांत पाडलेंस ?

ओंकारेश्वर—पण इतकं घाबरायला कशाला हवं इतक्यांतच ! युवराज्ञी कांहीं याच क्षणीं ' राम ' नाहीं म्हणत, तें आपल्याला याच क्षणीं सहगमन करायला लागतं आहे.

माभळभट—माणसाच्या लेका ! पण ती बेशुद्ध तर पडली आहेना ? ( अंगावर धावून ) राक्षसा ! तूं–तूं मला या प्राणसंकटांत पाडलंस !

ओंकारेश्वर—(लगबग पळत) मीं कसचं, महाबळेश्वरराज ! मी कसचं, राजजामात ! मी कसचं चतुरंगबळाधिपते ! ( जातो. )

मामळभट—थांब, तुझा कपाळमोक्ष करतों !

( लोड उचलून मागें धांवत जातो )

---

## प्रवेश ३ रा.

स्थळ—निर्मलेचा महाल.

[ निर्मला मंचकावर पडलेली असून पर्वति उभा आहे, असा प्रवेश.]

पर्वति—तर मग घेऊन येऊं ना त्या यतीला ? तो म्हणतो, ताईसाहेबांना मी बऱ्या करीन म्हणून ! घेऊन येऊं ना त्याला आंत ?

निर्मला—काय ग तरी हेका धरला आहेस हा ! त्याच्या जडीबुटीनं का मी आतां बरी होणारी आहे ! तुला का हें सांगायला हवं पर्वती ?

पर्वति—असं काय बरं करावं ताईसाहेब ! तो म्हणतो, मी ताईसाहेबांनां खास बऱ्या करीन, म्हणून ! ही मी आणत्येंच त्याला आंत.

( जाऊं लागते. )

निर्मला—जा बापडी. तूं म्हणल्येस तसं का होईना ! ये घेऊन आपल्या समजुतीकरितां, नि घे फेडून शंका.

पर्वति—येत्येंच घेऊन ( जाते. )

निर्मला—( स्वगत ) धैर्यधर ! तुम्हांवांचून का ही निर्मला आतां दुसऱ्या कशानं जगणार आहे ?

त्वद्दर्शन तें अमृत ! त्याविणें जीवन मज नाहीं !
परि त्वत्पद ते परदेशीं ! नच तद्दाशा कांहीं !
भ्रमतां तुम्हां मोहवितिल प्रतिरंभा लवलाही !
मज हृदयीं पूजिल्या पादुका सर्वस्वाचि पाही !
भ्रमतां शशितें मोहविती शत तारा लवलाही,
परि रोहिणितें मोहवितें त्याविण जगतीं नाहीं !
रविप्रभा ती सहस्र कलिका विकसवि लवलाही,

परि कमलिनिजीवन कलिका रविविण विकसति नाहीं !

( पर्वति व यतिवेषधारी धैर्यधर प्रवेश करितात. )

पर्वति—यतिवरांचं पाऊल इथं पडतांच या महालाची कळी पहा कशी उमललेली दिसायला लागली ही !

धैर्यधर—( निर्मलेजवळ जाऊन ) राजकुमारी खात्रीनें गुणकारी होईल माझें औषध तुला.

निर्मला—अगबाई ! कुणाचा आवाज हा ? ( उठून बसण्याचा प्रयत्न करीत, त्याजकडे पहात ) कुमार धैर्यधरांसारखा नाहीं का हा आवाज ?

पर्वति—खरंच ताईसाहेब ! अगदीं त्यांचाच.

धैर्यधर—महामायेच्या कृपेनं आज बरी होणार तूं कुमारी !

निर्मला—यतिवरांच्या दर्शनभाषणांनीं अर्धअधिक बरं वाटायला लागलं आतांच.

धैर्यधर—( नाडी पहात ) त्यांत कसलं आश्चर्य राजकुमारी ? वैद्याला पाहून, त्याचं भाषण ऐकून, जर रोग्याला अर्धअधिक बरं वाटलं नाहीं, तर फुकट तो वैद्य व त्याची विद्या.

निर्मला—( स्वगत ) निःसंशय ! कुमार धैर्यधरच हे. ( प्रगट ) केवढी तरी ही मोहिनी भरली आहे यतिराज आपल्या वाणींत ! बरं, माझ्या रोगाला नांव तरी काय देतां आपण ?

धैर्यधर—याचं नांव विरह ! विरहरोग म्हणतात याला.

पर्वति—आणि यावर औषध—

धैर्यधर—( छद्मी वेष टाकून ) हें.

निर्मला—कुमार ! माझा अंत कां बरं पाहिला इतका ? यापूर्वींच येऊन या दीन गाईची मुक्तता कां बरं नाहीं केलीत ?

धैर्यधर—अजूनहि वेळ नाहीं गेली. मुक्ततेचं उपायचिंतन मी केलेलं आहे. या पर्वतीच्या आणि धर्ममार्तंड भुलेश्वराचार्यांच्या साहाय्यानं मला यश आल्यावांचून रहाणार नाहीं. पण त्यापूर्वी, हें आतांच्या आतां, इतकं करायचं ( निर्मलेच्या कानांत कांहीं सांगतो; तिचें मुख आनंदानें प्रफुल्लित

होतें; पर्वति उत्कंठेनें पहात रहाते. ) आज इतकं झालं कीं, माझं कार्य झालंच झालं. ( छद्मवेष करतो व जातो. )

---

## अंक तिसरा.

### प्रवेश पहिला.

स्थळ—प्रासादांतील एक महाल.

[ मामळभट सचिंत उभा आहे, असा प्रवेश. ]

मामळभट—( स्वगत ) ही बेशुद्ध पडली आहे, ती जर आटपली, तर देवा, काय रे गति होईल या मामळभटाची ! तो दुष्ट ओंकारेश्वर म्हणतो, मला तिच्याबरोबर सती जावं लागेल म्हणून ! म्हणजे, कोण रे जगत्पते, हा जुलूम ! पुरुष का कुठं बायका मेल्या म्हणून सतीचं वाण घेताहेत ? पण या दुर्गा नगरींत हा असा उलटा न्याय. बायकांनीं पुरुष मरतांच सतीचं वाण घेणं, ही जनरूढीच आहे. तिला कोण म्हणेल जगाविरुद्ध ? पण बायका मेल्या, म्हणून जिवंत पुरुषांनीं मरायचं, त्यापरत्या मरत कां नाहींत. एकदांच्या या बायका, लग्नापूर्वीच ! काय रे हा अन्याय जगदीशा ! पण मला सांगितलं कां नाहीं त्या अधमानें आधींच, कीं इथें ही अशी पुरुषांनीं सती जाण्याची बायकी चाल आहे म्हणून ? पण राक्षस मला आधीं कसं सांगेल तें ? कोणाला तरी मारून मुटकून नवरदेव करून, या-मेल्या एकदाच्या-राजकन्येशीं त्याच्या गळयाची गांठ बांधायची, आणि तें एक लक्ष सुवर्णमुद्रांचें, बक्षिस उपटायचं होतं ना त्या राक्षसाला ?-पण मलाच माझी काशींतली दर्भाळी सोडून इकडं यायची बुद्धि कां झाली देवा ?- नकोरे बुवा या सौभाग्यराजाच्या राज्यांतली भूलक्ष्मी, लक्ष्मीकांता ! माझ्या गंगाकांठचे खडक फोडून तें नांगरीत राहतों, तरी पुरवितें रे बाबा ! सुखानें लग्न करितों, संसार थाटतों, आणि रहातों जीवंत ! ती आटपतांच एक सती तरी जावं लागत, किंवा वपन तरीं करून घ्यावं लागतं. पण त्या मरावें तरी लागतं ना मला असं. आतां, मी इहलोक सोडून जातांच तिलां, दोहोंलाहि माझी कांहींच हरकत येतीना. ही कोण येते आहे इकडे ? ही

तिची–युवराज्ञीचीच दासी नव्हे का ? अरे देवा ! डोळ्यांना पदर लावला आहे हिनें. फुटलें कीं काय माझें कपाळ ! ( हात जोडून ) जगज्जीवना ! दयाघना ! माझ्या बायकोला–राजकन्येला–जीवदान करून, माझ्या जिवांत आतां तूंच जीव आणणार रे बाबा !

( पदरानें डोळे पुशीत पर्वति प्रवेश करिते )

पर्वति—युवराज ! निर्मलाताईसाहेब–( हुंदका आणून ) गेल्या हो गेल्या आपल्याला टाकून !

माभळभट—( कपाळावर हात मारून ) हायरे दैवा ! शेवटीं मला—

पर्वति—बरोबर जायचंच आहे त्यांच्या.

माभळभट–( मटकन बसून ) फुटलंच कपाळ ! आभाळ कोसळलं एकूण !

पर्वति—शोक आवरून धरला पाहिजे नि सहगमन केलं पाहिजे आतां. असं हातपाय गाळून कसं चालेल युवराज ?

माभळभट—( लोळण घालून ) जगबूड ! महाप्रळय ! ब्रह्मांडप्रलय ! जगदात्म्या ! आतां हा प्रसंग कसा रे काढूं.

पर्वति—पुरुषासारखा प्रसंग काढला पाहिजे. बाकी, तसलेहि पुरुष ठाऊक आहेत मला ऐकून. बायको आटपायचा अवकाश, इथल्या या राज-शासनाच्या हातावर तुरी देऊन जाणारेहि कांहीं थोडके नाहीं झाले आजवर. बायका मात्र फारशा नाहीं जात हो पळून ! पुरुषच फार.

माभळभट—( उठून बसून ) खरंच, नाहीं ?

पर्वति—बाई खरंच म्हणजे ? कितीतरी नवरे असे पळून गेले आहेत इथून. नि जातातहि या घटकेला. परराज्यांत जातात, पुन: लग्न करतात, संसार थाटतात, नि रहातात सुखानं. या राज्यांत फिरून तोंड नाहीं दाखविलं म्हणजे झालं. गेलाच प्रसंग. आतां आपल्यासारख्या पुण्यात्म्यांची गोष्ट निराळी. ते का असे सहगमनाचें पुण्य टाकून देणारे आहेत ? पुण्यात्मे ते पुण्यात्मे.

माभळभट—हो हो ! आमची गोष्ट कशाला हवी आम्हीं काय असे भागुबाईसारखे पळून जायला बसलों आहोंत ! ( उभे राहून ) बरं, जा तूं आतां. झालं तुझं काम ?

पर्वति—झालंच माझं काम. ( स्वगत ) खरंच झालं माझं काम. मी येथून हाकलायची खोटी, स्वारी, गेलीच इथून पळून नि मग साधलंच काम कुमार धैर्यधराचं ! ( डोळे पुशीत जाते )

मामळभट—( स्वगत ) नकळत हिनें माझ्या मुक्तीचा मार्ग मला दाखविला,—थेट काशीचा. संध्याकाळ होऊन काळोख पडू लागला आहेच. आतां हा पायजमा उतरून पंचा लावावा, आणि पहावाच विचार यः पलायनाचा. जीव घेऊन पळायचें, तें थेट काशीक्षेत्र गांठायचेंच. हे कोण ? महाराज आले इकडे ! महारुद्रा ! कृतान्तच आला हा !

( सौभाग्यराज प्रवेश करितो )

सौभाग्यराज—( डोळे पुशीत ) महाबळेश्वरराज !

मामळभट—( हुंदका आणून ) राजाधिराज !

सौभाग्यराज—शेवटीं आमची प्रियकन्या—

मामळभट—आणि आमची प्रियपत्नि—

सौभाग्यराज—गेली हो गेली !—

मामळभट—निजधामास !

सौभाग्यराज—आमच्या दुर्भाग्यांत केवढा गिरी कोसळला हा !

मामळभट—केवढा दुर्धर प्रसंग ओढवला हा !

सौभाग्यराज—महामायेची इच्छा ! शोक करून काय उपयोग ?

मामळभट—काय लाभ ? झाल्यागेल्याचा शोक म्हणजे हानीची पुनरावृत्ति. ती गेली ती का थोडीच परत येणार आहे—निजधामाहून !

सौभाग्यराज—आपण तर जाणारच, बाळेबरोबर ?

मामळभट—जाणारच निजधामास ! ( स्वगत ) म्हणजे आपल्या घरीं, काशीस.

सौभाग्यराज—बाळेच्या और्ध्वदेहिकाची आणि आपल्या सहगमनाची सिद्धता आतां होईलच इतक्यांत.

मामळभट—माझी सिद्धता झालेली आहे या क्षणीं ( स्वगत ) पलायनाची.

सौभाग्यराज—आपलं भाग्य मोठं.

मामळभट—तें काय सांगायचं !

सौभाग्यराज—म्हणूनच हे सहगमनाचं पुण्य आपल्या पदरीं पडणार !

माभळभट—हो हो तर ! ( स्वगत ) पण मी तें पदरीं बांधून घेईन तर ना ?

सौभाग्यराज—शोक आवरून, चौपद्री राजाच्या ज्येष्ठ कुमारा, या दुर्गानगरीच्या राजजामाताला आणि चतुरंग बळाधिपतीला उचित असं धैर्य आपण आतां दाखविलं पाहिजे, महाबळेश्वरराज !

माभळभट—पहातांच आपण, आम्हीं केवढ्या धैर्यानं हा प्रसंग काढतों आहोंत तें !

सौभाग्यराज—विचारी आहांत, ज्ञानी आहांत, शूर, धीर वीर, गंभीर आहांत. आम्ही सांगायला नकोच म्हणा.

माभळभट—मला कां सांगायला हवं ? मी जाणतों सारें !

सौभाग्यराज—येऊं तर ?

माभळभट—हें काय विचारणें ! ( सौभाग्यराज जातो ) आणि आपणहि आतां पाय काढावाच इथून. वेळ गमाविण्यांत अर्थ नाहीं. नाहीं तर पुरीच गच्छंति !–हा कोण येतो आहे आणखी इकडे ? ( बाबुलनाथ प्रवेश करितो त्यास ) कोण आपण ?

बाबुलनाथ—( हात जोडून ) युवराजांचा दासानुदास राजवैद्य बाबुलनाथ मी.

माभळभट—मग इकडं कां ? मी कांहीं आजारी नाहीं.

बाबुलनाथ—नाहीं, त्याकरितां नाहीं आलों मी, युवराज ! युवराज्ञीचा अंत झाला, तो माझ्या वृद्धाच्या औषधानं कांहीं नाहीं झाला; तर कुणी तरुण यतीनें कांहीं जडीबुटी दिली होती, तिनं झाला. हें कळविण्यासाठीं आलों आहे या पायाजवळ. कदाचित् ओंकारेश्वर म्हणेल, माझ्या चूर्ण वगैरेनेंचं असे विपरित झालं म्हणून. तेव्हां आधीं कळवून ठेविलं आहे मी इकडे.

माभळभट—यतीला आधीं सुळावर चढवा म्हणावं एकदम. मग ओंकारेश्वर काय म्हणेल तें पाहूं आपण.

बाबुलनाथ—पकडला तर आहेच त्या यतीला, हा आतां इतक्यांत.

धर्ममार्तंड भुलेश्वराचार्यांकडे सांपडला तो. ही आजची गडबड आटोपली कीं चढेलच तो सुळावर.

माभळभट—बरं ठीक. कळलं सारं. या आतां थांबलांत का ? जा ना आतां.

बाबुलनाथ——चाललोंच. पण जाण्यापूर्वी पायाजवळ एक विज्ञप्ति आहे दासाची.

माभळभट—काय ती ? बोला झटपट. वेळ नाहीं आम्हांला आतां.

बाबुलनाथ——विज्ञप्ति इतकीच, कीं आपण तर आतां जाणारच युक्‍राशीबरोबर.

माभळभट—हो तर ! मी तर आतां जाणारच.

बाबुलनाथ——आणि मीं तर ही कित्येक वर्षं एक मात्रा बनविण्याच्या विचारांत आहें.

माभळभट—बरं मग ? माझ्या जाण्याचा आणि तुमच्या मात्रेचा काय संबंध ?—बोला लौकर.

बाबुलनाथ—संबंध इतकाच, कीं ती मात्रा राजजामाताच्या डोक्याच्या कवचींत खलली पाहिजे, असं वैद्यकांत सांगितलेलं आहे. पण ती मिळण्याचा सुयोग कांहीं आजवर आला नव्हता; तो आज आला आहे.

माभळभट—म्हणून तुला माझ्या डोक्याची कवची देऊं ?—केव्हां ? आतांच कीं कसं ?

बाबुलनाथ—आपलें सहगमन झाल्यावर ती मला देण्यांत यावी, असें महाराजांना आपण आधीं सांगून ठेवावं आणि आर्यवैद्यकाची सेवा केल्याचें श्रेय संपादावें, इतकीच पायाशीं विज्ञप्ति आहे.

माभळभटः— पाय धरतों आणि डोकें फोडतों !—गाढवाच्या धसा !—अरे वैदू ! ( अंगावर धांवून ) आधीं तुझें डोकें फोडून तुझी कवची देतों तुला ! ( बाबुलनाथ पळून जातो ) राक्षस, माझी कवची मागतो मजजवळ. आतां गुंडाळावाच गाशा इथून. आणि करावा कुझ्यां ! ( समोर पाहून ) चिटपाखरूं नाहीं दिसत आसपास, आणि अंधारहि ठीक पडला आहे हवा तसा. हं, बघाच आतां विचार, इथून कूच करायचा, चतुरंग बळाधिपति !

नाहींतर तुमचें डोचकें गेलेच म्हणून समजा. चतुरंगबळ, राजवैभव, हीं अशीं क्षणभंगुरच नाहीं ?

तें हाय कसें मनोराज्य हें ठरलें! मनिं मांडे मनचे जिरले! धृ०

होईन भूप पोशिंदा भुवनींचा भिक्षुकवृंदा
देऊन मिष्टसुखकंदा आकंठ करिन मी भरलें! १
लादून दक्षिणा भारी भिक्षुकांस मी पोटभरी,
दक्षिणार्थ भांडागारीं वृषभही करिन मी भरले! २
गाजेन असा भूधामीं भिक्षुराज राजेश्वर मी!
मृत्योत्तर ही शुभनामीं त्रिभुवन हें करीन भरलें! ३

पण ती पुण्याई माझ्या कपाळींच नव्हती हें खास. तथापि, देवाधिदेवा, तशी पुण्याई ज्याच्या कपाळीं असेल, त्या पुण्यश्लोकाचीं पक्वान्नें करणाऱ्या बल्लवाच्या, किंवा दक्षिणाभारवाहक बैलाच्या तरी जन्माला मला घाल. अथवा, तितकेंहि पुण्यसंचित माझ्या पदरीं नसेल, तर त्या पक्वानांतील एखाद्या लाडूचा, किंवा दक्षिणाभारवाहक बैलाच्या कडब्यांतील एखाद्या काडीचा तरी देवा मला जन्म दे. किंवा, तेवढंहि या अभाग्याच्या नशिबीं नसेल, तर ज्या नगरींत भिक्षूंचीं सहस्र भोजनें, लक्ष भोजनें, कोटि भोजनें होतील, त्या नगरींत एखादा ढेकूण, पिसूं वा डांस होऊन तरी मला संचार करूं दे. झाली. या मामळभटाच्या राजप्रासादवासाची आतां अखेर झाली. पुनरपि कांहीं हा चौपद्रीचा ज्येष्ठ पुत्र जगाला या राजवेषांत दिसायचा नाहीं कुठेंहि. ( जातो )

---

## प्रवेश दुसरा

स्थळ:-राजप्रासाद.

[ सौभाग्यराज मंत्रिमंडळासह बसलेला आहे. ]

सौभाग्यराज—महामायेची आम्हांवर मोठीच अवकृपा, कीं आमचे महाबळेश्वरराज सहगमनाचें महत्पुण्य टाकून कुठं निघून गेले असून, अवघ्या नगरीभर शोध केला तरीहि सांपडत नाहींत. प्रत्यक्ष राजजामात, आणि या राज्याचे भावी अधिपतीच जर असं अधर्माचरणाचें उदाहरण प्रजेपुढें ठेवूं

लागले, तर प्रजेकडून तरी धर्माचरण कसं घडणार ? शिव ? शिव ! प्रजाजन आम्हांला आतां केवढीं दूषणें देतील ! पण आम्ही आपल्याकडून धर्माचरणाच्या बाबतींत कसे वागतों आहोंत, हें मंत्रिमंडळास विशेषतः आमचे धर्ममंत्रि धर्ममार्तंड भुलेश्वराचार्य यांना चांगलें ठाऊक आहे.

भुलेश्वराचार्य— तें मला काय ठाऊक नाहीं ? विष्णूचा अंश, अधर्माचरण होईल कसें ? पण प्रस्तुत प्रसंगीं महाराज एक गोष्ट विसरून गेलेले दिसतात.

सौभाग्यराज—कोणती ती धर्ममार्तंड ?

भुलेश्वराचार्य—ती हीच कीं, महाबळेश्वरराजांना सहगमन करण्याचें प्रयोजनच नाहीं.

सौभाग्यराज—म्हणजे ?

भुलेश्वराचार्य—विवाहविधींतील प्रमुख भाग जो लाजाहोम आणि सप्तपदी, तें राजकन्येच्या आजारीपणामुळें अद्याप होण्याचाच राहिला असल्यामुळें, महाबळेश्वरराज व राजकन्या यांचें लग्न धर्मशास्त्रदृष्ट्या पूर्ण झालेलेंच नाहीं. म्हणजे, त्यांचा पतिपत्नीसंबंधच अद्याप सिद्ध झाला नाहीं.

सौभाग्यराज—हो, असं खरं.

भुलेश्वराचार्य—याकरितां महाबळेश्वरराजांना सहगमनाचा अधिकारच नाहीं.

इतर मंत्री— खरं आहे महाराज. धर्ममार्तंडांचा शास्त्रनिर्णय अगदीं न्याय आहे.

सौभाग्यराज —महामायेची आम्हांवर मोठीच कृपा कीं, अधर्माचरणाचा प्रसंग टळला. एकूण, माझ्या निर्मलेचा विवाहच झाला नाहीं म्हणायचा ?

भुलेश्वराचार्य—होय असंच. तेव्हां त्यांचा और्ध्वदेहिक विधीच काय तो व्हावयाचा. महाबळेश्वर राजाच्या सहगमनाचा प्रश्नच उरत नाहीं आतां.

सौभाग्यराज—योग्य आहे तुमचं म्हणणं.

( पर्वति लगबगीनें प्रवेश करिते. )

पर्वति—महाराज ! महामाया पावली ! ताईसाहेबांचा पुनर्जन्म झाला !

नवलाचि बाई ॥ झालें हें कांहीं बाई ॥ ध्रु० ॥

श्वास सोडिती, नेत्र उघडिती !

लवमात्रीं मग उठून बसती ।
तात्काळ कशा बोलु लागती !
' झोंपचि काई ॥ आलि ती मला अंगाई !'

काय बाई, त्या यतीच्या औषधीचा हा गुण तरी !

सौभाग्यराज—काय ? माझी निर्मला उठून बसली ! निस्संशय ! यति कुणी महात्माच असला पाहिजे ! हरहर ! त्यांना आम्हीं शृंखलाबद्ध करून ठेविलं, हें केवढं महत्पातक घडलं आम्हांकडून ! जाऊन आधी त्यांची क्षमा मागूं द्या आम्हाला.

एक मंत्रि—आपण नको जायला महाराज ! मीच त्यांना शृंखलामुक्त करून घेऊन येतों इकडे.

सौभाग्यराज—जा. जा तर आधीं ! ( मंत्रि जातो ) आणि पर्वति, आम्हीं बाळेला पहायला आलोंच तिकडे, म्हणून तिला कळीव तिला.

पर्वति—जशी आज्ञा. ( जाते )

सौभाग्यराज—केवढं तरी आमचं महद्भाग्य कीं, आमची कन्या आम्हांला परत मिळाली. आपण मानव देवाधिदेवाला दूषणें देत असतों. पण तो दयानिधि आपलं बरं करण्याच्या विचारांत गुतलेलाच असतो. ( पूर्वोक्त मंत्रि यतिवेषधारी धैर्यधरासह प्रवेश करितो. सर्व उठून उभे राहतात; सौभाग्यराज धैर्यधराच्या पायावर लोटांगण घेत ) यतिराज क्षमा करा ! या मूढाला आपली महति कळली नव्हती. क्षमा करा.

धैर्यधर—( सौभाग्यराज उठवून ) राजाधिराज, आपल्याला मी कसची क्षमा करायची ? आपणच मला क्षमा करा. ( छद्म वेष टाकून, लोटांगण घालून, ) या धैर्यधरालाच आपण क्षमा केली पाहिजे.

सौभाग्यराज—कोण सेनापतिपुत्र धैर्यधर. ( त्यास उठवून ) तुम्हींच आपल्या औषधीनें माझ्या निर्मलेला पुनर्जन्म दिलात ?

धैर्यधर—होय महाराज. मला ती औषधी माझ्या वनवासांत लाभली होती.

सौभाग्यराज— आमच्या शत्रूनें जरी हें केलं असतं, तरी आम्हीं त्याला

आपलं सर्वस्व दिलं असतं. मग, तुम्ही तर काय आमचेच. तुमचे कोणतें इष्ट आम्हीं यावेळीं करणार नाहीं?

( पर्वति प्रवेश करिते )

पर्वति— ताईसाहेब आईसाहेबांसह इकडेच आल्या महाराज!

( निर्मला व महाराणी प्रवेश करितात. )

सौभाग्यराज —( निर्मलेस पोटाशीं धरून ) बाळे, तुला पुनर्जन्म देण्याकरिता महामायेनेंच कुमार धैर्यधरांनां परत आणलं. ही महामायेची केवढी तरी कृपा! अहाहा! आजचा हा केवढा आनंदाचा दिवस, कीं तूं आणि धैर्यधर आम्हांला नव्यानें लाभलांत! आता तुम्हां दोघानां एक करून, महामायेची स्पष्ट दिसत असलेली इच्छा पूर्ण करणं, इतकंच आमचं काम राहिलं आहे. ( निर्मलेचा हात धैर्यधराच्या हातीं देऊन ) धैर्यधरांचें तरी याहून दुसरं काय इष्ट असणार?

धैर्यधर:— होय महाराज. माझी दुसरीहि एक इच्छा आपल्याला पुरवायला हवी!

सौभाग्यराज:— कोणती? कोणती ती बोला आधीं. म्हणजे ती पूर्ण झालीच म्हणा.

धैर्यधर:— आपल्या राज्यांतील ही राक्षसी दांपत्यनीति—सहगमनाची ही संहारक रूढी,—हिचं निर्मूलन करा, महाराज!

रूढी न ही, राक्षसी मातली, सहगमनमिषें अवतरली,
राजशासनें जी वरिली! ॥ धृ० ॥ उच्छेद हिचा, हे राजवरा,
नतअभिनव जीवद स्वीकरा! जन शतायु होवोतसें करा!
प्रजा करा प्रतिपाळिली!

सौभाग्यराज:—तथास्तु!

— —

# पतिदेव !

## अंक पहिला

### प्रवेश पहिला

स्थळ:—चंद्राकराच्या वाड्यांतील पुढील चौक

[ यतिवेषधारी चंद्राकर घायाळ कालकेतूस सावरीत प्रवेश करितो. ]

चंद्राकर—हा पहा एक वाडा गांठला आपण.

कालकेतू—वाडा गांठला खरा यतिवर्य ! पण इथंच, या चौकांतच पडूं द्या मला ! आणि होऊं द्या, माझं काय व्हायचं तें इथंच !

चंद्राकर—असं म्हणून कसं चालेल कालकेतू ? मरण्यासाठींच जर तूं इथं आला असतास, तर मग त्या रानांतल्या लुटारूंशीं झुज तरी कशाला केलंस ? आणि सर्वांगावर हे वार तरी कशाला करून घेतलेस ?-कालकेतू ! इथं असा मरण्यासाठीं आला नाहींस तूं;—तर शूराशूरांचं द्वंद्व करण्यासाठीं आला आहेस तूं !—सेनापति चंद्राकराची पत्नी रोहिणीदेवी, हिच्या वतीनं कोणी वीरानं तुला द्वंद्वाचं आव्हान केलं आहे त्याशीं दोन हात करायला तूं इथं आला आहेस; नाहींस का ? तेव्हां मरायचंच तर, महाराजांसमोर त्या वीराशीं लढतांना मर ! क्षत्रियाला असलेंच मरण उचित !

कालकेतू—कोण ?—यतिवर्यच बोलताहेत हें ? हें वीर्योत्तेजक भाषण वैराग्यवृत्तीला विसंगत नाहीं दिसत का ?

चंद्राकर—वीरवृत्तीचा आणि खऱ्या वैराग्याचा विरोध नाहीं कालकेतू ! सत्याकरितां समर, म्हणजे ब्रह्मपदीं जाण्याचाच एक मार्ग होय !—

रण योग गणियला उच्च पहा ! ॥ धृ० ॥
प्रियजन गृहधन त्याग करोनी,
न्याय धर्म सत्यार्थ अहा,
रणरंगीं जे रंगति भीषण
गणिले योगी साच महा ! ॥ १ ॥

पण हा पहा, आपला तो प्राणदाता तरुण आपणाकडे येतो आहे! [ महाद्वारांतून धनुर्बाण घेतलेला व वस्त्रें आरक्त झालेला तारक प्रवेश करितो. ] वत्सा, रानांत मृगया सोडून तूं आमच्या रक्षणास धांवतानास, तर आम्ही आज जिवंत असतों का रे बा?

तारक—यतिराजांच्या पायांची पुण्याई ती!

चंद्राकर—नांव काय तुझं बाळ?

तारक—मला तारक म्हणतात.

चंद्राकर—वा! आम्हांला तारकच झालास तूं! परमात्मा तुला शतायु करो!-आणि परदुःख विमोचनाला असाच सर्वदा तत्पर ठेवो!

तारक—हे गृहस्थ कोण-कुठले?

कालकेतू—एक हतभागी प्राणी आहे मी मुला! याहून अधिक तें काय सांग?

चंद्राकर—या राज्यांतलेच एक महारथि आहेत हे! सांप्रत हे वानप्रस्थी असून, नगरापासून दूर खेड्यावर रहात असतात! लुटारूंशीं लढतांना अंगावर वार झाल्यामुळें यांना उभं रहाण्याचंहि सामर्थ्य नाहीं, तूं पहातोच आहेस! तर, तारक या वाड्यांत आसरा मिळेल का? हा कुणाचा वाडा? ( स्वगत ) हा माझाच-या चंद्राकराचाच वाडा असूनहि असा प्रश्न करावा लागतो आहे मला!

तारक—( विचार करून ) इथं आसरा नाहीं मिळणार यतिराज! मृतसेनापति चंद्राकर यांच्या पत्नी रोहिणीदेवी याच सध्यां या वाड्याच्या स्वामिनी आहेत!-मी त्यांचाच सेवक!—

चंद्राकर—मग कां बरं? कां नाहीं आश्रय देणार ती?

तारक—पतिनिधनानंतर कडकडीत एकांतांत कालक्रमणा करीत असतात त्या! तेव्हां आपला आंत प्रवेशहि होणं शक्य नाहीं! पण थांबा, आपल्या-सारख्या यतिवर्यांचं मागणं कदाचित् त्या अमान्य करणार नाहींत! तेव्हां कळवून येतों त्यांना आपलं म्हणणं!

चंद्राकर—जा जा ये कळवून! ( तारक जातो ) धीर धर कालकेतू! परमात्मा करील, तर आपल्याला आसरा मिळेल ह्या वाड्यात!

कालकेतू— पण ह्या वाड्यांत. आसरा मागण्यापेक्षां इथंच माझा प्राण गेला, तर काय वाईट ? जिच्या पतीला, चंद्राकराला युद्धावरून परत येतांना अरण्यांत मी यमसदनाला पाठविला, तिच्याकडे त्या ह्या रोहिणीकडे आसरा मागणं—

चंद्राकर—ठाऊक आहे मला तो सर्व कथाभाग !–तूंच सांगितला आहेस मला तो ! चंद्राकराला तूं कपटानें ठार करून त्याच्या भूलक्ष्मीचा अपहार केलास हें तूं मला सांगितलं आहेस !–ह्यामुळेंच रोहिणीदेवीनं कुणा वीराकडून तुला द्वंद्वाच आव्हान केलं आहे !–हें का मला ठाऊक नाहीं ?– पण तूं असा भीतिग्रस्त कां होतोस ? चंद्राकर आतां यमसदनीं गेला आहे, तो का तिथून परत येऊन तुझ्या पुढं उभा रहातो आहे ?

कालकेतु—तसं होतं, तर किती बरं होत ! त्याच्या वधाचं पातक तरी मला भोवतं ना !

चंद्राकर—असा धीर सोडूं नको ! कुणी सांगावं, या रोहिणीदेवीच्या आसऱ्याला आपल्याला पाठविण्यांत परमेश्वराचा कांहीं सद्धेतू नसेल म्हणून ?–

[ तारक व रोहिणी प्रवेश करितात. ]

तारक—या पहा रोहिणीदेवीच आपणाकडे आल्या आहेत !

रोहिणी—यतिवर्यांनां वंदन असो ! कोणतं इष्ट आहे आपलं ? या राज्यांतलेच आपण का ?

चंद्राकर—होय देवी ! या राज्यांतलेच आम्हीं ! ( स्वगत ) हर हर ! काय स्थिति झाली हिची !

हीच तीच काय मत्प्रिय कांता ? ॥ ध्रु० ॥
सुवर्णकेतकि ती अंगींची,
आरक्त छटा ती गालींची,
तिलकसुभगता ती भालींची,—
लोपुनि येई वसनधवलता ॥ १ ॥

स्वर्गप्रतिमा प्रभा वदानिंची,
दिव्य दीप्ती ती नेत्रींची,
रक्त रम्यता ती अधरींची,
लोपुनि येई केश—कृष्णता ! ॥ २ ॥

हा यतिवेष टाकून प्रगट होऊं का ! पण माझ्या आकल्पित येण्यानं हिला हर्षवायूहि होण्याची भीति आहे !—तेव्हां, थोडा धीर धरावाच !

रोहिणी—यतिवर्यांना संकोच वाटतो आहेसं दिसतं ! बोलावं काय इष्ट आहे तें !

चंद्राकर—कांहीं काल इथंच वास घडावा, इतकीच इच्छा !

रोहिणी— निर्भय रहावं !-अनुग्रहच होईल हा या अभागिनीवर !—पण एक गोष्ट मात्र विचारतें; राग नसावा ! माझ्या सौभाग्यावर घाला घालणारा तो कालकेतू आपल्या खेड्यावरून इकडे नगरास यायला निघाल्याचं ऐकलं मी ! तेव्हां, तो किंवा त्याच्या सेवकांपैकीं कुणी लपून येणार नाहीं ना इथं आपल्या परिवारांत ?

चंद्राकर—देवीनं त्या बाबतींत निर्भय असावं ! माझे हे मित्र !—हेच माझा सर्व परिवार होत ! रानांत लुटारूंशीं झुंजतांना वार झाले आहेत यांना ! एखाद्या निवाऱ्याच्या खोलींत पडून रहाण्याची सोय व्हावी यांची !

रोहिणी—ने तारका त्यांना आंत.

[ तारका कालकेतूस घेऊन जातो. ]

चंद्राकर—गेलीं अठरा वर्षे वैधव्यताप काढते आहेस नाहीं तूं देवी ?

रोहिणी—दैवापुढं कुणाचं चालणार? त्याचे भोग, सुखाचे तसे दुःखाचे, भोगलेच पाहिजेत !

चंद्राकर—तुझ्या ह्या दुर्भाग्य स्थितींतच तुला प्रथम पहात नाहीं मी ! तुझ्या सौभाग्यांतहि पाहिलेली आहे देवी तुला मी !—माझ्या आवाजावरून तूं मला ओळखशील, असं वाटलं होतं मला ! पण अजूनहि ओळखित नाहींस ना ?

रोहिणी—आपला आवाज मी कुठं तरी ऐकल्यासारखा वाटतो; पण कधीं—कुठं तें नाहीं सांगवत ! केवळ स्वप्नांत ऐकल्यासारखा वाटतो तो !

चंद्राकर—तुझ्या सौभाग्यकाळीं मी असा त्रिदंडधारी यति नव्हतों !—तर गदाखड्ग धनुर्धारी वीर होतों. आजच्याप्रमाणें शत्रुमात्राला 'शतायुभव' असा आशीर्वाद देण्याकरितां मी तेव्हां आपले हात उचलीत नसे; तर त्याला यमलोक दाखविण्याकरितां मी तेव्हां उचलीत असे !

रोहिणी—मग तिकडच्या परिचयाचे असाल आपण ?

चंद्राकर—चंद्राकराचा मी मित्र होतों इतकंच नाहीं तर शत्रूचं नांव काढतांच दोघांच्या अंगांत एकच रक्त उसळत असे !

रोहिणी—मग त्या दुष्टाला,—कालकेतूला ओळखीत असालच आपण ! ज्यानं मला सौभाग्याला मुकविलं, त्या दुष्टाला शासन देणं हें माये ! तुझ्या एकटीकडेच यावं ना ? [ तारक व वाग्भट प्रवेश करितात ] पण त्याचा सूड उगवायला तुला धाडला आहे, नाहीं का तारका ? ती माया माझ्या या वीराला साहाय्य करून त्या दुष्टाचं शासन केल्यावांचून राहील ? वाग्भट, यतिवर्यांच्या सेवेला असा तुम्ही ! ( तारकासह जाते. )

वाग्भट—चालावं आंत यतिवर्य !

( चंद्राकरासह जाते. )

---

## प्रवेश दुसरा

स्थळ—एक आड दालन.

[ चंद्राकर व वाग्भट प्रवेश करितात. ]

चंद्राकर—या तारकाचा आणि देवींचा कांहीं आप्तसंबंध तर नाहीं, वाग्भटजी ?

वाग्भट—तसा आप्तसंबंध तर नाहीं अद्याप त्यांच्यांत ? आपत्संबंध मात्र असण्याचा संभव आहे !

चंद्राकर—म्हणजे ? मी नाहीं समजलों !

वाग्भट—आपत्संबंध म्हणजे आपद्धर्म म्हणून जडलेला संबंध ! तसं कोणी सांगावं ?

चंद्राकर—देवींनं त्याच्याकडे कसं प्रेमदृष्टीनें पाहिलं हो ! तोहि तिच्या दृष्टीस दृष्टि भिडवून पहात होता !

वाग्भट—पाहिलं मी तें ! नेहमी पहातों आहें !

चंद्राकर—तिच्या मनावर त्याचं कांहींतरी गूढ सामर्थ्य आहे खास ! त्यानं दृष्टिक्षेप करतांच तिचा दुःखावेग कसा ओसरून गेला क्षणांत !

वाग्भट—चालायचंच असं ! अठरा वर्षांपूर्वी अठराव्या वर्षी वैधव्य आलेल्या देवीनं, हीं अठरा वर्षं कशीं घालवायचीं ? जीव कुठं तरी जडल्या असल्याविना शक्यच नाहीं ! या अठरा वर्षांच्या तारकावर तो जडला, तर काय नवल ?

चंद्राकर—हे मनोविकार दाबून ठेवणं किती दुष्कर झालं आहे मला ! आणि त्याबरोबर माझं खरं रूपहि झाकून ठेवणं दुष्कर होतं आहे वाग्भट मला. ( तोंड जवळ नेऊन ) ओळख वाग्भटा ! आता या चंद्राकराला ! ओळखलास ?

वाग्भट—( दचकून ) कोण ! यजमान-आपणच का हे ?—थांबा, मला नीट पाहूं द्या !—होय, आपणच. या छद्मवेषानं आणि शुभ्रकेशानं आपण तेच आमचे चंद्राकर असं मला—पुराण्या आश्रितालाहि ओळखायला कठीण झालं आहे पहा !—पण जीवंत होऊन आपण परत कसे आलांत ?

चंद्राकर—विजयश्री मिळवून सैन्य इकडे पाठविल्यावर मागाहून मी येत असतां, अरण्यांत कालकेतूनं माझ्या पाठीवर खड्गप्रहार केला ! तेव्हां मी बेशुद्ध होऊन पडतांच, माझा अंत झाला असें मानून तो इकडे धांवला ! 'चंद्राकर पराभूत होऊन रणीं पडला व विजयश्री आपणच मिळविली,'—असें महाराजांना सांगून या कालकेतूनं माझी यशःश्री व भूलक्ष्मी मिळविली हें तुला ठाऊक आहेच !—तिकडे मी शत्रूच्या हातीं आसन्नमरण स्थितींत सांपडलों ! मायेच्या कृपेनें लौकरच बरा झालों खरा; पण माझ्या दुर्दैवानं हीं गेलीं अठरा वर्षं मला शत्रूच्या कारागृहांत कंठावी लागलीं !

वाग्भट—पुढें—तिथून सुटलांत कसे ?

चंद्राकर—तें नाहीं सांगत बसत आतां ! महत्प्रयासानें तिथून सुटून इथं आलों आहें, तूं पहातो आहेसच !

वाग्भट—पण आपली आणि कालकेतूची ही पुनः गांठ कशी पडली ?

चंद्राकर—या यतिवेषानं इकडे येत असतां आज सकाळीं रानांत एके

ठिकाणीं मला हा कालकेतू लुटारूंच्या हातीं पडलेला दिसला ! अपकाराची फेड उपकारानच करण्यांत खरं सुख असतं वाग्भटा !—त्याप्रमाणें मी त्याच्या मुक्ततेकरतां धांवलों ! तितक्यांत हा तारकहि मृगया सोडून आमच्या साह्याला धांवला ! त्यानंच कालकेतूला व मला देखील लुटारूंच्या हातून सोडविलं !

वाग्भट—आणि इकडचं वर्तमान कुणी कळविलं आपल्याला ?

चंद्राकर—कालकेतूनं ! त्यानं माझा वध केल्याचंहि सांगितलं मला !

वाग्भट—स्वतः कबूल केलं !

चंद्राकर—कृतकर्माचा पश्चाताप होऊन, त्यानं सर्व कांहीं सांगितलं मला! उद्यां महाराजांनापुढं द्वंद्वाला उभं रहायला आला आहे तो ! पण माझ्या वधाचं पातक आपल्या हातून घडलं या भावनेनं त्याच्या बाहूंत खड्ग धरण्याचं तरी सामर्थ्य कुठं उरलं आहे ? पण हें बघ वाग्भटा, माझं खरं रूप आणखी कांहीं काळ गुप्तच राहिलं पाहिजे हो ! ती बघ ! रोहिणी आणि तो तारक इकडेच येताहेत ! अरेरे ! मला पहावतहि नाहीं त्यांना एकत्र ! चल. आपण त्या तिकडे जाऊं कसे ! [ जातात ]

---

## प्रवेश तिसरा

स्थळ—दिवाणखाना.

[ रोहिणी व तारक प्रवेश करितात ]

रोहिणी—पूर्वाश्रमीं हे यतिवर्य तिकडचे मोठे मित्र होते, हो तारका ! तेव्हां त्यांच्या सेवेंत दुर्लक्ष होऊं देऊं नका, म्हणून सांगून ठेव वाग्भटजीला!-बर ! असं विचारत्यें कीं तुला मी अगदीं माझ्या मुलासारखं लेखित आल्यें, याचं नवल वाटत असेल तुला नाहीं ?

तारक—नवल वाटूनच कसं राहील आईसाहेब ! मला पुत्रवत् मानतां, याची मला खरोखरच धन्यता वाटते ! देवीचं उपकार-ऋण माझ्यानं कधीं तरी फिटेल का ?

रोहिणी—ती वेळ जवळ आली आहे तारका ! उद्यांच ! तिकडच्या वधाबद्दल त्या दुष्टाचा--कालकेतूचा सूड घेण्याकरितां माझ्या वतीनं तूं त्याला

इंद्राचं आव्हान केलं आहेस ! तेव्हां माझ्या तुझ्यावरच्या प्रेमाचं काय साफल्य करायचं तें उद्यांच ! समजलास ?

तारक—हा देह जसा देवीच्या अन्नाचा, तसा हा जीवहि देवींच्याच प्रेमाचा ! देवीकरितांच आजवर तो या देहांत वागवितों आहे ! देवीच्या सेवेंत या दोहोंचीहि किंमत मला सारखीच आहे !

रोहिणी—बाळा ! लाडक्या ! ( त्याला पोटाशीं घेऊन ) विश्वशक्ति महामाया उद्या तुशी पाठराखी होवो !–बाळा, हा उमाळा पाहून तुला आश्चर्य वाटेल ! पण मीच तुला जन्म दिला आहे ! तेव्हां—

तारक—आईसाहेब ! काय ! मी स्वप्नांत तर नाहीं !

रोहिणी—स्वप्नांत नाहींस तं तारका. मीच तुझी माता ! पण ही गोष्ट तं उद्यापर्यंत गुप्त ठेविली पाहिजेस ! तिकडच्या वधाबद्दलचा सूड तुजकडून घेतला जावा, म्हणून तुझ्या जन्माची वार्ता मी आजपर्यंत जगापासून आणि तुजपासूनहि गुप्त ठेविली ! तसं न करितें तर, तो अधम कालकेतू तुजवरहि उठायला मागेंपुढें पहाता का ? बाळा, स्वारी युद्धावर गेली तेव्हां मला दोन महिने लोटले होते ! तेव्हां तिकडेहि तुझ्या अस्तित्वाची कल्पना नव्हती ! गेल्यानंतर पंधरा वीस दिवसांतच तिकडचं तसं झाल्याची ती दुष्ट वार्ता आली ! त्यानंतर मी तुझ्या अस्तित्वाची कुणालाच कल्पना होऊं न देण्याची दक्षता ठेविली ! एका वृद्धेला तेवढं सारं ठाऊक ! जनदृष्टीला, तूं मातृपितृहीन पोरका म्हणूनच तुझा आम्ही सांभाळ करितों असं दिसलं, तर त्यांत नवल काय ? पण तसं दिसलं म्हणूनच आज तुला तुझ्या जन्मदात्याच्या वधाबद्दल सूड उगवायची संधि मिळत आहे बरं ! तेव्हां बाळा तुझ्या जन्माचं सार्थकच उद्यां व्हायचं आहे, हें लक्षांत वाळग ! इतकं केलंस, म्हणजे माझी जीवनयात्रा उद्यां संपवितांना मला केवढं कृतकृत्य वाटेल म्हणून सांगूं ?

तारक—काय ! उद्यांच सहगमन करणार आईसाहेब !–आई !

रोहिणी—होय लाडक्या ! तुझा जन्म झाला त्याचदिवशीं मी तें ठरविलं आहे ! तूं अठरा वर्षांचा होशील, त्याचदिवशीं तुजकडून सूड घेववायचा, आणि त्याचदिवशीं मी सतीचं वाण घ्यायचं,–हें तुझ्या जन्मदिवशींच मी

ठरविलं आहे ! त्याप्रमाणें उद्यां तूं अठरा वर्षांचा होणार व माझे मनोरथ पूर्ण होणार !– बाळा !–

तारक—आई ! मी मातृहीन नाहीं हें मला आज कळतं !

रोहिणी—लाडक्या !

माता ती साची माया ! धृ० ॥
सधननिर्धनीं ज्येष्ठकनिष्ठीं
    ठवी जी रविवत् दृष्टी,
सिंधू साक्षात् वात्सल्याची ! ॥ १ ॥
मातापुत्रादिक मनुजाचे
    पाश विनाशी संसृतिचे !
ऋणानुबंधनें न अक्षयिचीं ! ॥ २ ॥

पण या जन्मीं आपला हा पाश तुटण्यापूर्वीं तुझ्या जन्मदात्याच्या शत्रूला तूं त्याच्याच रक्तानं स्नान घातलेलं मला पाहूं दे ! म्हणजे तो मायापाश तोडायला मला जड नाहीं वाटणार !

तारक—क्षात्रधर्माला भूषणभूत अशा सेनापति चंद्राकरांचंच रक्त माझ्या अंगांत सळसळतं आहे, नाहीं का ? मग ती काळजी कां तुला ? माझं खड्ग कोशाबाहेर निघतांच त्या कालकेतूचे बाहू गलित झालेच पाहिजेत ! शिवाय, सत्याची कैवारी महामाया, असत्याची शास्ती अशी ती विश्वशक्ति, आपल्या पक्षाची असल्यावर, माझ्या विजयाविषयीं शंका कां ?

रोहिणी—( आलिंगून ) तुझ्या पित्याचं शौर्य आणि सत्यनिष्ठा तुझ्यांत उतरलेलीं पाहून मला किती धन्यता वाटते बाळा !—ती पहा !—तिकडची स्वारी तुला आशीर्वाद देते आहे !—पति ! पतिदेव ! माझे जीवनाधार ! पतिदेव !

[ मागील दारांत वाग्भट प्रवेश करून उभा रहातो ]

वाग्भट—( स्वगत ) पति !—पतिदेव ! या तारकाला पतिदेव म्हणून कवटाळताहेत बाईसाहेब !

रोहिणी—( मागें पाहून ) कोण ? वाग्भटजी ?

वाग्भट—महाराजांकडून सुदर्शन येणार आहेत आपल्या भेटीला म्हणून आपल्याला कळवायला मनुष्य आला होता त्यांचा!

रोहिणी—ठीक! ते आले कीं कळवा मला!

(तारकासह जाते)

वाग्भट—(स्वगत) शिव, शिव, शिव, शिव! शंका फिटलीच माझी! (जातो)

---

# अंक दुसरा

## प्रवेश पहिला

स्थळ—एक आडदालन

(चंद्राकर व वाग्भट प्रवेश करितात.)

चंद्राकर—बोल! स्पष्ट सांग मला काय पाहिलंस तें! शपथ आहे माझी!

वाग्भट—निरुपायच झाला! सांगतोंच तर! एक अर्धी घटका झाली असेल, मी त्या पलीकडच्या दिवाणखान्यांत गेलों होतों! तों देवी त्या तारकाला आलिंगन देताहेत, असा देखावा दृष्टीस पडला! आणि 'पति!' 'माझे जीवनाधार' 'पतिदेव' असे त्यांच्या तोंडचे शब्द कानीं पडले!

चंद्राकर— अरेरे! पण तूं जागाच होतास ना तेव्हां!

वाग्भट— यावेळीं मी जितका जागृतींत आहें, तितकाच तेव्हांहि होतों!

चंद्राकर—खोटं सांगून फसविशील हें शक्य नाहीं! तुला माझा देवा-दावा थोडाच साधायचा आहे.? '–पतिदेव'–माये! या वेदना देण्यापेक्षां यापूर्वींच कां नाहीं माझा अंत केलास?

वाग्भट—आपल्या जीवाला या यातना द्यायला हा दुर्दैवी वाग्भट आजवर जीवंत तरी कशाला राहिला?–शिव शिव!

चंद्राकर—तुझा यांत कसला दोष वाग्भटा? या चंद्राकराच्याच दैवाची ही लीला आहे! आजन्म रणांत वावरत असतां, प्रत्यक्ष मृत्युमुखीं वावरत असतां शत्रुच्या शरवृष्टींतल्या एखाद्या शरानं कां नये गतप्राण होऊं मी? किंवा त्या कालकेतूच्या खड्गाघातानं किंवा कारागृहांतल्या खडतर तापानं

कां नये यमसदन पाहूं मी ? दैवाला ही आजची लीला दाखवायची होती, म्हणूनच ना ?

वाग्भट—दैवापुढं कोणाचं चालायचं आहे यजमान ? म्हणुन त्याबद्दल दुःख करून घेणं निष्फळ नाहीं कां ?

चंद्राकर—खरं म्हणतोस तूं ! दैवापुढं कोणाचं चालत नाहीं ! म्हणुनच त्याच्या लीला निर्विकारपणें पहात रहाव्यात.

दैव रचितसूं स्वयेंच आपण, गतजन्मीं कृति करुनि कणकण ! ॥ धृ० ॥
शिशु मातेचें पी एक स्तन, करगत करि परि दुसरें काय न ?
सुकृतिं दुष्कृतीं त्यासम आपण पर जन्मि करितसूं इष्टसाधन ! ॥ १ ॥

म्हणुनच याबद्दल दुःख करणं निष्फळ होय ! खरं वैराग्य तें यांतच ! वाग्भटा, मला आतां असाच विरागी झालं पाहिजे ! खराखुरा यति होऊन ह्या सांप्रतचाच वेष निरंतरचा केला पाहिजे ! आणि हें अरण्यच गृह केलं पाहिजे ! माये ! जगन्माये ! तुझं खरं रूप आज तूं मला दाखविलंस !

वाग्भट—अशी घाई करूं नये महाराज ! दरबारांतून सुदर्शन आतां इतक्यांत येतील देवींच्या भेटीला ! उद्यांच्या द्वंद्वासंबंधीं बोलायला ते येताहेत इथं ! आणि ते तर आपले अगदीं जीवाचे मित्र आहेत, तेव्हां त्यांना ह्या सर्व प्रकार कळवून त्यांच्या विचारानं काय करायचं तें करावं !

चंद्राकर—ठीक आहे तुझं म्हणणं ! माझे मित्र सुदर्शन यांनाच मी आतां देवाच्या ठिकाणीं मानतों आणि त्यांच्याच हातीं भवितव्य देतों आपलं ! ( जातात )

---

## प्रवेश दुसरा

### स्थळ—एक खोली

( कालकेतू शय्येवर पडलेला असतां, चंद्राकर प्रवेश करितो )

कालकेतू—किती वेळांत तरी यतिवर्यांचं दर्शन नाहीं लाभलं ! माझ्यासारख्या दुःखी जिवाला एकांत म्हणजे यातनांची परमावधि, हें यतिवर्यांना सांगायला का हवं ?

चंद्राकर—म्हटलं, झोंप मिळेल तुला कांहीं म्हणुन नाहीं आलों इतका वेळ इकडे! लागली होती तरी झोंप थोडीशी?

कालकेतू—झोंप! डोळे मिटण्याचा अवकाश, कीं चंद्राकर माझ्यापुढं दत्त उभा! भयभीत होऊन डोळे उघडावेत व उठून बसावं असं होतं आहे सारखं!

चंद्राकर—पण असं विचारतों; चंद्राकराच्या वधाला इतकीं वर्षं झालीं, अठरा वर्षं झालीं म्हणून सांगितलंस! एवढ्या दीर्घ काळांत असं नाहीं झालं कधीं तुला—आणि आजच असं कां व्हावं?

कालकेतू—त्याचं कारण आपलं दर्शन आणि सहवास, यतिवर्य!

चंद्राकर—म्हणजे! तें कसं?

कालकेतू—आपल्या दर्शनसहवासानं माझी अंतर्जागृति होऊन आजवरची निद्रा उडाली व माझ्या हातून घडलेल्या पातकांची जाणीव होऊन, त्या जाणिवेला वाणीहि फुटली! तसाच, कृतकर्माचा पश्चात्ताप मला जाळूं लागला! हा सगळा आपल्या दर्शनाचा परिणाम नव्हे का? यतिवर्य दिसले, कीं प्रत्यक्ष चंद्राकर माझ्यापुढं उभा दिसतो, इतका आपला व माझ्या अंतर्जागृतीचा निकट संबंध जडला आहे!

चंद्राकर—तें खरं कालकेतू! पण खड्गवारानें आलेल्या शारीरिक दुर्बलतेमुळें मनहि दुर्बल झालं आहे तुझं! तेव्हां थोडं खा आधीं, आणि स्वस्थ झोंप घे! म्हणजे मग चंद्राकराची व्यर्थ भीति नाहीं वाटणार तुला!

कालकेतू—जिला मी या हातानें वैधव्यामींत लोटली तिनं घातलेले दोन घास खाण्यापेक्षां मी उपाशीं मेलों तरी बेहेत्तर! आणि झोंपेविषयीं म्हणाल तर, ती यायलाच नको असं वाटतं हो मला! हा आतांच त्या रानांतल्या लुटारूशीं घडलेला प्रसंग पाहिला मी डोळे मिटून! लुटारू मला ठार करणार, तों आपण धांवून आलांत व त्याला ठार केलंत, म्हणून मी आपले पाय धरणार तोंच डोळे वर करून पहातों, तर आपण यतिवर्य नसून, मी ज्याचा वध केला, तो चंद्राकरच आपण!

चंद्राकर—स्वप्नांत दिसलं तुला असं?

कालकेतू—होय यतिवर्य!—आणि आतां जागेपणीं काय दिसलं मला

यानंतर तेंहि सांगतों आपल्याला. चंद्राकराला पहातांच मी आरोळी फोडून जागा झालों व भीतीनं शय्यात्याग करून धांवत सुटलों तों एका दारावर जाऊन आदळलों ! आघातानें तें दारच उघडलें; व काय चमत्कार !—आत मला एक देवघर, आणि त्यात श्वेत पाषाणाची चंद्राकराची मूर्ति हीं दिसून आलीं ! मूर्तीच्या दोन्ही बाजूला सुवर्णदीप जळत असून सुगंध पुष्पांनीं मूर्तीची पूजा केलेली पहातांच मी मूर्तीपुढें शिरसाष्टांग नमस्कार घातला !–इतक्यांत पतिव्रता रोहिणीदेवी व आपले प्राणरक्षक तो तारक हीं तिथं आलीं. त्यांना पहातांच मी उठून इकडे आपल्या शय्येवर येऊन पडलों !

चंद्राकर—जागृतींत पाहिलंस सगळं हें ?

कालकेतू—पूर्ण जागृतींत !

चंद्राकर—बरं आतां उद्यांच्या द्वंद्वाच्या तयारीला लाग कालकेतू !

कालकेतू—द्वंद्वाची तयारी ती काय करायची ? चंद्राकराचे प्राण घेणाऱ्या या बाहूंत, त्याच्या पत्नीनं खड्ग उचलणाऱ्या वीराशीं लढण्याचं सामर्थ्य कुठं आहे आता ?

चंद्राकर—असं म्हणून नाहीं चालायचं ! क्षात्रधर्माला हें शोभतं का ?–बरं, चल आतां भोजनाला मग बोलूं त्याविषयीं अधिक ! ( स्वगत ) माझी मूर्ति करून तिचं पूजन करते ही !—पण ती सर्वसाक्षी जगन्माया फसेल का या ढोंगानं ? ( जातात. )



## प्रवेश तिसरा

स्थळ—दिवाणखाना

[ रोहिणी बसलेली आहे; कालकेतू प्रवेश करितो ]

कालकेतू—देवी ! जातों मी आतां ! घेतों आपला निरोप !

रोहिणी—म्हणजे ! या रात्रीच्या वेळीं कुठं जाणार तुम्ही ? वार झालेले आहेत अंगावर ! बरे तरी होऊं द्या ते !–पतिवर्यांचे तुम्हीं स्नेही ! त्यांना सोडून कसे जातां ?

कालकेतू—देवि ! तुमच्या औदार्याचं ऋणि व्हावं असं कोणाला वाटणार

नाहीं ! पण माझ्या बाह्यांगावर झालेल्या वारांची किंमत ती काय ! अंतरंगावर झालेले वार जोंपर्यंत बरे होण्यासारखे नाहींत, तोंपर्यंत हे बरे झाले काय, आणि न झाले काय, सारखंच !

रोहिणी—तुमचं कुणी आप्त सुहृद् तर तुम्हांला सोडून गेलेलं नाहीं !

कालकेतु—नाहीं देवि ! तुम्हीं म्हणतां तसं कारण नाहीं माझ्या मनोवेदनांचं !

रोहिणी—मग काय, सकाळीं रानांत तुम्हांला लुटारूंनीं लुटलं, त्यांत तुमची धनहानि झाली तिचं दुःख होतं आहे तुम्हांला ?

कालकेतू—देवि ! आप्तसुहृद्, धनसंपत्ति हीं ती जगन्मायाच देणार, आणि तीच नेणार ! मायेचं आपण घेतलेलं ऋण तें ! म्हणून त्यांच्या वियोगानं होणाऱ्या वेदना विचारानं तितक्या दुःसह होत नाहींत ! पण माझ्यासारख्या पातक्याच्या मनोवेदना कशानं तरी सुसह होणार आहेत का ?

रोहिणी—असं जर असेल, तर यतिवर्यांसारख्यांच्या सन्निधच तुमचा काळ गेलेला बरा नव्हे का ? त्यांच्या सहवासांतच मनस्ताप नाहींसा होऊन तुमच्या जीवाला शांतिसमाधान लाभेल !

कालकेतू—त्यांच्या सहवासाचा लाभ मला झालाच देवी ! पण खरी शांति माझ्या जीवाला ते कशी देणार ? ती द्यायला एकच व्यक्ति समर्थ !—आणि ती स्वतः तुम्हीं रोहिणीदेवी ! तुमच्या पतीचा वध करणाऱ्या या कालकेतुला क्षमा केली असं म्हणा देवि ! म्हणजे ती शांति मला लाभलीच !

( रोहिणीचे पाय धरावयास जातो )

रोहिणी—( उठून दूर होऊन ) कोण ! काळसर्पा तूं का ! तुलाच या वाड्यांत मी आसरा दिला होता इतका वेळ ! दुष्टा ! निघ येथून ! पाषाणाशीं करुणादान माग ! झुंजवायूशीं दयेची याचना कर ! आणि मग माझ्याशीं क्षमा मागायला ये ! चल ! कर तोंड काळें इथून !— पण अजून हा वाडा कसा कोसळला नाहीं तुझ्या पातक्याच्या स्पर्शानं !—चांडाळा, हो चालता इथून !

कालकेतू—क्षमा नाहीं, तर मृत्यु तरी दे ! तो देशील तेव्हांच हलेल इथून

हा पातकी ! तुझ्या सेवकांच्या खड्गांनीं माझ्या वेदनांतून मुक्तता तरी होऊं दे माझी ! एवढं तरी दयादान कर मला ! ( नमस्कार घालतो )

रोहिणी—तुला दयादान ! अरण्यांत तिकडच्या पाठींत खड्ग खुपसलंस तेव्हां आली का तुला दया लवभर ? राक्षसा ! अवघी धरणी दुःखानं हलली ! असलं घोर कर्म करतोस आणि माझ्याशीं दयादान मागतोस ? [ तारक प्रवेश करितो, त्यास ] हा बघ ! ज्यानं तिकडचा वध केला, तोच दुष्ट कालकेतू हा !

तारक—कोण ! तो दुष्ट कालकेतू हा ! अधमा ! ऊठ ! आणि काढ आपलं खड्ग बाहेर !

ऊठ रे ! काळ हा तूझा ठाकला ! ऊठ झडकरी !
ऊठ रे ! क्षत्रिया पोटीं जन्म तूं घेतलां जरी !

कालकेतू—कर वार तुझ्या खड्गाचा या कंठावर ! उपकारच होतील मजवर ! ( उठून बसतो )

रोहिणी—नको तारका ! तो महापातकी असला तरी यावेळीं खड्गहीन असून मृत्युपंथास लागलेलाच आहे !

कालकेतू—आणि पश्चात्तापाच्या असह्य वेदनांनीं पराजित झालेलाहि नाहीं का हा ? चंद्रकराच्या वधानं लाभलेली सर्व भूलक्ष्मी तुझी तुला परत देतों मी ! आणि एकच मागणं मागतों शेवटचं ! तें इतकंच कीं, यतिवर्यांनीं तुमचा कांहींहि अपराध केलेला नाहीं; तेव्हां त्यांना ताप नका देऊं !—माये ! क्षमा कर या पातक्याला ! ( बेशुद्ध पडतो )

रोहिणी—आतां क्षणार्धांत प्राणान्त होईल याचा !—ते पहा, यतिवर्य येत आहेत इकडे !—आणि ते कोण ?—सुदर्शन ! मघां ते इथून गेले, पण पुनः आले वाटतं ! त्यांची नि यतिवर्यांची पूर्वाश्रमींची ओळख दिसते !—मी जाते आंत तारका ! तूं रहा इथंच ! पुनः शुद्धीवर येऊन बोलूं लागलाच हा दुष्ट, तर तिकडच्या वधाची कबुली ऐका म्हणावं दोघांनींहि [ जाते; दुसरीकडून चंद्राकर व सुदर्शन प्रवेश करितात. ]

तारक—हा पहा दुष्ट कालकेतु क्षणांत ‘ राम ’ म्हणेल आतां ! चंद्राकरांच्या वधाची याची कबुली ऐकायला बरे आलांत वेळेवर !

सुदर्शन—यतिवर्यच ऐकतील ती ! आपण जरा त्या तिकडं जाऊं तारका ! थोडं बोलायचं आहे तुझ्याशीं ! ( तारकासह जातो )

चंद्राकर—( मोठ्यानें ) कालकेतू ! कालकेतू !

कालकेतू—( शुद्धीवर येऊन ) माये !

चंद्राकर—मला ओळखलंस तूं ?

कालकेतू—यतिवर्य ! आपणच का ? पण मला पापराशीला स्पर्शहि नका करूं तुम्हीं ! ज्या या हातानं चंद्राकराचा वध केला, तो हातीं नका घेऊं तुम्हीं !

चंद्राकर—चंद्राकराचा वध नाहीं केलास तूं कालकेतू ! मी चंद्राकरच सांगतों आहे तुला हें !

कालकेतू—कोण ! चंद्राकर ! चंद्राकर ! ज्यांचा मी प्राण घेतला, तेच तुम्हीं !

चंद्राकर—प्राण नाहीं घेतलास माझा तूं ! मला तूं पाठीवर केलेला वार शत्रूच्या कारागृहांत बरा झाला !

कालकेतू—चंद्राकर ! तुम्हींच ते का ? क्षमा करा तर मग मला !

चंद्राकर—मी तर क्षमा केलीच आहे ! तो दयासिंधू ती मान्य करो !

कालकेतू—तुम्हीं दयासिंधूच आहांत ! अहाहा ! आतां मी सुखानं मरतों!—माये !—रामा ! तुझी लीला अतर्क्य—आहे ! ( मरतो )

चंद्राकर—( स्वगत ) खरंच अतर्क्य !

नेवो प्रभू तुजशि सद्गतीतें ।। धृ० ।।
विगत मत्संसृती— रथ करिशि तरि मती
अशुभ तें सर्वही—सर्वही विसरती,
इच्छिती शुभच तें—शांति तूंतें ।। १ ।।

( जातो. )

---

## प्रवेश चवथा.

स्थळ—देवघर

[ चंद्राकराच्या मूर्तीपुढें रोहिणी हात जोडून बसली आहे. ]

तारक—( स्वगत ) आई ध्यानस्थ दिसते ! घटकान् घटका ती माझ्या स्वर्गस्थ पित्याच्या या मूर्तीपुढं अशी ध्यान धरून बसलेली असते !

स्वर्गींचे जीव का ॥ पाहती ऐहिका ? ॥ धृ० ॥
मानवी ते कृती ॥ सत् असत् जाणती ?
पाश न तोडिती ॥ प्रेममय तो निका ? ॥ १ ॥

पण आईची ध्यानस्थ स्थिति ढळलेली दिसते !

रोहिणी—( डोळे उघडून ) कोण ! बाळा तारका !

तारक—होय आईसाहेब ! ( वांकून मूर्तीला नमस्कार करतो; तों त्याच्या वस्त्रांतून कंकण गळून पडतें; दोघांचेंहि त्याकडे लक्ष जात नाहीं. )

रोहिणी—बाळ, मी आतां ध्यानस्थ असतां एक चमत्कार पाहिला !

तारक—काय काय तो आई ?

रोहिणी—तिकडच्या या मूर्तीच्या ठिकाणीं, बाळा, ते यतिवर्य उभे असलेले दिसले मला ! आश्चर्यचकित होऊन त्यांच्याकडे पहात राहिल्यें, तों मधुर स्मित करून ते अदृश्य झाले व ही मूर्तीच फक्त मला दिसूं लागली !

तारक—चमत्कार खराच हा ! पण या पूर्वी कधीं ध्यानस्थ असतां दिसले होते का यतिवर्य मूर्तीच्या ठिकाणीं ?

रोहिणी—कधीं-कधीं नाहीं पूर्वी !

तारक—मग आतांच्या या दृष्टांताचा अर्थ काय करायचा आई ? पण ( वस्त्रांत कंकण शोधतो; तें हातीं न लागल्यामुळें सभोंवार जमीनीवर पहाता रोहिणीहि तो काय शोधतो हें पहाते. )

रोहिणी—( जमीनीवर पडलेलें कंकण पाहून ) अगबाई ! तें कंकण इथं कसं आलं तें ? ( आपल्या हाताकडे पाहून ) याच्या जोडीचं तें रत्न-कंकण इथं कसं आलं ? ( उठून तें उचलून घेते ) बोल, तारका, हेंच का तूं शोधीत होतास ?

तारक—होय आईसाहेब !

रोहिणी—मग तुजजवळ कसं आलं हें ? स्वारी शेवटल्या युद्धावर गेली, तेव्हां या हातांतून काढून दिलं होतं मी तिकडे !

तारक—थोड्या वेळेपूर्वी यतिवर्यांनीं दिलं मजजवळ तें ! आणि, 'उद्यां सहगमनाच्या वेळीं तुझ्या देवीजवळ दे हें' —असं बजाविलं त्यांनीं मला ! म्हणून या वस्त्रांत मी तें ठेवून दिलं होतं ! पण इथं येऊन मूर्तीला नमस्कार करायला वांकलों तेव्हां तें गळून पडलसं दिसतं !

रोहिणी—चल ! चल ! बाळा. यतिवर्यांकडे चल आधीं ! कुठंसे आहेत ते ?

तारक—अंमळशानं भेटलं त्यांना, तर नाहीं का चालायचं ? अंगाला हा कंप सुटला आहे, तो जाऊन स्वस्थता आल्यावर मग जाऊं आपण यतिवर्यांकडे !

रोहिणी—म्हणतोस तसं का होईना. चल तर, थोडी स्वस्थ पडल्ये !
[ तारकासह जाते; दुसऱ्या बाजूनें चंद्राकर, सुदर्शन व वाग्भट प्रवेश करितात. ]

चंद्राकर—पहा या देवघरांत ! दिसते आहे का ती इथं !—नाहीं ना ? —मी म्हटलं तेंच सहगमन झालं शेवटीं. त्या तारकासह गमन केलं तिनं इथून !—याविषयीं कांहीं शंका उरली आहे आतां सुदर्शन !

सुदर्शन—( निःश्वास सोडून ) मायेची लीला ! दुसरं काय म्हणणार आतां ? या जालांत पडलेल्या आपण जीवांनीं मायेच्या सर्वच लीला, इष्ट तशाच अनिष्ट लीलाहि, आपल्या अंतिम हिताकारितांच आहेत, इष्टच आहेत, असं समजून असलं पाहिजे !

चंद्राकर—हा वेदान्त कळायला सोपा सुदर्शन !—पण वळायला किती कठिण आहे ?

प्राणच जिथें वाही,
    तीच कशी ते कपटें घेई ! ॥ ध्रु० ॥
काराक्लेशीं यत्स्मृतिबल तें
मृत्युविनाशक केवळ होतें,
दैवत जी हो मातें ।
    तीच कशी हो आकिंचन होई ! ॥ १ ॥

देवा ! या वेदनांहून कारागृहवास किती तरी सुखाचा ! ह्या पहा—या असल्या ढोंगानं माझ्या मूर्तीचं इथं स्थापनपूजन करून, जगाला आजवर कसं फसविलं हिनं तें !

सुदर्शन—असंच नाहीं केवळ म्हणतां येत चंद्राकर. रोहिणीदेवीचा शुद्धाचार, निष्कलंक चरित्र, एकनिष्ठ पातिव्रत्य, हीं गेलीं अठरा वर्षें मी प्रत्यक्ष पहातों आहे ना ?—याला का ढोंग म्हणायचं ?

वाग्भट—रोज कांहीं नाहीं तरी पांच चारदां या मूर्तीपुढें बसून अश्रु गाळतांना पाहातों आहे मी त्यांना हीं गेलीं अठरा वर्षें ! त्यांच्या दुःखाश्रूंनीं मूर्तीला खरंखुरं स्नान घडत आहे, असं म्हटलं तरी चालेल !

चंद्राकर—मग कां तूं तिच्याविषयीं माझ्या मनांत संशय उत्पन्न केलास ? हें संशयविष माझ्या जीवाला कां पाजलंस आज तूं ? मला निष्कारण ताप दिला, असं तुझं मन जर तुला सांगत असेल; तिचं सोज्वल अंतःकरण निष्कारण कलंकित केलं असं तुझ्या मनाला जर वाटूं लागलं असेल; तर जा, पाय धर तिचे आधीं !—क्षमा माग जा तिची ! आणि पुनः आपलं कृष्णवदन दाखवूं नकोस मला इतःपर.

वाग्भट—जातों मी बापडा ! पण कृष्णवदन घेऊन नाहीं जात मी ! सखेद चित्तानं जातों इथून ! कारण प्रत्यक्ष पाहिल्या त्याच गोष्टी यजमानांना विदित केल्या आहेत मी ! त्यांतल्या कित्येक देवींच्या चारित्र्याला दूषित करणाऱ्या आहेत, तर कित्येक त्याला भूषित करणाऱ्याहि आहेत ! जातों मी तर ( जाऊं लागतो. )

चंद्राकर—फीर मागें ! या अभाग्याला प्रसंगांत लोटून कसा जाणार तूं ? कोण ! तींच दोघं येताहेत का हीं ? दोघांचीहि मुखं प्रफुल्लित दिसताहेत ?

( रोहिणी व तारक प्रवेश करितात )

रोहिणी—सुदर्शन, आपण थोडा वेळ तिकडं जाऊन बसावं कृपा करून ! भटजी, तारक, तुम्हींहि जा थोडे बाहेर ! ( सुदर्शन, तारक व वाग्भट जातात; चंद्राकराकडे थोडा वेळ निरखून पाहून यातिवर, आपण बाळगलेलं हें रत्नकंकण मायेच्या कृपेनं आयतंच पडलं माझ्या हातीं ! बाप-

फाचा दोष नाहीं त्यांत! मायेचा हा मोठा अनुग्रहच, कीं वेळींच माझ्या हातीं आलं हें! यतिवर्य, आपल्याला हें कुणाकडून मिळालं, कधीं मिळालं, सर्व कांहीं सांगण्याची कृपा होईल का या दीनेवर!

चंद्राकर—हें माझ्या पत्नीकडून रोहिणीकडून, अठरा वर्षांपूर्वी मिळालं मला!

रोहिणी—( त्याचे पाय धरून ) पतिदेव!

चंद्राकर—( दूर सरून ) सोड पाय! तुझ्या पतीचा सांप्रत वध झालेला आहे!

रोहिणी—म्हणजे!

चंद्राकर—कपटानं त्याचा वध केलेला आहे!

रोहिणी—माये! अर्थ काय याचा? कालकेतूनं अठरा वर्षांपूर्वी अरण्यांत पाठीवर वार करून आपला वध केला, ही गोष्ट खोटी नाहीं का!

चंद्राकर—खोटीच आहे ती! या चंद्राकराचा वध अरण्यांत नाहीं झाला! इथंच, त्याच्या घरांतच झाला! या चंद्राकराचा वध त्याच्या शत्रूंनं, कालकेतूनं नाहीं केला! त्याच्या प्रिय पत्नीनं—गृहदेवतेनें, रोहिणी देवीनंच केला! या चंद्राकराचा वध त्याच्या पाठीवर वार होऊन नाहीं झाला—तर या हृदयावर वार होऊनच झाला आहे! ( खालीं पडतो )

रोहिणी—धांवा हो धांवा! बाळा तारका, लाडक्या धांव! तुझा पिता हा बघ धरणीवर पडला!

[ तारक, सुदर्शन व वाग्भट प्रवेश करितात ]

तारक—बाबा! बाबा! ( त्यास उठविण्यास जातो, तों रोहिणी पडणारसें पाहून तिला सांवरीत ) आई! आई!

सुदर्शन—( स्वगत ) हा चंद्राकरांचाच पुत्र एकूण! ( चंद्राकराजवळ जाऊन ) चंद्राकर, डोळे उघडा! उठून बघा! हा तारक, दुसरा कुणी नसून तुमचाच पुत्र आहे!

चंद्राकर—( एकदम उठून ) कोण! ( तारकास निरखून पाहून ) तारक माझा पुत्र!

रोहिणी—स्वारी युद्धावर गेली तेव्हां मला कांहीं महिने लोटले होते; ही गोष्ट मी लज्जेनं इकडून गुप्त ठेविली, हा प्रमाद केला मी ! तसंच, इकडच्या वधाबद्दल सूड उगविणारा जन्मास आला आहे, हें त्या दुष्टाला–कालकेतूला कळूं नये म्हणून त्याचं अस्तित्व मी सुदर्शनाधारख्या इकडच्या मित्रापासूनहि गुप्त ठेविलं;–हाहि केवढा प्रमाद झाला आहे मजकडून !

चंद्राकर—प्रमाद नाहीं झाला तुझ्याकडून त्यांत दूरदृष्टीच दिसली तुझी ! –हा बघ, तुझा चंद्राकर पुनरपि जीवंत झाला आहे या गौप्यस्फोटानं [ यति-वेष टाकतो; रोहिणी त्याचे पाय धरूं पहाते, तिला उठवून ] मीच तुझे महदपराध केले आहेत, रोहिणी ! मीच क्षमा मागायला हवी तुझी ! तसंच, अठरा वर्षांपूर्वी सुदर्शनादेखत तुझ्या हातून काढून घेतलेलं हें कंकणहि त्यांच्याच देखत घालायला हवं तुझ्या हातीं ! ( कंकण तिच्या हातीं घालतो) स्त्रीहृदय किती उच्च होऊं शकतं, आणि पुरुष–बुद्धि किती नीच होऊं शकते, हेंच दिसून आलं आहे या गृहनाट्यांत!–बाळा तारका !–ये इकडे ! तूंहि क्षमा कर तुझ्या पित्याला ! ( दोघांभोंवतीं बाहुपाश टाकून ) अहाहा ! आज माझ्या सुखाला काय उणं आहे ! माये ! असाच कृपावर्षाव कर मृतमात्रावर!

सर्व—तथास्तु [ शेवटचा पडदा पडतो. ]

